# प्रस्तावना

बिहारचा कार्यक्रम होता भूरि दान. भूरि-दान हा काहीं भूमि दानाचा कळस नाहीं. त्याचा कळस ग्राम दान. म्हणजे जमिनीची व्यक्तिगत मालकी संपवणें. हा प्रयोग सर्वत्र ओडिसात करायचा होता. कारण एक तर ओडिसाचें क्षेत्र त्याला विशेष अनुकूल होतें. ओडिसाची गरिबी, गरिबीबद्दल गाजलेल्या हिंदुस्थानात हि अद्वितीय च. गरिबानीं आधीं मालकी नाहीं सोडायची तर कुणीं सोडायची? श्रीमतांची सुटायची, गरिबानीं सोडायची. भारताचें हें भाग्य कीं श्रीमंत हि कुणी कुणी मालकी सोडायला तयार होतात. पण हें भाग्य अति ताणून चालायचें नाहीं अति ताणलें तर तुटायचें, म्हणून मिळाली तितकी श्रीमंतांची सहानुभूति मिळवून, गरिबानीं मालकी सोडण्याचा प्रयोग यशस्वी करणे हा च श्रीमंतीचा नालेकिल्ला जिंकण्याचा कुशल उपाय होता. त्यासाठीं ओडिसाचें क्षेत्र अनुकूल होतें. शिवाय ओडिसात जनतेविषयींच्या सद्भावनेनें आणि अनुरागानें प्रेरलेली वानरसेना ( हनूमदादि नायकासकट ) सज्ज होती. म्हणून ओडिसात सर्वों दयानें नशीब अजमावून पाहण्याचें योजिलें होतें.

बिहारच्या माझ्या यात्रेला मीं ' आनंद-यात्रा ' असें नाव दिलें होतें तदनंतर बंगालची छोटीशी प्रेम यात्रा संपवून ओडिसात शक्ति-यात्रेला आरंभ करायचा होता सुमारें सात आठ महिने ही शक्ति यात्रा चालली. पूर्वार्धात झाला शक्तीचा शोध, उत्तरार्धात तिचें दर्शन.

कोरापुट जिल्ह्यात उत्तरार्ध सुरू झाला, आणि त्या जिल्ह्यात च तो संपला. भर पावसाळ्यात जसा शिवाजीनें जंजिऱ्याच्या सिद्दीवर हल्ला केला, तसा ओडिसाच्या कार्यकर्त्यांनीं कोरापुटच्या मलेरिया शीतल चातुर्मास्यात कोरापुटवर हल्ला चढविला. एकेकानें आजारी पडावें आणि दुरुस्त होऊन पुन्हा आघाडीवर जावें. चातुर्मास्यात देव देखील झोंपतात असें पुराण आहे. चातुर्मास्यात सेवकानीं जागून इतिहास बनविला. शेकडों ग्राम दानें कोरापुट-मधें मिळालीं आणि सर्वोदयाच्या अंगावर मूठभर मांस चढलें. त्यानंतर बाबाचा मुक्त विहार चालू आहे. तो हि तामिलनाडमधें थोडा सापाधिक

झाला आहे. त्यातून सुटल्यावर निरुपाधिक मुक्त विहार सुरू होईल; अशी बाबाला आशा आहे.

शक्तीचा शोध व शक्तीचें दर्शन — ओडिसाच्या यात्रेचा पूर्वार्ध आणि उत्तरार्ध — आमच्या दोघी मुलींनीं दोन पुस्तकात चित्रित केला आहे. हिंदींतून दोन्ही पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. मराठींत आता होत आहेत.

जगलाचा प्रवासवर्णन करणारे दुर्मिळ च असतात. कारण वर्णन करू शकणारे जगलात जात नसतात. आणि जगलात जाणारे वर्णन करू शकत नसतात. वाणीला डोळा नाहीं, डोळ्याला वाणी नाहीं, असें रामायणात तुलसीदासानीं म्हटलें आहे. पण सर्वोदय-विचाराचें हे सामर्थ्य होय कीं त्यानें वाणीला डोळा लाभला आणि डोळ्याला वाणी लाभली. वाचकाचे हें भाग्य च म्हटलें पाहिजे

उत्तरार्ध आणि पूर्वार्ध दोन्ही एका च पुस्तकात घालता आले असते. पण त्यानें पुस्तक थोडें मोठें झालें असते, म्हणून दोन भाग केले आहेत. वाचकाना एकदम च अजीर्ण व्हायला नको. एका मागून एक सेवन करून सावकाश पचविता येईल.

भूदानयज्ञ यात्रा<br>
कोइबतूर जिल्हा<br>
२३–९–५६

# अनुक्रमणिका

## बंगाल

# वंग-कलिंग यात्रा

## बंगाल

### : १ :

### विरह-मीलन

पडाव—साल्तोडा
[ जिल्हा—बांकुडा, बंगाल ]
१ जानेवारी '५५

नव्या वर्षाची नवी पहाट झाली. प्राचीच्या मुखावर पहिली प्रकाशरेषा उमटली. जगाला अंधारांतून प्रकाशांत नेणें हें प्राचीचें नित्याचें कार्य. तिला तेजोनिधान गवसले कीं ती चारी बाजूंना तेज कणांचे दूत पाठवते नी पाहता पाहता प्रतीची, उत्तरा, अधरा साऱ्यांना त्या तेजानें व्यापून टाकते. अंतरिक्ष उजाळणाऱ्या प्राचीला पृथ्वीवर भरतभूमींत आपलें प्रतिबिंब आढळलें. भारतानें कधीं हि हिंसेची काळोखी, दुर्बल शस्त्रें घेऊन जग जिंकायला जाण्याचा वेडेपणा केला नव्हता. ज्ञान आणि प्रेमाच्या प्रखर प्रकाशदायी दूतांद्वारें जगाला प्रकाशित करणें हा च त्याचा इतिहास होता, हें च त्याचें वर्तमान नी हें च त्याचें भविष्य.

भगवान् बुद्धाच्या विहार भूमीची यात्रा संपवून आज आम्हीं चैतन्य महाप्रभूच्या प्रेमभूमीमध्यें प्रवेश केला.

विहार भूमींतील आपला विहार संपवून विनोबा ठरलेली अखेरची वाट चालत होते. विहार बंगालची सीमारेषा आली. पानाफुलांनीं सजलेली

भव्य द्वारें तिथें उभारलीं होतीं. विरह आणि मीलनाच्या भावानीं भारलेली बिहार व बंगालची मंडळी तिथें जमली होती. बिहारच्या वतीनें जयप्रकाशजी निरोपाचें भाषण देण्याकरिता उभे राहिले. त्यांची नित्याची स्थिर गंभीर वाणी गडगडली. शब्दाशब्दावर ते थांबत होते. अश्रू ओघळत होते... "अच्छा होता, अगर यह बिदाई का भाषण देनेका काम किसी और मजबूत दिलवाले पर सौंपा जाता।" प्रत्येक हृदयाला ह्या वाक्याने हलविलें. त्यांच्या अश्रूंना साथ देण्याकरता अनेक अश्रुसरिता खळखळू लागल्या. जें शब्दांना साधलें नाहीं तें अश्रुद्वारें व्यक्त झालें. "तुमची ही अहिंसक क्रांतीची प्रयोगशाळा (बिहार भूमि) उत्तम तऱ्हेने चालू राहील.' असें आश्वासन त्यांनीं विनोबांना दिलें अश्रूंनीं भिजलेल्या त्या साध्या शब्दांनीं विनोबा निश्चिंत होऊन बिहार सोडू शकतात असा विश्वास निर्माण केला.

डोळे पुसत पुसत आम्हीं बंगभूमींत विनोबांच्या मागोमाग प्रवेश केला. बिहार भूमीचीं असंख्य स्मृतिचिन्हें डोळ्यांसमोर तरळत होतीं. त्या भूमींत प्रवेश केला तेव्हा पहिल्या च दिवशीं भगवान् बुद्धाच्या प्रेरणेनें विनोबांनीं घोषणा केली होती, "बिहारची भूमिसमस्या सोडविल्याखेरीज मी हा प्रदेश सोडणार नाहीं." त्या घोषणेला शिरसावंद्य मानून अनेक खंदे वीर पुढें सरसावले. 'संत विनोबा की जय' म्हणत जनता अत्यानंदाने जयघोष करीत होती. पावलें वर्तमानांत पडत होतीं. मन मात्र भूतकाळांत विहार करीत होतें. वैशाखी पौर्णिमेचा पवित्र दिवस. कारुण्यमूर्ति बुद्धाचा जन्मदिवस. रकाच्या राजेसाहेबांनीं अतिथींचा सत्कार केला. त्यांच्याजवळ एक लक्ष एकर जमीन पडती नी बारा हजार एकर चांगली जमीन होती ही सारी त्यांनीं विनोबांच्या समोर ठेवली. "जेवढी हवी तेवढी घ्या" त्यांच्यातलें औदार्य बोललें. राजानें सर्वस्व दिल्यानंतर त्याची चिंता करण्याचें काम विनोबांकडे आलें. पडती जमीन असेल तेवढी आणि चांगल्या जमिनीचा सहावा हिस्सा घेऊन दहा हजार एकर जमीन त्यांना परत केली. "हें पूर्ण दान आहे, सात्त्विक दान आहे" विनोबा संतुष्ट झाले... "जमीनदारांनीं ह्या क्रांतीचा झेंडा आता स्वतः पुढें येऊन हातीं घेतला पाहिजे." ह्या विनोबांच्या आह्वानाचा स्वीकार करून अहोरात्र या क्रांति कार्याकरता

वणवण हिंडणारे सौम्य, सौजन्यशील पालकोटच्या राजेसाहेबांनीं तर स्वत च्या जीवनात च क्राति केली होती .. आमचा मार्ग पूर्वेकडे जाणारा होता. प्राची पथदर्शनाचें काम करीत होती तिची आरक्तता क्षणाक्षणाला वाढत होती. हळूहळू सवित्याचें तेजस्वी बिंब क्षितिजावर डोलानें चढू लागलें. क्षणभर भास झाला, त्याचें आरक्त तेज गुरुदेवाचा प्रेमसदेश देत आहे. बंगभगिनी मजुळ स्वरात जयघोष करीत होत्या "साधु विनोबा अमर हो!" बगभगिनींचा पराक्रम वाचला होता, ऐकला होता. मला आठवण झाली. साता समुद्रापलीकडून आलेली पॅंट खादीचें शुभ्र वस्त्र परिधान करुन गया जिल्ह्यात व खेडोपाडीं हिंडून भारतीयता जागवत होती. भारताच्या हृदयाचा ठाव घ्यायचा होता तिला. ॲटमच्या युगात हि शातीची व प्रेमाची भाषा बोलणाऱ्या, अध्यात्माच पूर्वपरपरागत वेड आजतागायत बाळगणाऱ्या भारताचें तिला मोठें कुतूहल वाटत होतें कुठून एवढी शक्ति मिळवली त्यानें ? त्याच्या शोधार्थ ती हिंडू लागली. त्याकरता भारतात असेपर्यंत इग्रजी बोलायचें च नाहीं, हिंदी च बोलायचें अशी प्रतिज्ञा तिनें घेतली होती. भूदानाचा अभिनव मार्ग तिच्या हृदयाला रुचला होता. तोडक्या मोडक्या हिंदीमधें जमिनीचें दान मागत ता पायीं पायीं फिरे. शात, सुशील, सोज्वल गौरकाय तरुणीला थडीवाऱ्याची पर्वा नाहीं, खाण्यापिण्याची शुद्ध नाहीं, हें पाहून ग्रामीण जनता तोंडात बोटें घालू लागली व तिची झोळी भरू लागली. ज्या दिवशीं दान मिळणार नाहीं त्या दिवशीं अन्न न घेण्याचा तिचा निर्धार होता. सुखसमृद्धीच्या कळसावर पोहोंचलेल्या वैभवशाली (अमेरिकेंत) देशात आजवर तिचें जीवन गेलें होतें. तें जीवन तिला नीरस वाटू लागलें होतें भूदानमूलक ग्रामोद्योगप्रधान अहिंसक क्रातीला जीवनपुष्प वाहिलें तेव्हा मात्र तिला शात शात वाटू लागलें. चालता चालता कुणाचा तरी धक्का लागला. दृष्टि वर्तमानात गेली. जनसमुद्र उसळला होता. बगाल भूदान समितीचे सयोजक श्री. चारुचद्र भडारी बगाल विधान सभेंत विरोधी पक्षाचे प्रमुख व सोशॅलिस्ट पार्टीचे सभासद होते, परतु आता त्यांनीं सर्व सोडून महान् क्रातिकार्याला जीवनदान अर्पण केलें होतें. त्या गर्दीत हातातील दानपत्राचा गठ्ठा साभाळीत ते विनोबाच्या बाजूनें लगबगीनें चालत होते. धोतराचा

सोगा हातीं धरून, काळ्या चष्म्यातून बापूंच्या प्रथम शिष्याला न्याहाळीत एक स्थूल व्यक्ति मागें मागें रहात होती कुणी तरी म्हणत होत, "हे च ते अतुल्य घोष बर का ! बंगाल प्रदेश काँग्रेसचे अध्यक्ष." गर्दीत चालता चालता अनेकाचे पाय पडून तुटलेल्या बिचाऱ्या माझ्या चपलेला उचलीत मी पुन्हा मागें पडलें स्मृतिपटलावर दुसरें चित्र दिसू लागलें . "विनोबाजींचा सकल्प आता व्यक्तीपुरता सीमित राहिला नाहीं, तो आता आपणा सर्वांचा सकल्प आहे" असें म्हणून बिहार प्रदेश काँग्रेसकडून ३२ लाख एकराचा कोटा पूर्ण करण्याचा सकल्प करणारे कै. प्रजापति मिश्र बिहार काँग्रेसचे निष्ठावान् अध्यक्ष होते व विनोबाचे भक्त होते सत्कार्याची कळकळ त्याना स्वस्थ बसू देत नव्हती ... सुरम्य शातीच रम्य स्वप्न उराशीं बाळगून हसत हसत कष्ट सहन करणारे लहानमोठ कार्यकर्ते ही बिहारची फार मोठी सपत्ति होती .. एकदम गडबड झाली आणि पहातें तों लोक धावत सुटले होत कारण न कळता च मी हि धावू लागल. थोडें पुढें गेल्यावर पाहिल. बाबा धावत सुटले होते. मात्र हजारोंच्या त्या गर्दीत लहान लहान मुलानीं च पहिला मान पटकावलेला दिसत होता. बाबाच्या भोंवतीं त्यानीं गराडा घातला होता. त्यापैकीं दोघाचे हात धरून बाबा पळत सुटले ते थेट टेकडीवरील निवासस्थानापर्यंत. तिथें पोहोंचल्यावर "कशी मजा आली" असें म्हणून त्या निर्व्याज बाल्कावरांवर हसू लागले. गवळ्याच्या पोरामध्यें रममाण होणाऱ्या बाळकृष्णाची कहाणी आठवली.

अहिंसेचा व करुणेचा विचार जगाला देण्याकरता बुद्धानें तत्कालीन यज्ञसमस्येचें निमित्त शोधलें होतें. सर्वोदयाचें तत्वज्ञान आजच्या जगाला देण्याकरता आज भूमिसमस्या निमित्त बनली आहे. धर्मचक्राची गति कुंठित राहिली नव्हती. धर्मचक्राला गतिमान् करीत बुद्धानें बिहारभूमीत विहार केला होता. काल च बिहारच्या असेरीच्या मुक्कामावर प्रातःच्या कार्यकर्त्यांना बाबा सागत होते, "गेल्या सत्तावीस महिन्यात मला कुठला हि श्राप झाला नाहीं. उलट माझी ही 'आनंद यात्रा' च झाली. जवळ जवळ चार वर्षें झालीं माझी पदयात्रा चालू आहे. पण माझा प्रभु तर चवदा वर्षें अरण्यांत हिंडत होता. चवदा पुर्दे चार म्हणजे .." ऐन उन्हाळ्यात उन्हाळ्या-करता प्रसिद्ध असा गया व पलामू जिल्ह्यात यात्रा सुरू होती. मे चा महिना होता.

सूर्यनारायणाला तापण्याचा अधिकार च होता. घामाच्या धारा गाळत गाळत चवदा पधरा मैलाची वाट चालावी, मुक्कामावर लवकर च पोहचू व गार पाणी पिऊ असे माझे मनात यावे तों च कुणातरी सांगे "चुम्न अंतर १९ मैल सागितल गेलय्. अजून दीड दोन मैलाची वाट चालायची आहे" राची व हजारीबाग जिल्ह्यात मुसळधार वृष्टींत चार दोन हात करीत एकदा तीन चार तास चालून नवसरिसान्त ओलेंचिंब भिजून रामगढच्या राजेमाहेबाच्या महालात प्रवेश केला होता, आणि एक दिवशीं तर एका अतिशय लहान झोपडींत रहावें लागलें होत झोपडी गळत होती नी आम्ही सारे कसेबसे गर्दी करून उभे राहून गावकऱ्यासोबत प्रार्थना करीत होतों.

थडीने अंग जळू लागल तेव्हा बिहारच्या उत्तरेला पर्वतराज हिमाचलाचें भव्य दर्शन घडलें होतें. शेतातली वाट असली म्हणजे दवानें बाबाचे वृट ओलेचिंब व्हायचे मग ते अनवाणी चालू लागत नी शेतातली चढउताराची वाट सपून गिट्या टाकलेला रस्ता सुरू होई. त्यावर पावलागणिक तीव्र वेदना होई. 'हाय' म्हणायें तेवढ्यात बाबाचे शब्द कानावर पडत "अरे, रास्तेमें जो कंकड (दगड) होते हैं वे शंकर होते हैं" बबाचा कोप झाला होता तेव्हा सभेकरता दोड्यातून आलेल्या हजारों पूरपीडिताना दिलासा देताना, पाण्यापावसाचा मार खात कंबरभर पाण्यातून दहा दहा मैल चालताना बाबाना कुठं हि कष्ट भासले नव्हते. सर्वत्र आनदी आनद च होता .. 'स्थितप्रज्ञदर्शनात' स्थितप्रज्ञाचें जीवन म्हणजे निरळ विहार, 'आनद विहार' हा विचार सागितला आहे तिकडे बाळगोपाळाबरोबर हास्यविनोद करताना गेळवर बनलेल्या बाबाकडे पाहून 'आनद यात्रे'चें साकार दर्शन घडल्याचें समाधान वाटलें

गावाबाहेर दूरच्या जगलातील टेकडीवर छोटासा बगला हें आमचें निवासस्थान अतर्बाह्य सौंदर्यानें नटलेल्या वनभूमीनें प्रथमदर्शनीं च मोहित केलें. सौम्य रगाच्या रागोळीन भूमि चित्रित केली होती. मगल कलश, प्रदीप व धूपामुळें देवघरानलें मागल्य प्रगटलें होतें. मागल्यात मधुरता ओतीत वनभगिनी सुमधुर स्वरात रवींद्रगीत आळवू लागल्या—

" एश नव जागृत प्राण चिरयौवन जयगान
एश मृत्युजय आशा, जडत्व नाश
क्रंदन दूर होक, बंधन होक क्षय
......नव अरुणोदय जय होक "

आमचे नेत्र वंगभूमीचें सौंदर्यपान करूं लागले, संगीत कानाला सुखवूं लागलें, आणि दोन्ही मिळून मनाला भुलवूं लागले, हृदयाला हालवूं लागले. तों च बाबांची *प्रेममय वाणी ऐकू आली—*

" लहान होतों तेव्हा बंगालमध्यें येण्याची व हिमालयांत जाण्याची माझी फार इच्छा होती. पुढें देवाच्या शोधार्थ घराबाहेर पडलों तों दोन्हींच्या मध्यें काशीनगरींत जाऊन पोहचलों. तिथून च माझीं पावलें गांधीजींकडे वळलीं आणि तिथें मला हिमालयाची शांति व बंगालची 'क्रांतिभावना ह्यांचा सुंदर संगम आढळला — त्या च शांतिमय क्रांतीचा संदेश घेऊन मी आज बंगालमध्यें आलों आहें — वृद्ध म्हणजे बाल च. बालक होऊन च मी तुमच्यामध्यें आलों आहें, प्रेमाचा दुधः मला हवा आहे. मी म्हणतों, बाबधानें सरकारला जमीन दर्मा मिळो या न मिळो, माझा बालहट्ट मात्र बंगाल रचित च पुरवेल." शब्दन् शब्द प्रेमानें ओथंबला होता. पहिल्या च भेटींत स्नेहभरानें हस्तांदोलन झालें !

सारिक्ततेचा व व्रतनिष्ठेचा बिहारला फार अभिमान वाटे. खादी समिती-मध्ये काम करणारे परंतु यात्रेत खजांची, टंकक, साहित्य विक्रेता इ० निरनिराळी जबाबदारीची कामें उत्तम पार पाडणारे राजेंद्रभाई, झाजी, नंदकिशोरभाई, रामावतारभाई सारे च आज परतणार होते. " परिवार टूट रहा है, हम दूर हो रहे है " असें म्हणत प्रत्येकानें नमस्कार केला. बाबांच्या चरणाला स्पर्श करीत नी डोळे पुसत एकमेकांची पाठ फिरूं लागली.

बंगालच्या सृष्टिसौंदर्यात व जनतेच्या प्रेमसौंदर्यात मन रमू पाहावें तर निरोप घेणाऱ्या एकेका बिहारीभाईच्या नेत्रांतील उदासीनता हृदयात प्रतिबिंबित उमटून जायची. जयप्रकाशजी व दीदींनीं (प्रभावतींनीं) 'खुश रहो' म्हणून निरोप दिला. शब्दांची आवश्यकता नव्हती. त्यांच्या रूपानें देशाला काय मिळालें आहे त ह्याचे इतिहासकार लिहितील. पण क्रांति-सैनिकाना मात्र एक जिव्हाळ्याचें स्थान निर्माण झालें आहे. ते दोघे हि स्वत ला 'सामान्य' म्हणवतात —नव्हे तसें जीवन हि जगतात. आपली उंची कुणाचे डोळे दिपवणारी होऊ नये याचा त्याना प्रयत्न करावा लागत नाहीं. त्यांचा साधेपणा इतका स्वाभाविक आहे कीं, त्यांची उंची भासते, जाणवते, परंतु अडवीत मात्र नाहीं.

सायंकाळीं सभेच्या वेळीं बाबा टेकडीवर नी जनता उतारावरून पायथ्या-पर्यंत पसरली होती. मुग्ध होऊन प्रेमसंदेश ऐकत होती. बाबांनीं प्रेमदान यज्ञाची घोषणा केली. ते म्हणाले, " मी भूमिदान मागायला नाहीं आलों. मी तर प्रेमदान मागतोंय. "

निवाऱ्याच्या शिरस्त्याप्रमाणें दिवेलागणीला यात्रीदलातील मंडळी बाबांच्या भोंवतीं जमली. आज सेवादलातील कांहीं सेवक यात्रेत सामील झाले होते. त्यांच्यांशीं चर्चा करण्याच्या हेतूनें बाबांनीं आपले शिक्षणावर विचार व्यक्त केले. ते चांगले च हादरे बसविणारे होते. हल्लींच्या शिक्षणपद्धतीमुळें मुलं शरीरपरिश्रम करायला नाखुष होतात असें त्यांचें नेहमींच म्हणणें कोपऱ्यात बसलेल्या निर्मलेकडे बोट दाखवून ते म्हणाले, " आता हिचें च उदाहरण घ्या. माझ्याजवळ राहायची हिची फार इच्छा आहे आणि ही माझी लाडकी

मुलगी आहे. पण हिचें शरीर हिला अधूनमधून त्रास देत असतें. म्हणून म्हणतो, क्रांति करायची असेल, भांडवलशाहीविरुद्ध झगडायचें असेल, तर पहिला हल्ला आपल्या शरीरावर च करावा लागेल. सर्वांत मोठा भांडवलदार जर कुणी असेल तर हें आपलें शरीर!"

क्रांति म्हणजे डोकीं कापणें नव्हे, तर डोक्यातील विचार बदलवणें. एखाद्या आल्हाददायक सकाळीं आरामखुर्चीत उशीरर रेलून गांधींचें पुस्तक वाचावें. "उत्पादक श्रम केल्याशिवाय खाणारा म्हणजे चोर आहे" असलें वाक्य वाचता च बेहद खुश होऊन जावें. पण इतकें छान पुस्तक टाकून फ्लोलीजाहर भाडीं घासणाऱ्या गणू मोलकरणीच्या हातातील भांडीं घेऊन तीं घासण्याचें मात्र कोण जिवावर येत." मग पुढच्या वाक्यावर नजर फिरवावी—"स्वतः श्रम न करणें म्हणजे दुसऱ्याच्या श्रमावर जगणें हें शोषणाचें मूळ आहे, त्यातून च भांडवलशाही निर्माण होते.".. बुद्धीला हा विचार पटतो, हृदयाला रुचतो हि. म्हणून पुस्तक फेकून उठावें. भांडीं घासावीं, केरसुणी हातीं घेऊन घर झाडावें, बागेंत काम करावें, अंगणात सडा घालावा, पण मग शरीर थकू लागतें, हात पाय बोलू लागतात—"आता पुरे, जरा आडवी हो!—" मन आणि बुद्धि पुढेंपुढे धाव घेतात आणि इकडे पूर्वी सवयीनें लाडावलेलें शरीर त्याला मागें मागें खेचतें, छानसं पुस्तक वाचत पडाव, आयत जेवाव, सुंदर लेख लिहावे, आजच्या विषमतेवर मैत्रिणींशीं चर्चा करावी, असा मुलखोयीला चटावलेल्या शरीराचा तगादा असतो. म्हणून तर त्याच्यावर पहिला हल्ला चढवायचा आहे!



: २ :

# दारिद्य नको, नारायण हवा

पावडा ( बाँकुडा )
२ जानेवारी '५५

दिशा उजळू लागण्यापूर्वी च एक गांव लागलें. झाडून सारे गांवकरी दर्शनाकरतां सडकेच्या दोन्ही बाजूला उभे होते. उत्साहाला भरती आली होती. गांवकऱ्यांनीं सात मैलाचा रस्ता स्वतःच्या श्रमानें तयार केला होता. त्यामुळें तीन मैलाची चक्कर वाचली होती कुठें हि जा, जनता प्रेमाचा वर्षाव करतांना आढळते. आजचा रस्ता आणि त्यावर साठलेलें गांवकऱ्यांचें अत्युत्कट प्रेम पाहून बाबाचे शब्द आठवले : " सर्वत्र भारतीय हृदयाच्या विशालतेचें च दर्शन घडतें. " भारतीय हृदय सर्वत्र एक आहे. वेद, उपनिषदाच्या दुधावर पोसलें गेलेलें तें हृदय कवीचा आवाज चटकन् ओळखतें. " आमादेर ग्रामे भूमिहीन केऊ थाकबेना, थाकबेना " हा गगनभेदी जयघोष ऐकू आला आणि हा म्हणे कम्युनिस्टांचा प्रदेश आहे ! मागें तेलंगणाच्या यात्रेत जनता रामधुन म्हणत रोज पहांटे चारपासून निवासाला पोंहचेपर्यंत बाबाच्या मागें चालत असे. त्यावेळीं बाबा कम्युनिस्टांना म्हणाले होते, " जोंपर्यंत रामनामाचा गजर सुरू आहे तोंपर्यंत तुमचें ह्या देशात कांहींही चालणार नाहीं. " ... आज बंगालची जनता जगाला हें च सांगत होती कीं, भारतीय हृदयावर रामाची च सत्ता चालणार.

वाटेंत लागलेल्या प्रत्येक खेड्यात बंगालच्या संस्कृतीचें दर्शन घडत होतें. प्रत्येक गोष्टीला कलेचा स्पर्श झाला होता. स्वच्छ सारवलेलीं मातीचीं छोटीं छोटीं घरें, सडा शिंपून शुद्ध केलेल्या घरासमोरील अंगणात भक्तिभावानें चितारलेली अल्पना, दाराच्या दोन्ही बाजूंला केळीचे खांब, आंब्याच्या हिरव्यागार पानांचीं तोरणें दारासमोर हातीं मंगल कलश नी सौम्य प्रदीप घेऊन सौजन्यशील गृहलक्ष्मी उभ्या होत्या, तर कोंवळ्या कन्या उत्साहानें शंखनाद करीत होत्या. रम्य सृष्टि नी घराची आकर्षक रचना

पाहून वाटू लागतें, इतकीं सुंदर खेडीं सोडून शहराच्या गजबजपुरींकडे लोक का धाव घेतात? बाबांची कुटी गावकऱ्यांनीं तयार केली होती. त्यांना बाबा म्हणाले, "मी जमीन वाटायला आलों नाहीं, प्रेम वाटायला आलों आहें."

आमच्याकरतां पुआलच्या झोपड्या तयार केल्या होत्या. साध्या च होत्या पण रचना आकर्षक होती. सारी च व्यवस्था साधी पण सुंदर होती. झोपड्यांच्या समोर च लहानसें शेत होतें. त्यांतील तुरीच्या शेंगा बोलावीत होत्या. तेवढ्यांत न्याहारीची घंटा खणखणली आणि पळावें लागलें. बिहारमध्यें ठरलेली न्याहारी म्हणजे भिजवलेले पोहे, दहीं नी गूळ. इथें मूडी (मुरमुरे), गूळ व शेंगदाणे. गरीब वर्गाचें हें च खाणें आहे असें कळलें तेव्हां आंत एक प्रकारचा आनंद झाला, आणि गुळाला अधिक च गोडी आल्यासारखें वाटलें. आजचें व्यासपीठ हा ग्रामीण कलेचा नमुना होता. पुआलची राख शेणांत मिसळून त्यानें तो मातीचा चौकोनी उंचवटा सारवला होता. त्यावर आणि त्याच्या भोंवतीं नाजूक रांगोळी काढली होती.

सकाळीं बाबांच्या बरोबर यात्री दलांतील मंडळी गावांत गेली. हरिजन वस्तीमध्यें जवळ जवळ दोन तास बाबा हिंडत होते. प्रत्येक घरांत शिरायचें, थोडक्यांत अवलोकन करायचें, कुणाच्या पाठीवरून हात फिरवायचा, कुणाच्या बाळाचें कौतुक करायचें, वृद्ध पित्याची आस्थेनें चौकशी करायची, कुणाची चेष्टा करायची असें चालू होतें. आशादेवी आर्यनायकम् हळू च म्हणाल्या, "येशू ख्रिस्त असा च हिंडला असेल गरिबांच्या घरांत." त्या हरिजनांची मोठी दयनीय अवस्था होती. त्यांचीं १०-१२ फुटांचीं लहान लहान घरें ज्या जमिनीवर होतीं ती जमीन त्यांच्या मालकीची नव्हती. त्याकरतां दरवर्षी बारा दिवसांचा परिश्रम त्यांना विनामूल्य द्यावा लागे. बाबांचें हृदय व्यथित झालें. दुपारीं कितीतरी वेळ ते एकटे च शेजारच्या पहाडावर जाऊन बसले होते.

त्यांच्या दुखावलेल्या अंतःकरणाचें प्रतिबिंब आजच्या भाषणांतील शब्दाशब्दांत पडलें होतें. "आपण सुखी वाटू तर तें वाढतें नी दुःख वाटू तर

ते कमी होते. दोन्हींचा उपाय एक च...वाटा, वाटत चला. या च भूमी-मध्यें विवेकानंदानीं 'दरिद्रनारायण' शब्दाचें उच्चारण केलें होतें. आपल्याला दारिद्र्य नाहींसें करायचें आहे नी नारायणाची प्रतिष्ठा करायची आहे हें प्रेमाचें काम लक्षात घ्याल तर बंगाल अतिशय शक्तिशाली होईल."

बंगालच्या प्राचीन वैभवाचें स्मरण करून देत ते म्हणाले, "बंगालमध्यें अनेक आध्यात्मिक विभूतींनीं जन्म घेतला होता. सांख्यशास्त्राचा उदय इथें च झाला. वैष्णवांनीं ह्या च भूमीमध्यें विहार केला. ह्या काळात इथें धर्मसुधार व समाजसुधाराचा विचार स्फुरला, प्रयत्न झाला. साऱ्या भारताचें स्फूर्तिस्थान एके काळीं बंगाल झाला होता. माझ्यासारखे बंगालच्या बाहेरचे लोक सदा बंगालची पूजा करीत आले आहेत. बंगालच्या साहित्याचा भारताच्या सर्व च भागातील साहित्यावर प्रभाव पडला होता. जिथें एवढी विचारसंपदा आहे तिथें प्रेमाची तूट कशी राहील? एवढें च करायचें आहे... लोकांच्याजवळ पोंहचायचें आहे नी त्यांना प्रेमानें तत्त्वज्ञान समजावून सांगायचें आहे ..."

काल च येथील काहीं राजकारणी मंडळी बाबांच्या भेटीला आली होती. ती अगतिकपणें सांगत होती, "भूदानात काम करण्याची आमची फार इच्छा आहे. पण आमच्या मागे लागल्या आहेत निवडणुकी! एक निवडणूक संपली कीं दुसरी उभी राहते आणि आम्ही अडकून पडतों. आमच्या वाणीमध्यें नी मनामध्यें भूदान आहे. परंतु आमच्या हातांत व पायांत मात्र भूदान नाहीं.—काय करावें, सुचत नाहीं."

त्याचा उल्लेख करून किंचित् कठोर शब्दांत बाबा म्हणाले, "...हें लक्षांत ठेवायला हवय कीं, ह्या कामात जर आपण विलंब लावूं तर बंगालचे गरीब उत्तरोत्तर यमालयाकडे जातील. यमराजाचें बोलावणें आलें म्हणजे आपण कधीं असें म्हणतों का कीं, 'मित्रा, जरा थांब कीं! दोनतीन महिन्यांनीं तर उसंत देशील!'...

"निवडणुकीचें एक स्वतंत्र महत्त्व आहे हें मी देखील मान्य करतों. परंतु घराला आग लागली तरी देखील आपण निवडणूक लढवीत राहूं का? आणि मी विचारतों, आपल्या खेड्यांना आग लागायची शिल्लक आहे का? साडेतीन वर्षांपासून मी सतत हिंडत आहें. उन्हाळ्यात कुठे थांबत नाहीं,

थर्डीत कुठं नसत नाहीं नी पावसात विश्राति घेत नाहीं. कारण मी हे पाहतोंय आणि ओळखतोय कीं, ह्या कामात उशीर झाला तर देशाला आग लागेल जगाचे नी आपल्या देशाचें जें दर्शन मला होत आहे तें जर तुम्हाला झालें तर तुमच्या ध्यानात येईल कीं, आपण एका ज्वालामुखीवर बसलों आहोत ”

मागे एकदा बिहारमध्यें ते म्हणाले होते, “ देवानें हृदयाला खिडकी दिली असती तर माझ्या हृदयात काय जळतय त तुम्ही पाहू शकला असता. ” — त्या आगीचे चटके त्याना स्वस्थ बसू देत नाहीं. नित्य फिरवत असतात.



: ३ :

## दया आणि करुणा

मेजीया
३ जानेवारी ’५५

सनईवर भैरवीचे गोड सूर ऐकू येत आहेत, प्रत्येक घरासमोरील अल्पना, कुंभ, दीप व धूप यांच्याळे वातावरणात प्रसन्नता पसरली आहे, आणि थेट वदिक पद्धतीनें पुष्पवृष्टीबरोबर च लाह्याचा हि वर्षाव होत आहे अशा थाटात आज गावात प्रवेश झाला. “ बंगालमधें पूजेवाचून सुटका नाहीं ” असें बाबा म्हणत होते. मुक्कामावर पोंहचलों. स्वागताला जमलेल्यासमोर नित्यक्रमानुसार त्यानीं जें भाषण केले त्यात युग बदललें त्याप्रमाणें आचरण हि बदललें पाहिजे याचें सुदर विवेचन होत.

“ हिंदुस्थानात जिथें गेलों तिथें लोकानीं मोठ्या प्रेमानें माझें स्वागत केलें. पण भूमिहीनाना जमीन मिळेल, गरिबाना मदत मिळेल तेव्हा च माझें स्वागत होईल .. उत्सवांत “ पत्र पुष्प फल तोयम् ” तर असतें च पण आज मीं पाहिलें, स्वागत करताना लाह्याचा हि वर्षाव केला. ही अगदीं जुनी पद्धत आहे लाही खाण्याचा पदार्थ आहे, तो असा रस्त्यावर का फेंकावा ? प्राचीन काळात अन्नाची तूट नव्हती परंतु तरी हि असं फेकणे

योग्य नाहीं. ही जी पद्धत चालत असे त्यात एक दृष्टि होती कीं, स्वागत समारंभात पाखरांना देखील भाग घेता यावा. समारंभाचा आनंद माणसापर्यंत च सीमित का ठेवावा ? माणसें पाटेवरून निघून गेलीं कीं पाखरें वाटेवर फेकलेल्या लाह्या खातील, म्हणजे त्यांनीं हि उत्सवात भाग घेतल्यासारखें होईल व त्याचा आशीर्वाद हि मिळाल्यासारखा होईल पण मी म्हणतों, त्यांना अशा लाह्या देण्याची काय जरूर ? भूमिहीनांना जमीन मिळाली कीं त्यात ते पीक काढतील नी तें पाखरें खातील च सर्व च मंगल कार्यांत साऱ्या सृष्टीचा च आशीर्वाद असतो ''

एकदा आश्रमात एका हरिजन कन्येचा विवाह होता वैदिक ब्राह्मण पुरोहिताचें काम करायला तयार झाले. विवाहविधीची चर्चा निघाला. त्या वेळीं लोकांना विनोबांचें एक नवीन च दर्शन घडलें — प्राचीनाहून प्राचीन व नव्याहून नवी अशी ही व्यक्ति न्यारी च आहे हा अनुभव साऱ्यांना आला.

विवाहविधीमध्यें अग्निसाक्षीनें सारे विधी लागतात अग्नीमध्ये तुपाची आहुति द्यावी लागते. त्या काळीं जंगल भरपूर होतीं नी तुपाची हि तूट नव्हती परंतु या काळात गरिबांना औषधाला हि तूप मिळणं दुरापास्त होऊन बसलें आहे. आणि वैदिक विधींमध्ये तर अग्नींत च आहुति देण्यास सांगितलें आहे विनोबांनीं सुचवलें, दीप ठेवा. दीप हा अग्नि च आहे ना ! आणि एक ताम्रपात्र ठेवा. त्यावर अग्नीचें नाव लिहायचें व "अग्नय स्वाहा" म्हणून त्यात तूप टाकायचं. आपली ही सूचना वैदिक ब्राह्मण मान्य करतील कीं नाहीं अशी शंका वाटून विनोबांनीं शास्त्रात आधार शोधला शास्त्रात म्हटलें आहे, ज्या देवता असतात त्या अक्षरदेवता असतात. अग्नि म्हणजे "अ, ग्, नि" इंद्र म्हणजे इ, न्, द्, र याप्रमाणें विनोबांनीं ब्राह्मणांना समजावलं व त्यांनीं विनोबांची सूचना कबूल केली व मग तदनुसार तो विधि पार पडला. अग्निपात्रात टाकलेलें तूप साऱ्यांना प्रसाद म्हणून मिळालें.

स्वागताकरता लाह्या फेंकणाऱ्यांना विनोबांनीं ही गोष्ट सांगितली. लोक कधीं कधीं विचारतात, "हा भूदान यज्ञ कसा बुवा ? यात नाहीं तूप नी

नाहीं अग्नि !"... यावर चटकन् म्हणतात, "यांत जो अग्नि आहे तो साधासुधा नाहीं. चांगला तेजस्वी आहे. आणि ह्या अग्नीमध्यें आहुति द्यायची ती तुपाची नव्हे, हृदयाच्या स्नेहाची आहुति द्यायची. ह्यांत काष्ठ जळण्याऐवजीं ममता आणि स्वामित्वाची भावना जाळून टाकायची."

बिहारमध्यें पडद्याची प्रथा असल्यामुळें तेथील सभांमध्यें स्त्रिया पाहण्याची संवय च नव्हती. त्यामुळें मुक्कामावर यात्रीदलाची व्यवस्था करण्यांत स्त्रिया सभेला स्त्रियांची संख्या जवळ जवळ शून्य असे. परंतु इथें मात्र अगदीं उलट स्थिति दिसते. सभेला तर त्या झुंडीनें येतात च. पण आमच्या-बरोबर यात्रेंत कस्तुरबा ट्रस्टच्या सेविका आहेत. कुणी सकाळीं नारळाच्या तगारींत खोबरें किसताना दिसेल, तर कुणी भाजीच्या ढिगाजवळ, कुणी पोळ्या शेकताना, प्रेमानें वाढताना तर कुणी बायांच्या खोलीसमोर रांगोळी काढताना दिसतील. चटचट कामें उरकताना त्यांच्या मुखावरचें स्मित स्वच्छतेंत कधीं फरक पडत नाहीं. त्यांची टापटीप, नीटनीटकेपणा डोळ्यांत भरतो.

ना काहीं आध्यात्मिक कारण असलें पाहिजे मी ह्यावर चिंतन करीत होतो. जीवनाचे जे स्थूल दोष असतात, त्यांचे उगमस्थान बहुधा माणसाच्या आध्यात्मिक चिंतनात आढळते इथें वैष्णवांची भक्तिधारा वाहिली त्यात अपार गुण होते. परंतु त्या च बरोबर किंचित दोष हि राहून गला. तो असा कीं, येथील भक्ति भावावेशात वाहू लागली त्याचा परिणाम होऊन येथील हृदयाचा विकास झाला. परंतु भगवद्गीतेत सांगितल्याप्रमाणें त्या भक्तीला कर्मयोगाचें रूप मिळालें नाहीं, .. वाफेच्या जोरावर एंजिन चालतें. पण ती वाफ जर हवेंत सोडून दिली तर त्यात काहीं शक्ति रहावयाची नाहीं ती आत ठेवली जाते म्हणून त्यात एक प्रकारची शक्ति राहते. भक्तिभावाला हि आत च कोंडून ठवलें पाहिजे गात गाऊन किंवा अश्रु ढाळून जर भक्तीला वाट करून दिली तर तिची शक्ति क्षीण होईल. हृदयात भावना साचली म्हणजे माणूस रडू लागतो. भावनेच समाधान झालें कीं मन हलकें होतें, रिकाम्या झालेल्या मनात भक्ति चोवीस तास आप्लावित कशी राहील ? ''

विनोबा बोलत होते आणि अतुल्यरामूबरोबर इतर हि कार्यकर्ते मन लावून ऐकत होते. भाषणाच्या अनुवाद होई त्यामुळें मी भोंवतीं मधून दृष्टि टाकण्याचा उद्योग करीत होतें ... " म्हणून च आध्यात्मिक चिंतनात भक्तीला कर्मयोगाचे रूप कसें मिळेल हे पाहण्याची आवश्यकता आहे. एखादा दुःखी तुमच्यासमोर उभा आहे त्याच्याकरता सहानुभूति वाटून तुम्ही रडला, पण त्याचें दुःख निवारण्याकरता जें करावयाचें तें केलें नाहीं तर तुमच्या रडण्याचा काय उपयोग ? भक्तिभावाला काहींना काहीं करण्याची प्रेरणा होते, त्याला कर्मयोगाचे रूप मिळते तेव्हा त्याला ' करुणा ' म्हणतात. ' करुणे 'चा अर्थ च हा आहे—काहीं तरी करणें, नुसती दया पुरेशी नाहीं, करुणेची गरज आहे. म्हणून च वाटतें कीं, बंगालच्या भक्तिभावाला नवीन रूप द्यावें लागेल ''

अनेक दिवसापासून रोगी बिछान्याला खिळला आहे. सर्व तऱ्हेच्या डॉक्टर्सकडून तपासून घेतलें पण रोग बरा हि झाला नाहीं व त्याचें कारण हि कळलें नाहीं. अशा एखाद्या हट्टी रोगाचे अचूक निदान गवसावें म्हणजे कोण आनंद होतो ! ..तस्सा आनंद कार्यकर्त्यांच्या मुखावर झळकत होता.

" शरीर परिश्रमाची निष्ठा निर्माण होण्याकरता शिक्षणपद्धतींत सुधार करावा लागेल. विद्यार्थी व शिक्षक दोघांनीं मिळून दररोज निदान एक तास तरी घाम गाळून परिश्रम करायला हवा दुसरें म्हणजे, जो जमिनीची मशागत करणार नाहीं त्याची जमीन राहणार नाहीं, एवढे च नव्हे, तर त्या जमिनीवर त्याचा हक्क हि राहणार नाहीं. तिसरी महत्त्वाची गोष्ट ही कीं, वकील डॉक्टर, व्यापारी या सर्वांना एक व्रत च घ्यायला हवें कीं, रोज कमींत कमी अर्धा तास तरी काहींना काहीं उत्पादक श्रम केल्याखेरीज न जेवणें अशा प्रकारची राष्ट्रीय उपासना च सुरू झाली पाहिजे "

टाळ्यांच्या गजरात भाषण संपलें तेवढ्यात एक गृहस्थ उठून उभे राहिले अनेक प्रश्नार्थक मुद्रा त्याच्याकडे वळतात न वळतात तो च ते बोलू लागले, " भूदान मूलक, ग्रामोद्योग प्रधान अहिंसक क्रांतीला मी माझें जीवन समर्पण करीत आहें. "

हर्षभरानें आशादेवी बाबाजवळ येऊन सांगू लागल्या, " डॉ निपिन-चंद्रांच्या जीवनदानामुळें बॉकुडा जिल्ह्यातल्या कामाला फार मोठा आधार मिळाला आहे.

गेलीं कित्येक वर्षे आशादेवी सेवाग्रामला नई तालीमचा महान् प्रयोग करीत होत्या पण मूळच्या बंगाली म्हणून गेले दोन तीन महिने बाबांच्या बंगाल यात्रेची तयारी करीत, भूदान मागीत, सर्वोदय विचाराचा प्रचार करीत या भागात हिंडत होत्या. आता हि बाबांची यात्रा सुरू झाल्यापासून व्यवस्थेंत किंचित् हि उणीव राहू नये म्हणून त्या अहोरात्र झटत आहेत सर्वांच्या खाण्या पिण्याची, राहण्याची व्यवस्था नीट झाली कीं नाहीं, नाना्ना शांति, एकांत जागा कुठें मिळेल, इत्यादि सर्व त्या जातीनें पाहतात. शिवाय नित्याचीं कामें आटोपून सभेच्या वेळीं बाबांच्या भाषणाचा अनुवाद करायला तयार होतात रात्रीं सारें आटोपलें कीं, त्याना म्हणावें, " मा, तुम्ही थकला असाल ! दिवसभर आडवं व्हायलादेखील झालं नाहीं आज लवकर झोपा ना ! " तर त्यावर प्रसन्नतेनें हसून म्हणतील, " थकलें नाहीं ग पण थांब, आता पुढच्या पडावावर जाऊन तिथें पदी काय व्यवस्था आहे ती पाहून येतें .. आणि, हें बघ,

आज ते पाहुणे आले आहेत ना ? त्यांची तब्येत बरी नाहीं तेव्हा डॉक्टरकडे हि जाऊन येते "— आणि पाहता पाहता त्यांची जीप डोळ्याआड निघून जाते



## : ४ :
## ' वंदे मातरम् '

बनसूरीया
४ जानेवारी '५८

राजस्थानचे माजी मुख्य मंत्री श्री. हिरालाल शास्त्री गेले काहीं दिवस यात्रेंत आहेत आज वाटेंत त्यांचेशीं चर्चा करताना बाबांनीं इतकीं वेचन मोक्तिक उधळलीं कीं वेचता वेचता माझी अगदीं त्रेधा उडून गेली. "सगुण निर्गुणाचा वाद अगदीं अर्थशून्य आहे माणसाला दोन्हींची आवश्यकता भासते मूर्ति फोडणाऱ्या निर्गुण भक्ताला मी नेहमीं म्हणतों कीं, मूर्ति फाडण्याची जरूर च काय आहे ? ज्या क्षणीं माझी त्या मूर्तीवरची श्रद्धा नष्ट झाली त्या च क्षणीं माझ्या दृष्टीनें ती मूर्ति भग्न झाली नी त्या जागीं नुसता दगड च उरला मग आता त्या दगडावर कशाला प्रहार करायचा ? उपनिषदात म्हटल आहे 'एक सत् विप्रा बहुधा वदन्ति' मुसलमान लोक 'एक सत्' तर मानतात पण ते 'मूर्खा बहुधा वदन्ति' अस म्हणतात "

आमच्या यात्रेत निरुपमादेवी सेन आहेत बंगालच्या उत्तम कवयित्री म्हणून त्या प्रसिद्ध आहेत नाना तऱ्हेची सुंदर रांगोळी चित्रित करताना त्यांच्या कुशल हाताकडे पहात राहावस वाटत त्यांच्या मुखातून रवींद्र संगीताची गोड लकेर ऐकता च त्या शांतिनिकेतनच्या विद्यार्थिनी आहेत हें ध्यानात यायला वेळ लागत नाहीं दररोज प्रार्थनपूर्वीं अर्धा पाऊण तास स्वरचित भूदान कीर्तन करून त्या श्रोतृवर्गाला तल्लीन करतात अशा वेळीं

" शरीर परिश्रमाची निष्ठा निर्माण होण्याकरता शिक्षणपद्धतींत सुधार करावा लागेल. विद्यार्थी व शिक्षक दोघानीं मिळून दररोज निदान एक तास तरी घाम गाळून परिश्रम करायला हवा. दुसरें म्हणजे, जो जमिनीची मशागत करणार नाहीं त्याची जमीन राहणार नाहीं, एवढे च नव्हे, तर त्या जमिनीवर त्याचा हक्क हि राहणार नाहीं. तिसरी महत्त्वाची गोष्ट ही की, वकील डॉक्टर, व्यापारी या सर्वांना एक मत च घ्यायला हवें कीं, रोज कमींत कमी अर्धा तास तरी काहींना काहीं उत्पादक श्रम केल्यावाचून न जवणें अशा प्रकारची राष्ट्रीय उपासना च सुरू झाली पाहिजे "

टाळ्यांच्या गजरात भाषण संपलें तेवढ्यात एक गृहस्थ उठून उभे राहिले अनेक प्रश्नार्थक मुद्रा त्यांच्याकडे वळतात न वळतात तों च ते बोलू लागले, " भूदान मूलक, ग्रामोद्योग प्रधान अहिंसक क्रांतीला मी माझे जीवन समर्पण करीत आहें "

हर्षभरानें आशादेवी बाबाजवळ येऊन सांगू लागल्या, " डॉ विपिनचंद्रांच्या जीवनदानामुळें नॉकुडा जिल्ह्यातल्या कामाला फार मोठा आधार मिळाला आहे.

गेलीं कित्येक वर्षें आशादेवी सेवाग्रामला नई तालीमचा महान् प्रयोग करीत होत्या पण मूळच्या बंगाली म्हणून गेले दोन तीन महिने बाबाच्या बंगाल यात्रेची तयारी करीत, भूदान मागीत, सर्वोदय विचाराचा प्रचार करीत या भागात हिंडत होत्या. आता हि बाबाची यात्रा सुरू झाल्यापासून व्यवस्थेंत किंचित् हि उणीव राहू नये म्हणून त्या अहोरात्र झटत आहेत सर्वांच्या खाण्या पिण्याची, राहण्याची व्यवस्था नीट झाली कीं नाहीं, बाबाना शांति, एकांत जागा कुठें मिळेल, इत्यादि सर्व त्या जातीनें पाहतात शिवाय नित्याचीं कामें आटोपून सभेच्या वेळीं बाबाच्या भाषणाचा अनुवाद करायला तयार होतात रात्रीं सारें आटोपले कीं, त्याना म्हणावें, " मा, तुम्ही थकला असाल ! दिवसभर आडव व्हायलादेखील झाल नाहीं आज लवकर झोपा ना ! " तर त्यावर प्रसन्नतेने हसून म्हणतील, " थकले नाहीं ग पण थांब, आता पुढच्या पडावावर जाऊन तिथें कशी काय व्यवस्था आहे ती पाहून येतें . आणि, हें बघ,

आन ते पाहुणे आले आहेत ना ? त्याची तब्येत बरी नाहीं तेव्हा डॉक्टरकडे हि जाऊन यतें "— आणि पाहता पाहता त्यानी जीप गोळ्याआड निघून जाते



## : ४ :

## ' वंदे मातरम् '

रनसूरीया
४ जानेवारी '६८

राजस्थानचे माजी मुख्य मत्री श्री हिरालाल शास्त्री गेले काहीं दिवस यात्रेत आहेत आज वार्तेत त्याचेशीं चर्चा करताना बाबानीं इतकीं वेचन मौक्तिक उधळलीं की वेचता वेचता माझी अगदीं त्रेधा उडून गेला "सगुण निर्गुणाचा वाद अगदीं अर्थशून्य आहे माणसाला दोन्हींची आवश्यकता भासते मूर्ति फोडणाऱ्या निर्गुण भक्ताला मी नेहमीं म्हणतों कीं, मूर्ति फोडण्याची जरुर च काय आहे ? ज्या क्षणीं माझी त्या मूर्तीवरची श्रद्धा नष्ट झाली त्या च क्षणीं माझ्या दृष्टीने ती मूर्ति भग्न झाली नी त्या जागीं नुसता दगड च उरला मग आता त्या दगडावर कशाला प्रहार करायचा ? उपनिषदात म्हटल आहे 'एक सत् विप्रा बहुधा वदन्ति' मुसलमान लोक 'एक सत्' तर मानतात पण त 'मुर्खा बहुधा वदन्ति' अस म्हणतात "

आमच्या यात्रत निरुपमादेवी सेन आहेत बगालच्या उत्तम कवयित्री म्हणून त्या प्रसिद्ध आहेत नाना तऱ्हेची सुदर रागोळी चित्रित करताना त्याच्या कुशल हाताकडे पहात राहावस वाटत त्याच्या मुखातून रवींद्र सगीताची गोड लकर ऐकता च त्या शातिनिकेतनच्या विद्यार्थिनी आहेत हें ध्यानात यायला वेळ लागत नाहीं दररोज प्रार्थनेपूर्वी अर्धा पाऊण तास स्वरचित भूदान गीतां करून त्या श्रोतृगणांना तल्लीन करतात अशा वेळीं

जनसेवेला समर्पण केलेली त्याची कला हलकें च सूचित करते कीं, नोआखालींत दु:खितांचीं आसवं पुसणाऱ्या 'एकाकी पथिक' ज्या त्या परमभक्त आहेत. साठी उलटली आहे त्याची. परंतु त्याना रूप देताना देवान त्याच नाव सार्थक होईल अशी काळजी घेतलेली आज हि स्पष्ट दिसते. त्या आमच्या 'माशीमाँ' (मावशी) झाल्या आहेत. वांग मला भारी आवडत. तेव्हा जेवताना मला 'बेगुनभाजा' (तळलेल वांग) आणि निर्मला जरा अशक्त म्हणून तिला दहीं वाढायला त्या कधीं चुकत नाहींत. दहा बारा मैलाची वाट चालून मुक्कामावर पोहचलें कीं मायेने जवळ घेऊन पाठीवरून हात फिरवून त्या विचारतात, "थकलीस का?" अन् मग अशा वेळी त्याची कला, संगीत, काव्य, सेवा, रूप इ० सर्व गोष्टींचा विसर पडतो आणि त्याच्या मातृवात्सल्याची अखंड अनुभूति तेवढी होऊं लागते.

बाबाची वाट पहात जनता सभास्थानावर जयघोष करीत होती 'वंदे मातरम्!' हा जयघोष अनेक महिन्यानंतर इथें ऐकू येत होता त्या मंत्राची शक्ति भरतभूमीमध्यें प्रकटली होती. असंख्य तरुणानीं त्या मंत्राच्या सामर्थ्यावर प्राणाची आहुति हसत हसत दिली होती कुणी फासावर चढला होता तर कुणीं बरगडींत गोळ्या झेलल्या होत्या. 'वंदे मातरम्' म्हणत भारताचा ध्वज उच्च फडकावत कित्येक हुतात्मे पुढें निघून गेले. आज विनोबा म्हणत होते, "मी जे काम करीत आहे ते बंगालला नवें नाहीं त्याचा उगम तर बंगालमध्ये च झाला बंकिम ऋषीनें एक मंत्र दिला. त्यानें सा या भारताला व्यापलें. त्याचा परिणाम म्हणून च भारताला राजकीय स्वातंत्र्य मिळालें. मी तरी दुसर काय सांगतोंय? हं च म्हणतों ना? 'वंदे मातरम्.' भूमि आपली माता आहे आणि आपण सारे तिचे पुत्र आहोंत. मातेचा नी पुत्राचा वियोग झाला तर ती किती कष्टी होईल! जरा विचार तर करा!"

आज 'वंदे मातरम्'मधें एक नवीन अर्थ भरला जात होता. हा मंत्र असा च देशाच्या कानाकोपऱ्यात जाईल आणि अनेकाना पुनश्च प्रेरणा देईल 'वंदे मातरम्' स्त्रियांच्या घोळक्यातून नाजूक आवाज आला.

सभास्थानाजवळ पोहचत असताना विनोबा आणि त्यांच्या मागून चालणाऱ्या सार्थांनीं हात वर करून प्रत्युत्तर दिलें, ' वंदे मातरम् '. आसमंतात एक च ध्वनि निनादू लागला ... " वंदे मातरम् ".

कालच्या च विषयावर अधिक सखोल विवेचन करीत विनोबा म्हणाले, " वैष्णवांनीं इथें भक्तिभाव निर्माण केला, पण त्यात निष्क्रियता होती. म्हणून देशात सक्रियता निर्माण व्हायला पाहिजे, कर्मयोगाची प्रेरणा झाली पाहिजे, त्याची अत्यंत आवश्यकता आहे, असें मीं काल सुचविलें होतें. असें पूर्वी बंगालमध्यें कुणाला सुचलें नव्हतें असें नाहीं. इथें सक्रियता आली होती परंतु ती हिंसक होती आणि तिनें अत्याचाराचें रूप धारण केलें होतें. वैष्णवांच्या भक्तिभावयुक्त निष्क्रियतेनें काम होणार नाहीं, ती कुचकामी आहे, असें वाटून येथील युवकांनीं कर्मयोग सुरू केला. तो हिंसक होता. म्हणजे एक दोष नाहींसा झाला. निष्क्रियता गेली. पण नवीन दोष– हिंसा– आला त्यानें शक्ति वाढण्याऐवजीं क्षीण झाली. आता असें करायला पाहिजे— वैष्णवांची अहिंसा व तरुणांची सक्रियता दोन्ही हवीं, म्हणजे थोडक्यात अहिंसायुक्त कर्मयोग आचरायचा. भूदानाचें आंदोलन म्हणजे अहिंसायुक्त कर्मयोग च आहे. ह्यानें बंगालची चित्तशुद्धि होईल व प्राणशक्ति वाढेल "

एकदा या ' अहिंसायुक्त कर्मयोगा 'चें मर्म ध्यानात आलें तर भारतीय जनता ' द्वि सप्त कोटि भुजा 'नीं दान देऊ लागेल यांत बाबांना शंका राहिली नव्हती. " त्यानें मला जमीन मागण्याची प्रेरणा दिली तो च जनतेला जमीन देण्याची प्रेरणा देईल " — असा त्यांचा भक्तहृदयाचा अमर विश्वास ह्या विश्वास अनाठायीं आहे असें जर उद्या आढळलें तर ' मला मागण्याची प्रेरणा का दिलीस ? ' म्हणून ते देवाला जाब विचारल्यावाचून राहणार नाहींत !

## : ५ :

# एक पत्र !

अमरकानन
५ जानेवारी '५५

बाँकुडा जिल्हा काँग्रेसचे चिटणीस के. गोविंदबाबू रामकृष्ण परमहंसाचे भक्त आणि भूदान यज्ञात निष्ठेनें काम करणारे सेवक होते. आसपासच्या गावातील गोरगरिबांचे ते कैवारी होते. "विनोबा इथें पोंचल्यानंतर भूदानाकरता जीवन समर्पण करायचें" असें त्यानीं ठरवून ठेवले होतें. परंतु ईश्वराची इच्छा वेगळी च असावी. त्यानें गोविंदबाबूंनी जीवनयात्रा नुकती च संपवली. त्याच्या प्रेरणेनें गावकऱ्यानीं बांधलेली काल्ची ती झोपडी सांगत होती कीं, ते भूदानकार्यांत रंगले होते. बाबा त्या झोपडींत राहून गेले कीं तिथें सर्वोदय आश्रम चालू करण्याचें त्यानीं मनात योजलें होते. त्या झोपडीचें उद्घाटन काल च बाबानीं केले होतें आज त्याच्या शांत आश्रमात निवास होता.

शेजारच्या खेड्यातील जे लोक बाबाच्या दर्शनाला व स्वागताला येत होते त्याच्या हृदयात गोविंदबाबूंच्या सतत सेवेविषयीं अपार श्रद्धा आढळली.

आश्रमाच्या आवारात मध्यभागीं रामकृष्णाचें मंदिर उभें होतें. शेजारीं च त्याच्या भक्ताची— गोविंदबाबूंची—समाधि होती. फळा फुलांच्या झाडानीं अंगणाला नटवलें होतें. बाबा एका विशाल आम्रवृक्षाखालच्या व्यासपीठावर बसले होते गोविंदबाबूंच्या स्मृतीनें वातावरणात गांभीर्य निर्माण झाले होते. कांहीं क्षण स्तब्ध राहून बाबा एकेक शब्द शांतपणें उच्चारू लागले— गोविंदबाबूंच्या अव्यक्त स्वाला अभ्दपुले ग्राहिरी जात होती. "गोविंदबाबूंसारखा निष्ठावान् सेवक इथें निपजावा हें या जिल्ह्याचें भाग्य च म्हटलें पाहिजे. गीतेंत सांगितलं आहे कीं, अंतिम क्षणाला मनुष्याची जी भावना असते त्यानुसार त्याला गति मिळते महात्मा गांधी प्रार्थनेला जात होते, त्या वेळीं प्रार्थनेच्या भावानें त्यानें मन भारलें होतं. गेल वर्षभरा त्याना रिथिर उर्वार झाला होता. जाता जाता परमेश्वरानें त्याना अत्यगत उच्च [illegible]

नेले. तसे च गोविंदरावूंचे मन त्या क्षणीं भूदानमय झाले होते त्याच वेळीं परमेश्वराने त्याना नेले . आणि भूदानाच्या कार्याची जबाबदारी त्यांच्या मित्रावर सोंपवून दिली."

सत्पुरुषाच्या मृत्यूनंतर हि त्यांच्या अव्यक्त रूपात किती काम होऊ शकतें ह्याचे प्रत्यंतर आज येत होते.

ॐ अक्षर लिहिलेला एक फोटो नेहमीं विनोबांच्या खोलींत असतो. त्या फोटोच्या मागे इतिहास च आहे. तो फोटो मूळ बापूंच्या खोलींतला. त्याच्यानंतर किशोरलालभाईंकडे आला व त्याच्यानंतर बाबांकडे आला. अधून मधून तो फोटो समोर ठेवून ते ध्यान करीत असतात. त्या फोटोच्या कोपऱ्यात धुळीचे कण साचलेले आज आढळले ते पाहून विनोबा म्हणाले, "अस्वच्छता असली म्हणजे ध्यान होत नाहीं. आधीं ते साफ करा." मागे एकदा बिहारमध्ये एका शाळेत मुक्काम होता. शाळेत सरस्वतीपूजनाचा उत्सव आदले दिवशीं च झाला होता केळीच्या साली, कागदाचे तुकडे, सिताफळाच्या बिया आवारात पडल्या होत्या. वर्गाच्या खोल्या आमच्याकरता रिकाम्या केल्या होत्या. बेंचेस, खुर्च्या वेडयावाकडया पडल्या होत्या ते दृश्य पाहून विनोबा खोलींत न शिरता चटकन् ते साफ करायला लागले. त्यांच्या मागोमाग सारी च मंडळी धावली. शाळेचीं मुलें व शिक्षक त्यात सामील झाले. अर्धवट जळक्या उदबत्त्या आणि विडीचीं थोटके उचलत बाबानीं त्या मुलाना विचारले, "अशा जागीं देवी सरस्वती प्रवेश करील का रे ?" त्या मुलानीं माना खाली घातल्या. त्यापैकीं एक हळू च पुटपुटला, "नाहीं बाबा ! ती नाहीं येणार !" ... Cleanliness is Godliness असें ते नेहमीं च म्हणतात.

सूत कातताना विनोबा नेहमीं खालीं काळा कपडा ठेवतात. आज तो लवकर सापडेना, तेव्हा काळी घोंगडी च घेऊन बसले व "काळी घोंगडी, काळी काठी ! काळा दोरा कठीं बोली महाराची येट मऱ्हाटी" गुणगुणू लागले. मधें च थांबून माझ्याकडे पाहत म्हणाले, "कॉलेजमधल्या मुलीला कशाला माहीत असेल हें गाणं ?" मग हसत उद्गारले, "काल इज्यते यत्र स"—जिथ काळाचा होम होतो तें कॉलेज !" कॉलेजच्या डिग्रीची ते नेहमीं च अशी थट्टा करीत असतात.

आजकाल महादेवीताईंना बाबा शांकरभाष्य व गीता शिकवतात. आज त्या बाबांना म्हणत होत्या, "तुम्ही आतां सूत कांतणार मग शिकवणार कसं ?" बाबा म्हणाले, "त्याची नको काळजी. गीता आणा तुम्ही. एकीकडे आमचा चरख्याचा शंखनाद चालेल आणि दुसरीकडे 'भगवद्-गीता' 'धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे' चालूं द्या."

श्री. बाळासाहेब खेरांच्या हस्तें गागोद्याला (बाबांचें जन्मस्थान) भूमिवितरण झाल्याची बातमी आजच्या वर्तमानपत्रांत होती. ती ऐकून बाबांनीं स्वतः हातानें त्यांना पत्र लिहिलें. त्यातल्या प्रसादाचा स्पर्श हृदयाला झाल्यावाचून राहिला नाहीं.

"— आज मीं वाचलें कीं, आपल्या हातून गागोद्याला भूमिवितरण झालें आणि तिथें आतां कुणी भूमिहीन राहिला नाहीं. दुसऱ्या गोष्टीचा मला आनंद झाला च पण पहिलीचा विशेष झाला. मला वाटलें, भूदान-यज्ञाचें काम नेमकें आपल्या मनोभावाला जुळण्यासारखें असावें. ईश्वर आपणास या कामात उडी घेण्याची प्रेरणा देईल तर सर्वांना किती आनंद होईल !

"हिंदुस्थानची आणि जगाची सोडवणूक पक्षयुक्त राजनीतीने होणार नाहीं, पक्षरहित लोकनीतीनें होईल, अशी माझी धारणा झाली आहे. आपणाला हि हा विचार हृदयंगम वाटला होता अशी हि माझ्या मनावर छाप आहे. या बाबतींत अधिक चिंतनाची गरज आहे. आपल्याकडे माझी सहज ओढ झाली आहे. यात ईश्वराची काय योजना असेल ती खरी.

"आपल्यावरील आपत्तीची बातमी बऱ्याच उशीरा, जलप्लवात दूर दूर फिरत असताना मला कळली होती. शातीसाठीं ईश्वराची प्रार्थना करून मीं समाधान मानलें होतें. — पाण्यापावसाचा आणि पुराचा मार खाऊन माझी तब्येत मध्यंतरीं जरा गडबडली होती. आता ठीक आहे. हरि नेईल तिथें जात आहें आणि करवील ते करीत आहे."

वर्धेहून दत्तोबा, भाऊ पानसे व नुकती च हिंदुस्थानात आलेली एक इंग्लिश महिला हे पाहुणे आज आले. दत्तोबा व भाऊ बाबांचे फार जुने व प्रिय शिष्य. त्यांच्याशीं बाबांच्या शिळोप्याच्या गप्पा सायंकाळीं सुरू होत्या.

पवनारच्या ( बाबाचा वर्धेजवळचा आश्रम ) विहिरींत पाणी किती चढल, शेतातील काम कुठवर आल, अमुक आजारी होता ना ? 'सेवक' ( मराठी मासिक )चे ग्राहक किती वाढले ? इ० विचारपूस बाबा करीत होते गुरुशिष्यामधला मोकळेपणा व जिव्हाळा मोठा गोड वाटला. बोलणें मराठींत सुरू होतें— बरे च दिवसानीं मराठी संवाद कानीं पडत होता म्हणून कीं काय, सार अधिक च गोड वाटलें.



## : ६ :

## निर्भयतेचा आधार आत्मा !

बिहारकुडिया
६ जानेवारी '७८

आज अभय आश्रमा ' त मुक्काम होता बंगालचे माजी मुख्य मंत्री डॉ प्रफुल्लचंद्र घोष हे ' अभय आश्रम ' या संस्थेचे आधारस्तंभ आहेत आश्रमाच्या अंगणात वटवृक्षाच्या छायेंत रांगोळ्यानीं सजविलेल्या पाटावर विनोबाकरता आसन तयार केलेले होत आठ दहा मैलाची वाट चालून आलेल्या पथिकाच्या कानावर मधुर, दृढ स्वर पडले

' शुभ कर्म पथे धर निर्भय गान ।
सब दुर्बल संशय होक अवसान ॥ '

— विनोबाचे डोळे मिटले होत, दृष्टि आत वळली होती

' चल चल यात्रि चल दिनरात्रि
कर अमृत लोक पथ अनुसंधान '

ईश्वरानें कवीच्या शब्दाद्वारें मार्ग आखला आणि पथिकाच्या पावलात प्राण ओतला ! नादमधुर, अर्थगंभीर गीतानें भारावलेल्या अवस्थेंत विनोबा बोलूं लागले, " बंगालपासून च साऱ्या हिंदुस्थानला विचाराची प्रेरणा मिळत गेली बंगालला मी नवा विचार तो काय देणार ? गंगेच्या पाण्याने च गंगेचें तर्पण करतात ना ? तद्वत च बंगालच्या च विचारधारेनें बंगालचें तर्पण मी करणार आहें.

भारतीय संस्कृतीच्या विविध प्रतीकांनीं नटलेली सुरेख रांगोळी लक्ष वेधीत होती. *तेवढ्यात कुटीतल्या एका चित्राकडे बाबांची दृष्टि वळली.* रामकृष्ण परमहंसांची एक कहाणी आहे. ते कांचनाला कधी च स्पर्श करीत नसत. एकदा चुकून त्यांना कांचनाचा स्पर्श झाला तर त्यांना विंचवाचा दंश झाल्यागत वेदना झाली त्या वेदनेंतील अवस्थेंत असतानाचें त्यांचें एक चित्र समोर टांगलेलें होतें. कितीतरी वेळ अनिमिष नेत्रांनीं ते त्यांकडे पाहत होते.

*खेड्यातील माळी व डोम ( हरिजन ) लोकांनीं आसपासच्या प्रदेशात* सांपडणाऱ्या वस्तूंनीं तयार केलेलें व्यासपीठ म्हणजे ग्रामीण कलेचा उत्कृष्ट नमुना होता च, परंतु त्या भावड्या जीवांचा स्नेह तिथें साकारला होता — त्यामुळें तें सारें विशेष गोड वाटलें.

'अहिंसाशास्त्रात निर्भयतेचें स्थान' ह्यावर आज विवेचन सुरू होतें. "आज आम्ही अभय आश्रमात बसलों आहोंत. पण आज सारें जग मात्र *भयानें एक महान् निवासस्थान बनलें आहे.* केवळ दुबळे देश च भीत आहेत असें नव्हे तर बलवान् राष्ट्रें देखील एकमेकांना भीत आहेत. निर्भय होण्याकरता शस्त्रास्त्रें वाढविण्याची स्पर्धा चालली आहे. परंतु निर्भयता हा आत्म्याचा गुण आहे. ती शस्त्रावर अवलंबून नाहीं. जो कुणाला भीत हि नाहीं नी कुणाला भिववीत हि नाहीं तो च खरा निर्भय ... आज अमेरिकेनें आपलें नेतृत्व अशा माणसाच्या हातीं सोंपवलें आहे कीं जो एक मोठा सेनापति आहे. वास्तविक देशानें नेतृत्व स्थितप्रज्ञाच्या हातीं सोंपवलें पाहिजे. त्याच्याऐवजीं एका लष्करी माणसाच्या हातीं नेतृत्व सोंपविलें जातें तेव्हा तो देश किती भयभीत आहे हें स्पष्ट च आहे. ह्याचा परिणाम असा होतो कीं, साऱ्या जगाच्या शांतीची भिस्त व आधार मूठभर लोकांच्या हातीं येतो. मूठभर माणसांच्या हातीं सारी सत्ता सोंपवणें अत्यंत चूक आहे. जोंपर्यंत जगात सर्वत्र सत्तेचें केन्द्रीकरण राहील तोंवर हा भीतीचा वावर कायम राहील ह्यात तिळमात्र शंका नाहीं. तेव्हा आतां अशी वेळ आली आहे कीं, जनतेनें हा विचार समजून घ्यावा कीं सत्तेचें विभाजन केलें पाहिजे, करावें लागेल आणि त्या द्वारें आपल्या समस्या स्वतः च सोडविण्याची शक्ति मिळवावी लागेल."



: ७ :

## जीवन संगीत

बॉगुडा
७, ८ जानेवारी '५५

शहर म्हटलें कीं लोकांचा समुद्र! लाटा येत राहाव्या तसे शहरात शिरताना लोकांचे थवे बाबांच्या रोखानें येत राहतात. प्रत्येक चौकावर स्वागताकरता द्वारें सजवलेलीं होतीं. दुकानओळींत, घराघरावर हि तोरणें लावलेलीं होतीं. मात्र अशा गर्दीच्या ठिकाणीं लोकांचें बाबांच्या पाया पडणें, गंध अक्षता लावणें यामुळें चालताना मळती च गैरसोय होते. विनोबांना तर हे सारें आवडत च नाहीं. म्हणून 'दाडिये प्रणाम' (उभ्या उभ्या नमस्कार करा) असें ते सारखे म्हणत होते. पण लोकांना ऐकायला फुरसत कुठे होती? गर्दीतून वाट काढून बाबांच्या चरणाला स्पर्श केल्यावाचून त्यांना कुठलें चैन पडायला! त्यामुळे गर्दी आटोक्यात येईना. शेवटीं बाबांनीं नेहमींचें अस्त्र काढलें. ते हवेशीं हितगुज करू लागले— वेगानें धावू लागले. 'शहरात धावणें हें देशील व्यवस्थेचें एक अंग आहे' असें ते म्हणतात. कारण अशा वेळीं वानरसेना सोडून बाकी सारे मार्गे पडतात. दीड दोन मैल धावणें झालें. बिहार सोडण्याच्या सुमारास एका अपघातात माझ्या पाठीला मार बसला होता. धावता धावता मधे च थांबून ते मला विचारू लागले, "तुझ तें दुखणं बरं झाल ना? मग आता दुसरी जखम व्हायला काहीं हरकत नाहीं. चल, पळू या."

धावत धावत निवासस्थानीं पोंहोंचलो अन् नवीन आशेचें खड्ग हातीं घेऊन विजयी वीराप्रमाणें नवजीवनाच्या प्रात काळीं तिमिराचें द्वार भेदून प्रवेश करणाऱ्या ज्योतिर्मयाचा जयजयकार करणारें रवींद्रगीत कानीं पडलें—

"भेंगेछो द्वार एसेछो ज्योतिर्मय। तोमारी होक जय।
हे विजयी वीर, नवजीवनेर प्राते। नवीन आशाय खड्ग तोमार हाते।"

गीत ऐकत असताना विनोबा समाधिस्थ झाले. नंतर एवढे च म्हणाले, " प्रातःकालच्या मंगल वेळीं तुम्हीं मला भक्तिभावानें भरलेलें गोड भजन ऐकवलें त्यानें जवळ जवळ माझी समाधी च लागली. इतकी भावभक्ति, हृदयाची इतकी मधुरता ज्या देशात आहे त्या देशाची शक्ति काहीं कमी नाहीं. भक्तिभावयुक्त मधुर संगीत त्यांच्या वाणींमधें, हृदयामधें नी कृतीमध्यें असेल त्यांच्यासमोर ॲटम आणि हैड्रोजनसारखीं मोठमोठीं नरसंहारी शस्त्रास्त्रें देखील टिकणार नाहींत. परंतु संगीत आणि भक्ति केवळ वाणींत असून चालणार नाहीं. कृतीमध हि उतरायला पाहिजे. भूदानयज्ञद्वारा सर्वांनीं च भक्तिमय, मधुर संगीतमय कृति करण्याची सुसंधि लाभली आहे ज्यांच्याजवळ जमीन वा संपत्ति असेल त्यांनीं त्याचा षष्ठांश द्यावा. ज्यांच्याजवळ दोन्ही नसेल त्यांनीं श्रमशक्तीचें दान द्यावें ज्यांच्याजवळ बुद्धि आहे त्यांनीं ती दरिद्रनारायणाच्या पूजेंत खर्च करावी काहीं लोकांनीं जीवन समर्पण करून या कार्याकरिता जीवनदान द्यावें. या आंदोलनात प्रत्येक व्यक्तीला प्रेमप्रकाशनाची संधि मिळते "

भाषण संपताच मी वीनादी व गोपालदा चें अभिनंदन करायला धावलें. त्या दोघांनीं हि आपल्या संगीतानें सर्वांना हि जिंकून घेतलं होतं गेले आठ दिवस साजासहित एक संगीत टोळी आमच्याबरोबर फिरते आहे तीं दोघें त्या टोळीचे प्रमुख आहेत. वीनादी नास्ता घेत होती. माझ्या तोंडात रसगुल्ला कोंबत आपल्या आवाजाइतकेंच गोड स्मित करून तिनें अभिनंदनाला उत्तर दिलें. गुरुच्या पिढण्यात गोपालदा गर्क झाले होते—त्यांच्या गंभीर चेहऱ्यावर किंचित् हास्याची रेषा उमटली.

पहाटेच्या प्रशांत वेळीं वीनादींच्या बंगालीतला 'ईश्वरायस्वपाट' नी पहाटे या रागातले रोजचें नवीन भजन ऐकत आमचा दिवस उजाडतो. सायंकाळीं सभेत "स्थितप्रज्ञ समाधिस्थ काय बोले हे केशव" ही मालकंस रागातली मधुर प्रार्थना ऐकून सारी सभा तन्मय होऊन जाते. मग विनोबांचें संगीताहून मधुर भाषण! दिवसभर संगीत टोळीची तालीम चालू असते विनोबांनीं सध्या प्रकृति उत्तम करण्याकरिता काहीं दिवस काम न करण्याचा हुकूम दिल्यामुळे मी दिवसभर वीनादींच्या टोळीबरोबर राहते. तिथें सारंगा रवींद्राचा मधुर निनाद एकं पायावा नी एवढे आमचा

टाइपरायटरचा टपटप आवाज आपलें काम म्हणजे 'संगीतमय कृति' आहे असें म्हणून मला समाधान मानावें लागतें.

बंगालात प्रवेश केल्यापासून विनोबा अहिंसेवर व कर्मयोगावर विशेष भर देत आहेत 'गीता प्रवचना' ची बंगालला अतिशय जरुर आहे असें ते परवा म्हणाले बंगालमध्ये भावनेची उत्कटता व तीक्ष्ण बुद्धि आहे. पण येथील भक्तीला निष्क्रियतेचें स्वरुप व कर्माला हिंसात्मक स्वरुप आलेलें. त्यामुळें 'ज्ञान, भक्ति व कर्म' ह्या तिहींचा समन्वय जीवनात करण्याचें तत्त्वज्ञान बंगालला हवें आहे. अहिंसेचें शस्त्र हें कोणत्याहि हिंसक शस्त्राहून अधिक प्रभावी आहे याची जाणीव बंगालच्या तरुणवर्गाला व्हायला हवी आहे इथे घरोघर विश्वबंधुत्वाचा पाठ देणारें रवींद्र संगीत ऐकू येतें, रामकृष्ण विवेकानंदाचे ग्रंथ दिसतात. अहिंसात्मक कर्मयोगाच्या नवविचाराचे बीजारोपण झाल तर बंगालच्या भूमींत उत्तम पीक येऊ शकेल, असा विनोबाचा विश्वास आहे. सकाळीं युवक संमेलनात विनोबानीं अहिंसाशास्त्रावर एक प्रबंध मांडला.

" आज जगभर हिंसेची शक्ति वाढविली जात आहे. हिंदुस्थान हि त्याच मार्गानें जाईल तर त्याला अमेरिका किंवा रशियाला गुरु करावें लागेल आणि पराधीन व्हावें लागेल. मग देशातील गरिबाकडे अर्थातच दुर्लक्ष होणार. तेव्हा दुसऱ्या म्हणजे अहिंसेच्या शक्तीचा आश्रय घेण्यात च आमचें कल्याण आहे. अहिंसेचा अर्थ केवळ हिंसा न करणें एवढा च नाहीं. अहिंसेचा एक अर्थ आहे निर्भय बनणें, दुसरा प्रेमयुक्त सहयोग आणि तिसरा विधायक कार्यात श्रद्धा ठेवणें. ही शक्ति जर वाढवायची असेल तर आपल्याला एक मत घ्यावें लागेल. आम्ही कोणाला भिणार नाहीं आणि कोणाला भिववणार नाहीं. आम्ही शरीर नसून आत्मा आहोंत. आमच्या शरीराला जर कुणीं त्रास दिला तरी हि आम्ही त्याला वश होणार नाहीं. समोरच्या माणसाचा विचार पटला तर मात्र त्याचा स्वीकार करू .. हाच वेदान्त."

" सर्व भेदासुराचा नाश करुन प्रेम आणि सहयोगाच्या तत्त्वावर नवी समाजरचना करु आमचीं साधनें विधायक राहतील. समोर कुणी तलवार घेऊन येईल तर आम्ही हातीं वीणा घेऊन जाऊ त्याची कर्कश वाणी राहील

तर आम्ही सुमधुर संभाषण करू. असत्याला सत्यानें जिंकायचें आहे. विध्वंसक कार्याला विधायक कार्यानें जिंकायचे आहे "

बंगालचे सर्वश्रेष्ठ साहित्यिक श्री. ताराशंकर बंद्योपाध्याय आज विनोबांना भेटले. त्यांनी संपत्तिदान दिलें आहे. विनोबा त्यांना म्हणाले, "मला तुमच्याकडून वाग्दान हवें आहे." ताराशंकरजी बंगालीमिश्रित हिंदींत बोलत होते. असंख्य तुषार उडवीत नाचत गात चाललेल्या धबधब्याप्रमाणें त्यांचा शब्दप्रवाह सुखकर वाटत होता. ते म्हणाले, "भारत कांहीं कायद्याचा देश नाहीं, अंतरींच्या प्रेरणेचा देश आहे सूर्याचा आलोक (प्रकाश) आणि उष्णता जशी सर्वत्र पसरते, तशीच तुमच्यासारख्या साधूंची सहज अलंकारविरहित भाषा जनतेला बोधमय होते ... कारण भारताची ही परंपरा च आहे कीं येथील राजे राज्यें फेंकून काषाय वस्त्र लेऊन बाहेर पडत ... बंगालला तुमची गरज आहे. तुम्ही पुन इथें या. आम्ही सर्व तुम्हाला सहयोग देऊं. केवळ राजकारणी लोकच नाहीं तर लेखक, संगीतज्ञ, शिल्पी, चित्रकार, सामान्य जनता सारे आम्ही तुमच्या मार्गे मार्गे येऊं. रवींद्रनाथांनीं लिहिलय, 'हे चिरसारथि नव रथचक्रे मुखरित पथदिन रात्रि' ... आमचा तो चिरसारथी आहे – सन्यासी ! सत्येंच, तुम्ही जरूर या. आमच्या बंगला देशांत पुनः या." ... ताराशंकरजी म्हणजे बंगालमधील एक फार मोठी शक्ति आहे. त्याचें आयुध आहे लेखणी ! ते गेल्यानंतर कार्यकर्त्यांना विनोबा म्हणाले, "वाल्मीकि तुमच्या हातीं आला म्हणजे रामायण तुमच्या हातीं आलेंच समजा."

जानकीदेवी बजाज यांची – विनोबांच्या भाषेंत – 'अखंड बालक वृत्ति' कायम आहे. बालकाच्या उत्साहानें त्या कूपदानाचें काम करतात, आणि विनोबांकडे आल्यावर आपल्या सहज विनोदानें त्यांना खूप हसवतात. गेले कांहीं दिवस त्या बाबुडाला घेऊन विहिरी बांधण्याकरता स्त्रियांना अलंकार-दान करण्यास प्रवृत्त करीत आहेत. त्या यात्रेंत असल्या कीं दागिने घेऊन व्यासपीठाकडे येणाऱ्या स्त्रियांची रीघ लागते. विनोबा तर दागिन्यांना कचराच समजतात. 'कचऱ्याचें काय दान करायचें, तो तर फेंकून द्यायचा असें हि ते सांगतात. "दागिन्यांनीं स्त्रियांना दाबून टाकलें आहे. निर्भय व्हायचें असेल तर दागिने फेंकून द्या." स्त्रियांना ते नेहमीं हाच संदेश

देतात. इथें आमचा मुक्काम एका धनाढ्य मारवाडी नधूच्या बागेंतील बगल्यात होता. बगल्याच्या चारी बाजूना तलाव होते. आमच्या यजमानानीं जानकीदेवीच्या प्रेरणेनें या जिल्ह्यात १०८ विहिरी बाधून देण्याचा सकल्प केला. जानकीदेवींचा आणखी एक प्रिय उपक्रम म्हणजे घूघट ठेवणाऱ्या मारवाडी स्त्रियाना विनोबाकडे आणून विनोबाना म्हणायच्या, "याना घूघट फेकून आमच्यासारखे हिंडायला सागा."



: ८ :

# परदेशी प्रवासी

ओन्दा
१ जानेवारी '५५

घाट चालून मुक्कामावर पोहचता च स्वागतार्थ आलेल्या जनसमुदायासमोर विनोबा आजकाल रोज एखादा नवा विचार सागतात आज म्हणाले, "आपला देश पूर्वेकडचा आहे. पूर्व दिशेला ज्ञानप्रभेचा उदय झाला. ह्याचे स्मरण करून देऊन त्यानीं 'विश्वभारती' चा उल्लेख केला. साऱ्या जगतातल्या लोकानीं तिथें येऊन एकमेकाच्या सस्कृतीच अध्ययन करावें हा 'विश्वभारता 'चा मूळ उद्देश. परतु सस्कृतीचें अध्ययन केवळ ग्रथानीं होत नाहीं तर सामाजिक जीवनानें होत असतें, असे सागून त्यानीं रवि‌बाबूचें स्वप्न साकार करण्याचा व क्रान्तीचा आदर्श नमुना उपस्थित करण्याचा आदेश दिला.

विनोबा नेहमीं म्हणतात, "भारतात एक फकीर प्रेमानें जमीन मागतोय व लोक त्याला प्रेमानें लाखों एकर जमीन देत आहेत, ही घटना युरोप, अमेरिकेंतील लोकाना चमत्कारासारखी वाटते. म्हणून हा चमत्कार पाहायला कित्येक स्त्री पुरुष इथें येतात. कायद्यानें जमीन वाटली गेली असती तर लोक असे पाहायला आले असते का?" आमच्या यात्रेंत

सतत कुणी ना कुणी परदेशी पाहुणा वा पाहुणी येत असतात च. कुतूहलाने आलेला एखादा विशींतला तरुण असो की ज्ञान-अनुभवाची शिदोरी घेऊन आलेला एखादा वयोवृद्ध प्राध्यापक असो, प्रत्येकजण हेंच म्हणत जातो, "जमिनीच्या आकड्याचें महत्त्व नाहीं, महत्त्व आहे अहिंसेच्या मार्गाचें. भारतात जर हा प्रयोग यशस्वी झाला तर जगाला हवा असलेला मार्ग मिळेल." गेले तीनचार दिवस यात्रेंत असलेली इंग्लिश महिला म्हणत होती, "फार भाग्यवान् आहेस तूं. मला मात्र आता अशी भीति वाटूं लागली आहे कीं जास्त दिवस इथें राहिलें तर मला परत जाण्याची इच्छाच उरणार नाहीं ... पण मी जरी गेलें तरी मला पत्र पाठवून यात्रेची

कालपासून एक अमेरिकन विद्वान् जोडपें बरोबर आहे. त्यांनी मोठ्या उत्सुकतेनें विनोबांना अमेरिकेकरतां संदेश मागितला. विनोबा म्हणाले, "My work is my message" [माझें काम हाच माझा संदेश आहे.] — हीं दोघें Quakers आहेत. आज त्यांनी आपल्या एका सभेचा वृत्तान्त विनोबांना सांगितला. "एकदा आम्ही निर्णय करूं शकत नव्हतों. आमचे सारे निर्णय सर्वसमतीनें च होतात. बराच वेळ झाला, निर्णय होऊं शकला नाहीं. मतभेद मिटेना म्हणून शेवटीं आम्ही कांहीं काळ शांत राहिलों. थोड्या वेळानें पुनः चर्चा सुरू केली. मतभेद मिटले. निर्णय झाला." हें ऐकतांच विनोबा म्हणाले, "Yes, silence is the greatest eloquence"

दुपारीं बंगाल प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या कार्यकारिणीची बैठक बाबांच्या उपस्थितींत झाली. पण ती पडद्याआड झाली. प्रां. कमिटीचे अध्यक्ष अतुल्यबाबू व चिटणीस श्री. नाहरजी यात्रेंत आहेत. भूदानाचें काम चालू ठेवण्याचा संकल्प त्यांनी केला आहे

"पराक्रमाचीं कामें श्रद्धेवाचून होत नाहींत. ज्ञानप्राप्ति देखील श्रद्धा असल्याशिवाय होऊं शकत नाहीं भक्तिमार्गाला तर श्रद्धेची अत्यन्त जरूर आहे. आजाऱ्याची सेवा करतांना हा कदाचित् मरेलहि अशी शंका नव्हे तर आपल्या सेवेनें शुश्रूषेनें तो बरा होईल ही श्रद्धा च मनांत असते. आज हजारों वर्षें हिंसेवर श्रद्धा ठेवून माणूस असफल प्रयोग करीत राहिला आहे. माझी मागणी एवढी च आहे—कीं आतां जरा अहिंसेवर श्रद्धा ठेवा आणि भूदानाचा प्रयोग करा — तुम्हाला फळ अवश्य मिळेल ..... साहित्याची शक्ति दुसऱ्या कुठल्याहि शक्तीहून श्रेष्ठ आहे. बंगालवर त्या शक्तीचा च परिणाम होतो." ताराशंकरबाबू बंगाली शब्द ऐकून खुष होत होते. साहित्याच्या शक्तीचा जेव्हां बाबा गौरव करूं लागले तेव्हां तर ते उड्या मारायचे च बाकी राहिले होते — इतका अतोनात आनंद झाला होता त्यांना! शब्द उमगणाऱ्या ताराशंकरबाबूंची मनःस्थिति ही अशी व्यक्त होत होती. पण पलीकडे बसलेला तो भोळा जीव! त्याला शब्द कुठें उमगत होते? पण भाव कळत होता, त्याचा स्पर्श त्याच्या निष्कपट हृदयाला होत होता, आणि म्हणून च डोळे मिटून, कान टवकारून एकाग्रतेनें तो बाबुजींचे शब्द

ऐकत होता. भाषण संपलें तेव्हा हातातला कोयता बाजूला ठेवून, जमिनीला डोकें टेकवत होता तो. बाजूला उभ्या असलेल्या ताराशंकरबाबूंचे शब्द ऐकू येत होते – " आज तो बाबाने कमाल की ! मैं सचमुच बहुत प्रभावित हुआ हूं " – बाबा धीमेपणें पावलें टाकीत निवासाकडे जात होते. त्यांच्या शब्दांनें कवीच्या हृदयात भावतरंग उठले होते. भोळ्या गावकऱ्यांच्या हृदयात भक्तितरंग उठलेच होते– पण ते स्वतः मात्र शब्द पेरून पुन आपल्या ' ब्रह्ममय जगात ' जाऊन बसले होते.



: ९ :

## गंगा आणि सागर

विष्णुपूर
१० जानेवारी '५५

विष्णुपूर हें ऐतिहासिक महत्त्वाचें शहर आहे. पूर्वीची महाराजांची राजधानी. वाटेंत ठिकठिकाणीं प्राचीन मंदिराचे व किल्ल्याचे अवशेष लोटलेल्या काळाचें स्मरण करून देत होते. शहरातल्या दीड मैलाच्या वाटेवर घराघरांतून, गच्चीवरून सतत पुष्पवृष्टि चालू होती. प्रत्येक घरासमोर आरतीचें ताट हातीं घेतलेल्या व शंख फुंकणाऱ्या स्त्रिया उभ्या होत्या. बंगालात शंख

" त्या देवीची पूजा तू करतोस ती च मी आहे " अशी आख्यायिका आहे त्याच जागीं विनोबाचें आज प्रथम स्वागत झालें तलावातून सूर्यबिंब वर येत होतं समाधिस्थ अवस्थेत विनोबाच्या मुखातून शब्दसरिता प्रवाहित झाली, " आज आम्ही अशा जागीं बसलो आहोंत कीं ह्या ठिकाणीं आपणा सर्वांची च समाधि लागली पाहिजे. महापुरुषाच्या जीवनात जे अनुभव येतात त्याना सामाजिक रूप देणें माझ्यासारख्या सेवकाचें काम आहे. समाधीमध्यें कुठले हि क्लेश नसतात. सामाजिक समाधींत हि कुठले च क्लेश राहता नकोत समाजात आणि जगात चालणारे नाना प्रकारचे क्लेश, भाडणें व संघर्ष यापासून मुक्ति मिळून तेव्हा च सामाजिक समाधीचें समाधान मिळू शकेल. रामकृष्ण काचनाला स्पर्श करीत नव्हते. त्याच्या हाताला चुकून स्पर्श झाला तेव्हा त्याना तीव्र वेदना झाली ह्याचा अर्थ, संपत्तीच्या संग्रहाला ते पाप मानीत. समाजाची संपत्ति एका च जागीं राहिली तर समाजाला त्रास होतो. पण काचन वितरित झालें तर प्रत्येक घराला त्याचा फायदा मिळेल आणि त्याची हानि, नुकसान शून्य होऊन जाईल वितरित काचन परमेश्वराची विभूति होईल आणि मग त्याचा स्पर्श नारायण स्पर्श होईल. "

शब्द हवेंत विरू लागले आणि धीरगंभीर गीताचे स्वर त्या शब्दाचा पाठलाग करू लागले. एका वयोवृद्धाच्या गळ्यातून सुस्वर बाहेर पडत होते. आशादेवी बाबाना सागत होत्या, " हे बगालचे श्रेष्ठ संगीतज्ञ गोपेश्वर बंद्योपाध्याय. ह्याचा आज ८० वा वाढदिवस आहे. " वृद्ध व्यक्तीसमोर बाबाचें भारतीय मन एकदम विनम्र होतें त्यानीं गोपेश्वरबाबूना वाकून नमस्कार केला. कलावंताचा आनंद आसवावाटे बाहेर पडला विष्णुपूर हें संगीताचें केंद्र आहे आशादेवींनीं सध्याकाळीं संगीताचा कार्यक्रम ठरवला बगालात विनोबाच्या स्वागतात आढळणाऱ्या कलात्मकता, व्यवस्था आणि योजकतेच्या मागची प्रेरणा म्हणजे कलाप्रिय आशादेवी.

बगालमध्यें प्रवेश केल्यानंतर विनोबानीं बगालच्या परिस्थितीचें विश्लेषण करून वैष्णव संप्रदायाच्या भक्तिमार्गातील निष्क्रियतेवर प्रहार केला होता त्यामुळे बगालमध्यें खळबळ उडाल्याच्या बातम्या येत आहेत वर्तमानपत्रानीं

त्यावर अग्रलेख हि लिहिले आहेत. विनोबा भजन आणि कीर्तनाच्या विरुद्ध च आहेत असा गैरसमज हि पसरला आहे. आजच्या सभेंत येथील वैष्णवानीं विनोबांना जे मानपत्र दिलें त्यांत ह्यासंबंधी दु:ख प्रगट करुन अत्यंत नम्रतेनें आपले विचार मांडले होते — मानपत्र वाचून संपलें. सारी सभा चित्रवत् झाली होती. प्रत्येक व्यक्तीच्या चेहऱ्यावर उत्सुकते शिवाय दुसरा कुठला हि भाव नव्हता. विनोबाच्या वाणीचा गंगौघ सुरु झाला — आरंभीं वैष्णव बंधूंची क्षमा मागितली गेली —

" मी तर स्वत:ला चैतन्यमहाप्रभूच्या चरणाच्या धुळींतला रेणु समजतों एवढ खर कीं, कुठल्या हि मानवाला अत्यंत परिपूर्ण मानायला माझी बुद्धि तयार नाहीं. आईबद्दल लहानग्या बाळाच्या मनात जसा आदर असतो तसा गुरुविषयीं शिष्याच्या मनात आदर असतो, शिष्याच्या मनात गुरुविषयीं जी परिपूर्णतेची भावना असते ती मी समजू शकतों. बुद्ध भगवान्, येशू खिस्त, महमद पैगंबर आदि महापुरुषाचे अनुयायी त्याना परमेश्वरस्वरूप च मानीत होते ही भक्तीची भाषा आहे. परंतु याविषयीं इस्लाममध्यें जें म्हटलें आहे तें मला अधिक महत्त्वाचें वाटतें. " ला ईल्लाह ईल्ल्लाह, महमदुर रसुल्ल्लाह " ईश्वर एक च आहे. महमद पैगंबर त्याचा पैगाम आणणारा एक सेवक मात्र आहे. ही मला विवेकाची भाषा वाटते चैतन्यमहाप्रभूंनी जी भक्तिधारा इथें प्रवाहित केली तिला मी गंगे सारखी पवित्र मानतों परंतु गंगेची धारा होणें एक गोष्ट आहे तर समुद्र होणं दुसरी गोष्ट आहे. गंगेचा प्रवाह देखील समुद्र बनण्याचा दावा करीत नाहीं

तेव्हा एखादा जीवनविचार जगात प्रगट झाला तरी त्याच्या एकेक पैलूचा विकास होत जातो. एखाद्या युगामध्यें, विचारधारेंत जर त्या विचाराचा परिपूर्ण विकास झाला तर मानवसमाजाकरता काही कामच उरलें नसतें, मानवसमाज मुक्त झाला असता, नाहींसा झाला असता. आणि बुद्ध भगवानानंतर चैतन्यमहाप्रभूंची गरजच उरली नसती. ह्या बाबतींत वैज्ञानिकाचा दृष्टिकोण, वृत्ति विचारात घेण्यासारखी आहे. आजचे उत्तमोत्तम, श्रेष्ठ वैज्ञानिक म्हणतात कीं विज्ञान अनंत आहे. त्याचा एक अंश तेवढा आमच्या हातीं आला आहे. हा च न्याय आत्मानुभवाला लागू होतो. विकास होण्याला

त्यात हि जागा आहे. आता हे खरें कीं, भक्तिभावनेच्या भरात कुणी अतिम सीमेपर्यंत पोहोचला हि असेल नदी समुद्राला मिळाल्यानतर समुद्ररूप होते च.

परतु साऱ्या समाजाच्या उत्थानाचा जियें प्रश्न येतो तिथें कुठला हि एक च गुण वा विचार प्रतिपादन केल्याने समाजात एकांगिता येते. म्हणून गुणाचा समन्वय करावा लागेल आज भक्तिमार्गाच्या चिंतनात सशोधन करण्याची अत्यत जरुर आहे, हें माझें नम्र निवेदन आहे.

येथील वैष्णव भूदानयज्ञात पूण सहयोग देऊन आपली वैष्णवता सिद्ध करतील अशी मला आशा आहे. म्हणून मी म्हणतो, "जो आपल्याला जमीन आणि सपत्तीचा स्वामी समजतो तो ईश्वराची जागा घेतो म्हणून तो अवैष्णव आहे. जे सर्वांना विष्णुमय समजतील व आपल्या सर्व गोष्टी परमेश्वराच्या आहेत, समाजाच्या आहेत, असें समजतील तेच खरे वैष्णव"

बत्तीस वर्षांची तपस्या अत्यत स्पष्टपणे, नि स्पृहपणें व निर्भीडपणे सत्य बोलत होती. आजचें भाषण म्हणजे 'गीता प्रवचन' होतें ज्ञान, भक्ति व कर्माच्या समन्वयाचें विवेचन होतें सभा आटोपली आमच्या पुस्तकाच्या दुकानावर लोकांची एकच गर्दी झाली. प्रत्येक जण एक च पुस्तक मागत होता –' गीता प्रवचनें '. आणि त्याच्या प्रति खपविण्यात आमच्यात स्पर्धा चालली होती. मदालसाबेन अग्रवाल यांचीं छोटीं मुलं– भरत व रजत– सध्या यात्रत आहेत. ते तर आज खूपच खुशींत होते भराभर पुस्तकें विकताना व खिशात पैसे कोंबताना त्यांची धादल उडाली होती. 'गीता प्रवचन लीजिये एक एक रुपिया' असे ओरडून ओरडून रजतचा घसा बसून गेला. गर्दी ओसरल्यावर तीं दोघें विनोबाजवळ जाऊन म्हणू लागलीं, "बाबा, आज 'गीता प्रवचन' विकताना तर आमची त्रेधा उडाली आणि आता इतक्या 'गीता प्रवचना 'वर सह्या करता करता तुमचा हात मुद्धा किती दुखेल नाहीं?"

रात्रीची प्रशात वेळ. हेमताच्या थडीनें अग गारठून गेलें होतें सुरबहाराच्या तारा छेडल्या जात होत्या. सुरबहारवर दरबारी आळवला जात होता त्या स्वरलहरींनीं मनाला वेगळ्या जगात नेलें. 'उपनिषदाचा अभ्यास' या पुस्तकात विनोबांनीं ॐकाराचा मजुळ बोल बोलणाऱ्या शांतिवीणेचा उल्लेख केला आहे सात सुरांतून सारी सगीतसृष्टि निर्माण करण्याची कला

साधली म्हणजे एक च चेतन आत्मा व जड प्रकृति यापासून सारी सृष्टि निर्माण झाली आहे याची अनुभूति घेण्याचा मार्ग सापडल्यागत वाटेल. आरंभाचा 'सा' लावताना समस्त विश्वाशीं अविरोध वृत्ति निर्माण करण्याची आकांक्षा हृदयात उमटू शकेल, सूरताललयबद्ध संगीताची कला साधल्यास कर्म, ज्ञान व भक्तीचा समन्वय साधण्याची मनीषा निर्माण होऊ शकेल.

एक राग संपला होता. निरनिराळ्या 'रागां'चीं नावें मैफलींतून ऐकू येत होतीं. आशादेवी विनोबाना म्हणाल्या, "तुम्ही एखाद्या रागाची फरमाईश करा." सर्वांनीं कान टवकारले. विनोबा हसत उद्गारले, "मला एक च राग माहीत आहे – भूदान राग!"



## : १० :

## 'सर्वेषामविरोधेन'

बाँकादह

११ जानेवारी '५५

बाबूच्या नी आब्याच्या दाट, हिरव्यागार वनामध्यें उभारलेल्या तंबूमध्यें आम्हीं तळ दिला होता. भरत, रजत वानरासारखे उड्या मारीत होते व कोणत्या झाडाखाली राहायचें त्याचे बेत करीत होते. विनोबाकरता गवताची कुटी तयार केली होती. ती पाहून खुष होऊन ते म्हणाले, "अरे वा! ही तर पर्णकुटी हि नाहीं, तृणकुटी आहे. म्हणजे पर्णकुटीहून हि दरिद्री." त्याची प्रसन्नता वातावरणाच्या प्रसन्नतेत भर घालीत होती. सकाळीं विशाल आम्रवृक्षाच्या छायेत ते महादेवीताईंना गीता शिकवीत होते. दोन श्लोक शिकवून झाले. तेवढ्यात कुणीतरी भेटीला आले. त्यांची शिकवायची पद्धतच अशी आहे कीं कुणी हि मठ्ठ विद्यार्थी ज्ञानी होऊ शकेल. त्यामुळे त्यानीं बोलत राहावें नी आपण ऐकत राहावें असें फार वाटतें.

या भागात कम्युनिस्टांचा जोर आहे असें ऐकलें होतें आज ते काळे झेंडे घेऊन येणार वगैरे ऐकलें होतें. त्यामुळे आज काहीं तरी मौज पाहयला मिळणार अशी आमची अपेक्षा होती पण नेहमींप्रमाणें च आज हि उत्साहानें स्वागत झालें कम्युनिस्ट व काळे झेंडे कुठें गायब झाले होते कुणास ठाऊक! दुपारीं येथील श्रीमत वर्गाचे काहीं लोक विनोबाना भेटायला आले होते तेव्हा कळले त्याच्यापैकीं काहीं 'विनोबा गावात येणार' म्हणून बाहेर गावीं निघून गेले होत भूदानात जमीन देण्याची त्याची तयारी नव्हती—पण विनोबाना भेटलों तर त्याच म्हणण पटून जाईल की काय अशी भीति त्याना वाटली असावी जी मंडळी आली होती त्यानीं आपल्या अडचणी माडल्या, 'मुलाचीं शिक्षण व्हायचीं आहेत, मुलींचीं लग्न आहेत, उत्पन्न पूर्वीपेक्षा कमी झाले आहे' विनोबा एवढें च म्हणाले, "काळाचीं पावलं ओळखा त्याना उद्याच्या खाण्याची भ्रात आहे त्याचा विसर पडू देऊ नका त्यानीं आजवर सार शातपण सहन केल आहे. त्याच्या शातीचा अत पाहू नका त्याच्याशीं प्रेमाचें नातें जोडायच असेल तर तुम्ही स्वत दान द्या व ह्या कामाचा झेंडा हातीं घ्या मुलाला भूक लागून तें मूल रडण्याची वाट आई पाहत नाहीं ती तर मुलाची भूक ओळखून स्वत च दूध पाजायला धावते तुम्ही ह्या कार्याचा झेडा हातीं घ्या."

प्रार्थनाप्रवचन अविरोध तत्त्वाचे दर्शन घडविणारें होतें. बगालच्या आजच्या दुर्दशेच विश्लेषण करून त म्हणाले, "इग्रजी राज्याचा परिणाम म्हणज येथील कारागीर वर्ग नष्ट झाला व जमीनदार वर्गाला बळ मिळालें म्हणून येथील तरुण कम्युनिझमच्या विचाराकडे झुकतात त्याचें मला आश्चर्य वाटत नाहीं व दु ख हि होत नाहीं सुस्त जनतेपेक्षा जागृत जनता केव्हा हि चागली या तरुणाच्या विचारात परिवर्तन करण्याचें काम कठीण नाहीं मी माझ्या त्या निराश व काहींशा उतावीळ तरुण मित्राना म्हणतों कीं, इग्रजी राज्याच्या परिणामानें निर्माण झालेल्या जमीनदाराचे दिवस सपले आहेत. ते आता अधिक काळ टिकणार नाहींत. तुम्ही त्याना रात्रीं अपरात्रीं जाऊन का लुटता? माझ्यासारख्या दिवसाढवळ्या प्रेमान लुटायला शिका आणि त्याना औदार्य प्रगट करण्याची सधि द्या, व तिकडे मी

माझ्या जमीनदार मित्राना सागू इच्छितों कीं तुम्ही चोर डाकूना तर भिता च, कम्युनिस्टाना व सरकारला हि भिता, आता माझी हि तुम्हाला भीति वाटू लागली आहे. माझी भीति सोडा, उदार बना. भूदान व सपत्ति दान द्याल तर *मग पहा जनतेचें प्रेम तुम्ही सपादन कराल. मग हे कम्युनिस्ट* भारतीय सस्कृतीचें गीत गातील, गरीब लोक तुमच्याकरता प्राण द्यायला मागेंपुढें पहाणार नाहींत. तसेंच तेलगणामध्यें मी सैनिकाना म्हणत असें, ‘ अरे! कम्युनिस्ट काय जनावर आहेत! त्याची अशी शिकार का करता? ते ‘ शेर ’ ( वाघ ) नाहींत. चिंतनशूर आहेत. त्याच्यामागें तत्त्वज्ञानाचें बळ आहे. एका प्रथाचा त्याना आधार आहे. त्याच्याशी सामना करायचा असेल तर त्याना जशी अन्यायाची चीड आहे तशी चीड आपल्याला हि यायला हवी. गरिबीवर व विषमतेवर जोरदार हल्ला चढवायला हवा. ’

एका च भाषणात उभयपक्षाचे गुणदोष दाखवून दोघाना हि भूदानाकडे आकर्षित करण्याचें हें तन्त्र अभिनव वाटलें. त्याच्या हृदयात साऱ्या विश्वाविषयी अविरोध भावना निर्माण झाल्यामुळें जो शातात्मा झाला आहे त्याच्या च मुखातून अशी भाषा प्रकट शकते. भूदानाचें कार्य हें ‘ महाकर्म ’ आहे आणि म्हणून तें ‘ सर्वेषामविरोधेन ’ झालें पाहिजे असें ते नेहमी म्हणतात. ही हिमालयाच्या एकान्त, शान्त गुहेंत चाललेली शातीची उपासना नव्हती, तर आजच्या काळाची एक ज्वलंत समस्या सोडविण्याकरता अहिंसेच्या मार्गाचा अवलंब करीत शातीची साधना चालली होती. ज्वाला-मुखीच्या शिखरावर बसून, जगाच्या संघर्षकोलाहलात हि शातीचा राग आळापून जगाला त्याकडे आकृष्ट करणाऱ्याचा महिमा कोण वर्णू शकेल! बापू ह्यप्रकारे प्रेम करीत. आम्हाला तेव्हा त्याची भाषा कळत नसे. विनोबा जमीनदार, कम्युनिस्ट, सर्वांवरच प्रेम करतात. ही भाषा देखील प्रथम आम्हाला अनाकलनीय वाटे. पण जेव्हा परस्परविरोधी मनाच्या लोकाना भूदानाचा विचार पटताना दिसतो तेव्हा ती भाषा समजू लागते.

सभेची गर्दी पुरावाकरता दुकानाकडे वळते आणि श्री. अप्पाराव्या भोंवती—अप्पाराव पॉंडुरा जिल्ह्याचे जिल्हाधिकारी आहेत—सरकारी अधिकाऱ्यासमोर आदर्श ठरतील असेंच त्याचें व्यक्तिमत्त्व आहे. ते राम-

कृष्णाचे भक्त आहेत. यात्रेची व्यवस्था पाहत असताना त्यांच्याकडे पाहून ते 'सरकारी अधिकारी' आहेत ह्याचा विसर पडतो. भूदानाच्या कार्यकर्त्यांपैकी च एक वाटतात. सभेच्या वेळीं सामान्य स्वयंसेवकाप्रमाणे जातीनें लोकांमध्यें मिसळून शांति ठेवायला सांगतात. भूदानाचीं पुस्तकें विकतात, रोज आमच्याबरोबर पायीं चालतात. पण कधीं च कुठे समोर दिसणार नाहींत. सदा मागें राहून चुपचाप काम करीत असतात.

दिवेलागणीला बाँकुडा जिल्ह्याच्या कार्यकर्त्यांची सभा होती. उद्या मेदिनीपूर जिल्ह्यात प्रवेश व्हायचा आहे. आतापर्यंत सारे कार्यकर्ते एकत्र येऊन काम करीत होते. पण आज जिल्ह्याचे संयोजक निवडण्याच्या प्रश्नावर राजकीय पक्षभेदामुळें मतभेदाचें रण माजलें. शेवटीं विनोबा आवाज चढवून म्हणाले, "मी तर एक बेदरकार फकीर आहे. जगाला मिथ्या समजून त्याची सेवा करतों. लोक जगाला सत्य मानून सेवा करतात. जिथें भांडणें, मनोमालिन्य असेल तिथें मला रसच वाटत नाहीं. तुमचीं भांडणे मिटलीं नाहींत तर मी असा च सरळ ओरिसाला निघून जाईन. भूदानाचे काम तर इथा च करणार आहे."



: ११ :

## वैराग्य नव्हे, अनुराग

गढबेना, चंद्रकोना रोड, सालबोनी
[ जि. मेदिनीपूर ]
१२ ते १४ जानेवारी '५५

बाँकुडा जिल्ह्याची अकरा दिवसांची यात्रा संपवून आज आम्हीं मेदिनीपूर जिल्ह्यात प्रवेश केला. बाँकुडा जिल्ह्याच्या एका कार्यकर्त्यानें निरोपादाखल केलेल्या भाषणात म्हटलें, "ह्या जिल्ह्यात हिंडताना आमचे दोष दिसले असतील, तर क्षमा करा." विनोबांनीं त्यांना प्राचीन ऋषींच्या विशालतेचें

स्मरण करून दिलें. "आपल्या ऋषिमुनींची ही शिकवण होती कीं आपण स्वत ला 'मी ब्रह्म आहें' असें म्हणावें. मी क्षुद्र आहे असं कधीं हि म्हणू नये. आपले मन क्षुद्र असतें आणि मनापासून तर आपण अलग आहोंत. ही जाणीव होईल तेव्हा आपण ब्रह्म च राहू, क्षुद्र राहणार नाहीं. ... कॉरापुटाचे अकरा दिवस म्हणजे एकादशीच झाली आमची. ही एकादशी माझ्या नित्य स्मरणात राहील. कारण मला इथें जनतेच प्रेम भरपूर मिळालें आहे. कॉरापुट जिल्ह्यात चार हजार एकर जमीन मिळाली. पण आता आपल्याला लाखाची कोटीची भाषा वापरली पाहिजे. आपला देश विशाल आहे, मोठा आहे. मोठमोठीं कामे करण्याकरताच परमेश्वरानें आपल्याला जन्म दिला आहे. अहिंसेची भूमिका इथ तयार झाली आहे. ती साऱ्या विश्वात पोंच वायची आहे."

आज एका शाळेंत आमचें बिऱ्हाड थाटलें होतें. शाळेचे शिक्षक दुपारीं विनोबाना भेटले भूदान आणि सर्वोदयाचें तत्त्व त्याना पटलें होतें. विनोबाच्या म्हणण्याप्रमाणे प्रत्येक पाठशाळा ही सर्वोदयविचाराचें केंद्र असावें हें त्याना मान्य होतें. परतु त्याची एक च तक्रार होती. कदाचित् कलियुग आहे म्हणून असे असेल, पण हल्लीं विद्यार्थ्यांमध्ये शिस्त कशी राहिली च नाहीं. शिक्षकाना ते अगदीं च क पदार्थ समजतात काय करावें कळत नाहीं. कदाचित् ... " त्याचें वाक्य पूर्ण होण्यापूर्वीं च विनोबा आवाज चढवून म्हणाले, "ह्याला जबाबदार विद्यार्थी नाहींत. आजची शिक्षणपद्धति आहे आणि काहीं प्रमाणात ही जबाबदारी शिक्षकावर हि येते. आपल्या ग्रथात तर 'शिष्यापराधे गुरोर्दण्ड' म्हटल आहे. शिष्याचा अपराध झाला तरी शिक्षा गुरुला व्हायला पाहिजे. प्राचीन काळचे गुरु शिष्याना म्हणत, "*यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि, नो इतराणि*"—हे शिष्यानो, तुम्ही आमच्या सत्कर्मांचें, सदाचरणाचें अनुकरण करा, दोषाचें अनुकरण नका करू. आता माझा अनुभव ऐका. माझा विद्यार्थ्यांशीं पुष्कळच संबंध येतो. मला तर ते अतिशय नम्र वाटतात. आजची शिक्षणपद्धति इतकी सदोष असून हि ते इतके नम्र कसे राहतात याचें च मला आश्चर्य वाटतें" शिक्षकाजवळ उत्तर नव्हतें.

विनोबांवरचा एक ठराविक आक्षेप म्हणजे " विनोबा स्वतःसारखें च सर्वांना वैराग्य शिकवतात, वैराग्याची च भाषा वापरतात." या आक्षेपाला आजच्या भाषणात उत्तर मिळाले.

" रात्रीं आकाशांत असंख्य तारे चमकताना दिसतात. आपला देशहि असा च लाख लाख लहान लहान खेडयांनीं मंडित आहे. आज खेडयांची परिस्थिति फार च बिघडली आहे. परंतु सर्वोदय समाजांत खेडीं स्वर्गासारखीं स्वच्छ, सुंदर आणि निर्मळ राहतील. गावागावांत लक्ष्मी आणि शांति नांदेल. आरोग्य, प्राचुर्य आणि तुष्टि-पुष्टि राहील. प्रत्येक मुलाला दूध, तूप, लोणी मिळेल. बाबाला वैराग्य नको आहे. त्याचें म्हणणें आहे कीं, सर्व लोकांना समान उपभोग मिळाला पाहिजे. प्रत्येकजण म्हणेल, 'आधीं त्याला द्या, मग मला.' आई बाळाला आधीं खाऊ घालते नी मग स्वतः खाते. आईचें हें वैराग्य आहे कीं अनुराग ? "

सर्वोदयाच्या जगांत खेडीं कशीं राहतील ह्याचें चित्र रंगवताना बाबांच्या वाणीचा ओघ भरधाव धावत सुटला होता.

" आपलीं खेडीं श्रीसंपन्न झालीं पाहिजेत. आमचें श्री निकेतन राहील खेडयात, श्रमनिकेतन राहील शहरांमध्यें व शांतिनिकेतन दोन्ही ठिकाणीं राहील. खेडीं व शहरें यामध्यें सहयोग राहील तर उभयपक्षीं लाभ होईल. गावात तयार होणाऱ्या कच्च्या मालाचा पक्का माल गावाला हवा असेल तर तो गांवातच तयार व्हावा. तिकडे शहरांत असे उद्योग चालले पाहिजेत कीं ज्याच्या योगें आज परदेशातून येणाऱ्या मालाचें आक्रमण बंद होईल. कपडा, तेल इ० खेडयात तयार होईल व शहरात लाऊड स्पीकर, चष्मा, थर्मामीटर इ० असें होईल तर च देशात लक्ष्मी वाढेल. प्रत्येक गावात विद्यापीठ असलें पाहिजे व सर्वांना समान शिक्षण मिळालें पाहिजे. एक काळ असा होता कीं ज्ञानी खेडयात च राहत असत. पाणिनी, कणाद वगैरे ऋषि खेडोपाडीं च राहत. आम्ही दरिद्रनारायणाचे उपासक आहोंत पण त्याला लक्ष्मीवान् करण्याची आमची मनीषा आहे. "

सभेहून घराकडे परततांना बाबांनीं थट्टेत विचारलें, " काय मुलींनो, आमचं प्लॅनिंग ( नियोजन ) कसं काय वाटलं ? "

चद्रकोना जवळ येऊ लागले. आज तर स्त्रियानीं कमाल च केली. द्दुईने समोर येणें, रस्ता अडवून गंधाक्षता, पुष्प इ० यथासाग विधि आटोपून मग च वाट सोडणें, असें क्रियेक्दा घडले होतें. पण आज त्याची सख्या जास्त च होती. प्रत्येक चौकावर शेंपन्नास स्त्रिया उभ्या होत्या. एका जागीं तर नको नको म्हणत असताना एक घोळका जवळ आला. विनोबाच्या कपाळाला त्या इतक्या जोरानें गंध फासू लागल्या कीं, धक्का लागून विनोबानीं पडता पडता स्वत ला सावरलें अन् मग मिस्किलपणें हसत म्हणाले, "ह्या बाया मला दगड च समजतात् झाल !" त्याना तेलगणाच्या यात्रेचें स्मरण झालें. "तिथे स्त्रिया अशा च आरतीचीं ताट घेऊन जवळ यायच्या. मी त्याना म्हणायचा, 'ह ! जरा संभाळून आरती करा, नाहीं तर अज्ञान माझी दाढी जळेल एखादे दिवशीं.' " हसता हसता आमची मुरकुडी वळली.

निवासस्थानीं वैदिक पद्धतीनुसार पूजा-साहित्यानें मच सजवला होता. ब्राह्मण मत्रोच्चारण करीत होते ऊद कापुराचा सुवास सर्वत्र दरवळला होता हाराचा ढीग विनोबासमोर पडला होता. गधाक्षतानीं त्याचें कपाळ रगलें होतें. हाराच्या ढिगावर दृष्टि रोखीत ते गभीरपणें बोलू लागले, "हा तुमचा भक्तिभाव हृदयाला स्पर्श केल्यावाचून राहत नाहीं. परतु त्यानें मला आत तृप्ति वाटत नाहीं, सकोच होतो. मी व्यक्ति या नात्यानें तुमच्याजवळ येत नाहीं. दरिद्रनारायणाचा प्रतिनिधि म्हणून येतों साहजिक च माझ्या मनात विचार येतो, या गध, मालापुष्पानीं दरिद्रनारायणाची तृप्ति होईल का ? देवळातला देव आधींचा च परितृप्त आहे. पण दरिद्रनारायण सतप्त आहे. त्याच्या सताप शमनाकरता 'पत्र पुष्प फल तोय' पुरेस नाहीं. आपल्या जमिनीचा, सपत्तीचा एक हिस्सा द्यावा लागेल. दरिद्रनारायण प्रसन्न झाला तर श्रीमत हि सुखी राहतील दरिद्रनारायणाचा शाप मिळाला तर समाज कधीं सुखी व्हायचा नाहीं. दरिद्रनारायण अत्यत क्षमाशील आणि शातिशील आहे. त्याच्या शातीचा असा अत नका पाहू तुमचा हा सारा भक्तिभाव प्रत्यक्ष कृतीमध्यें उतरू द्या. म्हणजे मग बगाल सकटातून पार होईल."

विनोबा हरिभक्त आहेत. त्याना सारें हरिमय च दिसतें. आज चद्र-कोनाच्या रहिवाशाना त्यानीं कधीं हि न ऐकलेली गोष्ट ऐकवली. "वेदामध्यें

हजार हाताच्या, हजार पायाच्या, हजार डोळ्याच्या देवाचें वर्णन आहे. तो कोण असेल बरें ? माझ्यासमोर हजारों लोक बसले आहेत, तेच देव आहेत. हे सारे हजारों हात एकमेकांना मदत करतील तर त्यांत परमेश्वराचें रूप प्रगट होईल."

गेले वर्षी विनोबांनीं बोधगयेला 'समन्वयाश्रमा'ची स्थापना केली होती. आश्रमांतून आलेल्या गोविंदरावांनीं सालबोनीला जातांना तेथील कामाचा वृत्तान्त सांगून म्हटलें, "समन्वयाश्रमांत जर्मन बंधु-भगिनी आले होते. ते विचारत होते, समन्वयाची काय जरूर आहे ?" चर्चा सुरू झाली. बाबा बोलत होते, "अहिंसा व वेदान्त ह्या दोहोंचा समन्वय करण्याचें आम्हीं म्हटलें आहे. अहिंसेंत हि कुणी सत्यपरायण, न्यायपरायण तर कुणी दयापरायण असतो. वेदान्ततत्त्वज्ञानामध्यें कुणी शून्यवादी तर कुणी अस्तित्ववादी असतात. अशा च तऱ्हेनें इस्लाम, ख्रिस्ती, हिंदु, बौद्ध इ० धर्मांमध्यें हि अशी विविधता आहे. या सर्वांचा समन्वय या वेळीं भरत-भूमींत होत आहे. इथें एक 'रसायन' तयार होत आहे, त्याला आम्ही व्यक्त रूप देऊं इच्छितों." नंतर समन्वयाश्रमाबद्दल ते म्हणाले, "आश्रमाच्या आसपासच्या गावामध्यें सर्वत्र स्वच्छतेचें निर्मलतेचें दर्शन होईल असा प्रयत्न करीत राहिलें पाहिजे. परदेशांतून आलेल्यांना तें स्थान आपलें घर आहे असें वाटलें पाहिजे."

आज मकर संक्रांत. आजच्या दिवशीं बंगालमध्यें लाखों लोक अंतर्बाह्य शुद्धीसाठीं गंगासागरामध्यें स्नान करतात म्हणे. विनोबा त्या शब्दाचा गंभीर अर्थ सांगत होते, "संक्रांतीचा दिवस म्हणजे जीवनपरिवर्तनाचा दिवस. गंगासागर तुमच्या हृदयांत येऊं द्या. व्यक्तीचें जीवन म्हणजे गंगा व सामाजिक जीवन म्हणजे सागर होय. जीवनगंगा समाजरूपी समुद्रांत प्रेमानें विलीन होईल तर दोन्हींचें जीवन शुद्ध होईल. व्यक्तीनीं प्रत्येक शक्ति समाजाला समर्पित केली पाहिजे. आजच्या दिवशीं हें ठरवा कीं आम्ही जमीन या संपत्तीचे स्वामी राहणार नाहीं. [illegible] राहीन. 'आधीं द्या, मग घ्या' हा आमचा मंत्र राहील."

---

## : १२ :

# कायदा आणि क्रांति

गोदापियासाल, मेदिनीपूर
१५, १६ जानेवारी '५५

गोदापियासालमध्यें आम्हीं प्रवेश केला तेव्हा गावचा आठ दहा वर्षांचा कोवळा मुलगा पेटीवर पूरिया रागांत कोमल व गोड स्वागतगीत गात होता. त्याचे वडील तबल्यावर साथ देत होते. अंगावरच्या कपड्यांचीं लक्तरें झालीं होतीं. पण त्याची पर्वा कुठें होती त्यांना ! त्यांच्या सेवेला चालून आलेल्या ऋषींचे स्वागत करण्यात ते भक्त मस्त झाले होते. आज विवेकानंदाचा जन्मदिवस. बाबांनीं विवेकानंदाच्या महान् कार्याचा गौरव करीत रामकृष्ण मिशनच्या कार्यकर्त्यांना आवाहन केलें. दारिद्र्य मिटवून ' नारायणा 'ची प्रतिष्ठापना करणाऱ्या कार्यांत भाग घ्या असें ते म्हणाले. " बंगालमध्यें अपार दारिद्र्य आहे तें नाहींसें केल्यावाचून विवेकानंदाच्या आत्म्याला शांति मिळणार नाहीं. त्याच्या पुढच्या जन्मदिवशीं बंगालमधील साऱ्या भूमिहीनांकरता जमीन मिळविण्याचा संकल्प करा. "

सूर्योदयाचे वेळीं प्राचीचें वैभव अपूर्व भासत होतें. आरक्त बिंब क्षितिजावर सरसर चढत होते. विनोबाचीं पावलें झपाझप मेदिनीपूरच्या दिशेनें पडत होतीं. विचारबीज पेरत पेरत आणि हृदयें जिंकीत विश्वविजय करायला एक पथिक निघाला आहे. पण तो प्रत्येकाला सांगतो, ' आधीं स्वतःला जिंका. ' मेदिनीपूर शहराच्या सीमेवर हजारों लोक उत्कटतेनें महर्षींच्या आगमनाची प्रतीक्षा करीत उभे होते. ' उलुध्वनि ' कानावर आला. तो ऐकून बाबा सांगू लागले, " हा शब्द थेट उपनिषदांतला आहे. सूर्य उगवू लागला कीं पक्षी ' उल् उल् ' असा ध्वनि करतात, असें त्यांत वर्णन आहे. हा प्रदेश पूर्वेकडचा आहे ना ? म्हणूनच इथे हा शब्द प्रचलित दिसतो. "

सकाळीं येथील भंगी बाबांच्या भेटीला आले होते. त्यांत बहुतेक सारे ओरिसांतले होते. " मी जन्मानें नसलो तरी कर्मानें भंगी आहे " असें

बाबा अभिमानानें सांगतात. पवनार आश्रमाजवळच्या 'सुरगाव' गावात त्यांनी कितीतरी वर्षे सूर्याच्या नियमिततेप्रमाणें भंगीकाम केलें होतें. कडक ऊन असो, कडाक्याची थंडी असो कीं मुसळधार पाऊस असो, त्याच्या कामात नियमितपणें जाण्यात कधीं खंड पडला नाहीं. एक दिवस पावसान रुद्र रूप धारण केलं आणि दोन गावाच्या मधल्या नदीच पाणी वरून वाहू लागल तेव्हा कितीतरी वेळ पाणी कमी होण्याची वाट पाहत ते एका किनाऱ्यावर उभे होते. पाणी कमी होण्याचीं लक्षण दिसेनात तेव्हा त्यांनी पलीकडील किनाऱ्यावर उभ्या असलेल्या गावकऱ्याला जोरान सांगितलें, "सुरगाववाल्याना सांगून द्या, भंगी वेळेवर आला होता पण नदीनें त्याला अडवलें." ते अनेकदा विनोद करताना म्हणतात, "मी जर निवडणुकीला उभा राहिलों तर माझ्या निवडणुकीच्या जाहिरनाम्यात (Manifesto) दोन गोष्टी राहतील. (१) समाजात भंगी-वर्ग राहणार नाहीं. प्रत्येकाला तें काम करावं लागेल. (२) सेना काढून घेतली जाईल (Disband). आणि मग मी निवडणुकीत अशी जोरदार हापटी खाईन."

विनोबा बंगालमध्यें प्रथमच आले आहेत आणि आजपर्यंत इथें काम फारच कमी झालेलें म्हणून कीं काय, पंचवीस दिवसाच्या या बंगयात्रेंत विनोबांचें विचारदानाचें कार्य तीव्र गतीनें चाललें आहे. मग टाइपरायटरवर त्यांचे शब्द अंकित करताना आम्हांला हि त्यांच्या गतीशीं स्पर्धा करावी लागत आहे. आज मुक्कामावर पोहोंचून भरपेट नास्ता उरकून मी टाइपरायटर कामाला बसलें. थोड्याच वेळात कुठली तरी ओळखीची हाक ऐकू आली म्हणून मागें वळून पाहिलें, तों चाचाजी (व्रजप्रसाद साहू) येताना दिसले. ते गादी बोर्डाच्या मीटिंगकरता मद्रासला चालले होते आणि बाबांच्या व आम्हा सर्वांच्या भेटीकरता कांहीं तास इथें थांबणार होते. एक डबा हातीं देत ते म्हणाले, 'वयोरिलिये.' उघडून पाहिलें, त्यात तिळगूळ होता. मद्रासच्या संक्रांतीचा तिळगूळ इकडे आम्हाला प्रथमच मिळत होता.

चाचाजी, गादीकडच्या गाडीनें मद्रासला जाणार होते. मद्रासमध्यें याच वेळीं आवडीला काँग्रेस कमिटीचें अधिवेशन होणार होतें. बाबा चाचाजींना म्हणाले, "तुम्ही नेमके जाता. तुमच्या या वेळच्या देण्यात कांहीं ईश्वरी

सत्रेत असावा. तस मला दरवर्षी च काँग्रेसच निमंत्रण येत असतं पण मीं त्याला आजवर कधीं हि उत्तर दिल नाहीं. कारण मी तर असाच देशाच्या कुठल्या तरी कोपऱ्यात हिंडत असतों. पण आज तुम्हाला पाहताच मनात विचार आला त्या निमंत्रणाला उत्तर देण्याचा. "

चाचाजी निमित्त बनले. पत्र लिहिलें गेलें.

श्री. ढेबरभाई,

काँग्रेसमें आनेके लिये आपका निमंत्रण पत्र मिला । मैं आ तो नहीं सकूंगा । कारण जाहिर है ।

काँग्रेस-जनोंको मेरा प्रणाम निवेदन कीजियेगा । और मेरी तरफसे कहियेगा कि आप सब लोग कभी न कभी मददमें दौडे आयेंगे, ऐसी आशा रखकर एक शख्स सतत घूम रहा है । आपसे मदद पाने का वह अपनेको हकदार समझता है ।

विनोबाके प्रणाम ।

दुपारीं शहरातली प्रतिष्ठित मंडळी बाबांना भेटली. कुणींतरी कायद्याचा प्रश्न काढला. बाबा जरा तीव्र शब्दात बोलले, " बालविवाह होऊं नये असा कायदा झाला आहे. परंतु राजा राममोहन रायच्या या भूमींत त्या कायद्याचें सरळ उल्लंघन होताना दिसत आहे. राजा राममोहन रायनें सामाजिक सुधारणेकरता जीवन घालवलें. माझी अपेक्षा होती कीं, हिंदुस्थानात इतरत्र कुठें नाहीं पण निदान या प्रदेशात तरी बालविवाह होत नसतील. इथें 'सीलिंग'चा जो कायदा होऊ पाहत आहे त्याबद्दल तुमच्या मुख्य मन्त्र्यांनींच म्हटलें आहे कीं, आशावादी दृष्टिकोनानें पाहिलें तर चार लाख एकर जमीन मिळेल अशी अपेक्षा आहे.

खरी गोष्ट अशी आहे कीं 'नाटक कंपनी येणार, येणार' अशी जाहिरात लावली जाते ना ? तशी च 'कायदा होणार, होणार' असं म्हणत म्हणत चार वर्षं लोटून जातात लोक काय मूर्ख, बावळट आहेत ? तेव्हा ते मिळालेल्या तेवढ्या अवधीमध्यें जमीन वाटून घेतात. मग त्यानंतर कायदा झाला तरी हि सरकारच्या हातात काहीं येत नाहीं. कायदा च करायचा असेल तर तो असा झाला पाहिजे कीं सगळी जमीन गावाच्या मालकीची होईल. व्यक्तीची मालकी राहणार नाहीं. पण मला खाति

करायची आहे. म्हणून मी कायद्याच्या भानगडींत पडत च नाहीं. मला त्यात रस च वाटत नाहीं. जाहीर सभेंत लोक जयघोष करतात, "आमच्या गावात कोणी हि भूमिहीन राहणार नाहीं, आणि तस न झाल तर मग देशाला आग लागल्यावाचून राहील का?"

प्रत्येक व्यक्तीला शब्दन् शब्द रुचत होता, पटत होता. पण सत्य विचार पटला तरी पचवायला हि वेळ लागतो च ना?

आज दान शून्य होतें. भूदानाच्या इतिहासात आजवर असें कधीं घडलें नव्हतें. सायंकाळच्या विराट् समूहाला विनोबा म्हणत होते, "सरकारनें एकेक काम—उदाहरणार्थ शिक्षण, आरोग्य, न्याय जनता आपल्या हातीं घेईल तर सरकारची सत्ता हळूहळू क्षीण होत जाईल. आणि सरकारला हि असें झालें तर आनंद व्हायला पाहिजे. आज इथे दान मिळालें नाहीं. बंगालची जनता विचार रुचल्याशिवाय दान देणार नाहीं. परंतु एकदा विचार पटला तर मात्र ती उदारपणे दान देईल."

एकदा ते म्हणाले होते, "लोक जमीन देत नाहींत याचा मला आनंद च होतो. कारण आमचे भारतीय लोक विचारानें किती पक्के आहेत हें दिसून येतें. कुणीं हि जाव, तिला दान मागाव अन् तिन तें द्याव इतक सोप हें काम आहे अस दिसल असत तर मी घाबरून गेलों असतों. पण जनता देशांतील सेवकांना कसोटीवर कसून घेते. तुम्हीं त्याची कधीं सेवा केली नाहीं, त्याचेजवळ कधीं प्रेमान गेला नाहीं अन् एकदम च जमीन मागाल तर ती का देईल? जनता परीक्षा घेते सेवक एकनिष्ठ, प्रामाणिक आहे कीं नाहीं! तो कचा दिसला तर ती त्याला दाद लागू देत नाहीं. जमिनीवर चेंडू फेकला तर जमीन त्या चेंडूला दुप्पट जोरानें परत फेकते. जमिनीवर कुदळीचा घाव घाला, जमीन कुदळीला एकदम आत घेते."

...'तत्त्वमसि' (तू क्षुद्र नाहींस, तू ब्रह्म आहेस) असें बोलणारी श्रुति, 'असंख्य अपराध केले तरी लेंकराला पोटाशीं कवटाळणारी माता, आणि जो आज देत नाहीं, तो एवढ्या च करता देत नाहीं कीं तो उद्या देणार आहे, तो उद्याचा दाता आहे,' असें अचल विश्वासानें बोलणारे बाबा! बिंब कोणतें नी प्रतिबिंब कोणतें, मला कळेना!



## : १३ :

## शेषनाग

खड्गपूर
१७ जानेवारी '५५

हें शहर रेल्वेचें खूप मोठें केंद्र आहे म्हणून या शहरात बंगालीशिवाय हिंदी, ओडिया, तेलगु, मराठी इ० भाषा बोलणारे लोक हि आढळले. तीन चार मैल दुतर्फा दर्शनार्थी उभे होते. त्यात नाना तऱ्हेची वेषभूषा नी केशभूषा पाहून ह्या नगरीचें कॉस्मापॉलिटन (Cosmopolitan) स्वरूप ध्यानात आलें. शाळकरी मुली शुभ्र कपड्यात दोन अडीच फर्लांगाची ओळ करून स्वागताला उभ्या होत्या. सभास्थान राहत्या जागेपासून दूर नसावें म्हणून एका विस्तीर्ण मैदानात तंबू ठोकून आम्ही राहिलो होतों. शहराच्या सर्व सोयींनी सुसज्जित तंबूची एक छोटीशी नगरीच बनली होती.

शहर असल्यामुळें नाना संस्थांचे प्रतिनिधी विनोबांना भेटून गेले. कलकत्त्याहून मांडेरू संघ, मुस्लिम समाज, निर्वासित संघ इ० आपआपल्या अडचणी मांडत होते. विनोबाजवळ सर्व रोगांकरता एकच औषध आहे. दुपारीं जैन साधु भेटीला आले होते. विनोबा म्हणत होते, " जैनधर्माची ही विशेषता आहे कीं, त्यात आज अनेक ब्रह्मचारिणी स्त्रिया धर्मप्रचार करीत फिरत आहेत. महावीरस्वामी स्त्रीपुरुषामध्यें भेद करीत नव्हते. त्यांनीं दोघांना हि समान अधिकार दिला होता. भूदानात काम करणाऱ्या स्त्रियांनीं जैन ब्रह्मचारिणींचा आदर्श समोर ठेवावयाला पाहिजे. "

बिहार सोडल्यापासून विनोबांच्या हिंदी भाषणाचा अनुवाद बंगालीमध्यें होतो. ते दोन चार वाक्यें बोलले की आशादेवी जनतेला बंगाली अनुवाद ऐकवतात. आज अनुवादाची गरज नव्हती. विशाल सभेत विनोबांची अखंड वाहणारी प्रवचन-सरिता खळखळू लागली : " मजुरांच्या नगरींत माझं येणं झालं ह्याचा मला अतिशय आनंद होत आहे. मी तर जन्मभर मजूरच राहिलों अन् भूदान यज्ञ हि मजुरांची च चळवळ आहे. शेतात राबणाऱ्या बेजमीन, बेजबान (मूक) शेतकऱ्यांची समस्या मीं हातीं घेतली आहे.

मजूर मालक हा भेद च मिटो, हीच माझी इच्छा. समाजात जोंवर हे असले दर्जे राहतील आणि भारतीय ह्या नात्यानें प्रत्येक जण एक दुसऱ्याशीं भावाचें नातें जोडणार नाहीं तोंपर्यंत मी विश्रांति घेणार नाहीं, सतत फिरत राहीन. कारखाने आणि शेती दोन्हींचा मालक कोणी राहणार नाहीं. शेती गावाची व कारखाने देशाचे. माझ्या प्रिय मजूर बांधवानो ! हा देश तुमचा आहे. तुमच्या च परिश्रमान, घामान बनला आहे."

मागें एकदा त्यानीं मजुराना पृथ्वी डोक्यावर धारण करणाऱ्या शेषनागाची उपमा दिली होती. जणू त्याना सुचवायचें होतें, "आपण सारे त्या नागोबाच्या भरवशावर जगत आहोंत. जर का त्याची मर्जी गेली तर संपलेंच सारें ! आवडीच्या काँग्रेसमध्यें 'समाजवादी रचने'चा ठराव पास झाल्याची बातमी आली आहे. त्याबद्दल समाधान व्यक्त करून विनोबा म्हणाले, "जुनीं मूल्ये कायम राहिलीं तर समाजवादी रचना कशी होणार ? नवा माणूस च नवी रचना, नवें जग निर्माण करील. तुमचें हें स्थान अखिल भारतीय केंद्र आहे. अन्याय प्रांताचे लोक इथें आले आहेत. तेव्हा इथें भारतीय संस्कृतीचें दर्शन व्हायला पाहिजे. संगीतात एक नाहीं, अनेक स्वर असतात, पण ते सुसंवादी असतात. त्या सर्व स्वराचें मीलन होतें, म्हणून संगीत निर्माण होतें. भारतीय विविधता व एकता दोन्हीं मिळून आपल्या संस्कृतीचें एक संगीत बनल आहे. ते इथें प्रगटलें पाहिजे."

सभेनंतर पुस्तकें विकताना आज फारच मौज वाटली. व्यासपीठाला लोकांनीं घेरलें होतें. आणि कुणी ओडिया 'गीता प्रवचनें' मागायचा, कुणी हिंदी, तर कुणाला 'बंगाली' हव होतं, कुणाला तेलगू. मराठी गीता प्रवचनाची मागणी झाली तेव्हा मात्र खूपच गमत वाटली. भारतीय एकतेचें दर्शन गीता प्रवचनाच्या द्वारें होतें. १९३२ सालीं धुळ्याच्या तुरुंगामध्यें असताना बाबानीं मराठीमध्यें गीतेवर प्रवचन दिलीं होतीं. बाबा शान्त मुद्राय बोलत आणि साने गुरुजी शान्त मुद्राय त्या शब्दाना लिपिबद्ध करीत. त्या वेळीं बोलणाऱ्याला कल्पना नव्हती की लिहिणाऱ्याला कल्पना नव्हती, की हे शब्द भारताच्या कानाकोपऱ्यात पोहोचतील नी लाखों लोकाना प्रकाश देतील, दुःखाचे जीवन उजळतील, दुःखाला शांति देतील,

कुणाला परमार्थाचें वेड लावतील नी कुणाला वैराग्याची प्रेरणा देतील ! तीं प्रवचनें प्रथम मराठींत प्रसिद्ध झालीं होतीं. नंतर भारताच्या जवळ जवळ सर्व भाषामध्यें त्याचा अनुवाद झाला आहे आणि आज तर तीं प्रवचनें अहिंसक क्रांतीचा पाया च बनलीं आहेत.



## : १४ :

## 'गीताई'च्या जन्माची कहाणी !

बलरामपूर
१८, १९ जानेवारी '५५

नुकतें च कुठें तांबडें फुटू लागलें होतें. चार मैलाचें अंतर चालून आम्ही बलरामपूरच्या अभय आश्रमात पोहोंचलों होतो. खादीचे शुभ्र कपडे घालून मुलामुलींचीं टोळकीं स्वागत करीत होतीं. इथे 'कस्तुरबा ट्रस्ट'चें व 'नई तालीम'चे केंद्र आहे. अर्धोन्मीलित पहाटेच्या वेळीं मातीचे दीप आणि रांगोळीमुळें आश्रमात सर्वत्र प्रशांत सौंदर्य भासत होतें.

व्यासपीठावर बाबा बसले होते. मूलोद्योगी विद्यालयाच्या प्रत्येक वर्गांतील मुलानीं आपआपल्या परिश्रमानें तयार केलेल्या वस्तु कलापूर्ण पद्धतीनें ताटल्यातून आणून बाबासमोर ठेवल्या. एका ताटलींत पांढरे स्वच्छ तांदुळाचे दाणे हसत होते, तर दुसरींत लाल लाल टमाटे, गुबगुबीत गोबी आणि वाटाण्याच्या शेंगा खुशींत दिसत होत्या. एका ताटलींत मुलानीं स्वतः कातलेल्या सुताच्या गुंड्या होत्या, तर दुसऱ्या ताटलींत वरच्या वर्गांतील मुलानीं स्वतः विणलेला कपडा होता. प्रत्येक वर्गाच्या प्रतिनिधींनीं एकेक ताटली बाबाना भेट दिली. जीवनाला आवश्यक अशा बहुतेक सर्व वस्तु पाहून बाबा हसत म्हणाले, "अरे या ! मी तर आता स्वावलंबी झालों."

फळभाज्यानीं समृद्ध असलेल्या त्या बागेंत मातीच्या लहान टुमदार झोंपड्या कशा रम्य वाटत होत्या. लोभविणारें तें दृश्य पाहून ही जागा

सोडू नये असे वाटू लागले. आश्रमाच्या भगिनींसमवेत आमचा प्रेमालाप, हास्यविनोद चालू होता. त्याच्यापैकीं बहुतेकींना हिंदी समजत नव्हतें. आणि मला तर ' रसगुल्ले ' सोडून बंगाली भाषेतलें एक हि अक्षर कळत नव्हते. परंतु हृदयाची भाषा आम्हाला जवळ आणीत होती. बंगालमध्ये आम्हाला आणखी एक भाषा अवगत झाली होती, शब्दाची नव्हे, स्वराची. आश्रमात कुठल्या हि कामाच्या निमित्ताने इकडून तिकडे जाताना कुणी हि सखी दिसली कीं तिला म्हणावे, जरा तेवढी ओळ म्हणून दाखव कीं !"

' अबोझ शिशु मायेर घरे, सहज मने विहार करे ।
अभिमानी ज्ञानी तोमार, बाहिर द्वारे ठेके आछे ।। '

( परमेश्वरा ! अज्ञानी, निष्पाप बालक मातेच्या घरात सहज भावाने विहार करतो, परंतु अभिमानी ज्ञानी मात्र तुझ्या दाराबाहेर च उभा राहतो. )

मग ती ओळ गुणगुणत आम्ही पुढें सटकत असू !

प्रफुल्लबाबू व त्यांची भगिनी जमुनादेवी या आश्रमाच्या प्रमुख आहेत. अतिथिसेवेंत बारीक सुद्धा उणीव राहू नये म्हणून दोघे हि सतत धडपड करीत होतीं. जेवणाचे वेळीं लाडूंचे लाडू वाटताना प्रफुल्लबाबू म्हणाले, "ही आमच्या बंगालच्या खेड्याची मिठाई बर का ?" बंगालच्या जेवणात ' मासळी ' आवश्यक मानली जाते. इथें ब्राह्मण तर मासळी खातात च पण आश्रमात हि मासळी खाल्ली जाते. मात्र आतिथ्यधर्माला अनुसरून आम्हा लोकांप्रीत्यर्थ यात्रेंत शुद्ध निरामिष जेवण तयार करतात.

सकाळीं नऊ वाजता बंगालच्या भूदान कार्यकर्त्यांची सभा होती. सभेला आरंभ झाला तो नीनादी व गोपालबाबूंच्या गोड सुरांनीं—

' आमादेर यात्रा हल शुरु, एखन ओगो कर्णधार तोमारे करी नमस्कार ।
एखन बातास छुटूक, तुफान उठूक फिरबोना गो आर ।। '

ईश्वराला आपल्या नौकेचे कर्णधार बनवून व त्याला प्रणाम करून ज्यानीं आपलें तारू अफाट सागरात सोडून दिले, त्याला कुणाचें भय आहे ? उपेक्षेची हवा वाहू लागो वा विरोधाचे तुफान उठो, ते मागें फिरणार नाहींत. त्याचे तारू पुढें पुढें च जाणार.

कार्यकर्त्यांनीं आपआपले अनुभव सांगितले इथें प्रत्येकजण कवितेंत च बोलतो आहे असें वाटतें. सुंदर काव्यमय संस्कृत शब्दांची रेलचेल असते.

बंगालची परिस्थिति जरा वेगळ्या तऱ्हेची आहे आणि अजूनपर्यंत जास्त काम होऊ शकलें नाहीं म्हणून कार्यकर्त्यांना बऱ्याच अडचणींना तोंड द्यावें लागत आहे. बाबा म्हणतात, विहीर खोदताना प्रथम टणक दगड फोडावे लागतात, तेव्हा खालीं स्वच्छ, सुंदर पाण्याचें दर्शन होतें. आज ते कार्यकर्त्यांना म्हणत होते, "तुम्ही सारे कामाला लागाल तर समस्या सुटायला वेळ लागणार नाहीं. नाहीं तर 'एकश्चंद्र तमो हन्ति' असें चालेल. हा आपला 'चारुचंद्र' आहे च सतत एकटा काम करीत!" चारुबाबूंनीं विधानसभेचा व प्रजा समाजवादी पक्षाच्या सभासदत्वाचा राजीनामा देऊन भूदान यज्ञामध्यें उडी घेण्याचा निर्णय जाहीर केला तेव्हा बाबांनीं त्याच्या निर्णयाचें स्वागत करीत त्याना लिहिलें, "नि पक्ष वृत्ति आणि अनन्य भक्ति या दोन पंखावर आपला पक्षी गगनसंचार करू शकतो."

आश्रमाविषयीं आपले विचार प्रगट करताना विनोबा म्हणाले, "आश्रम-व्यवस्था ही आपल्या देशाची प्राचीन योजना आहे. तिथे विद्यापीठाचें व जनसेवेचे काम होत असे गांधींच्या काळात आश्रमसंस्थांचें पुनरुत्थान झालें. आश्रमाचा आसपासच्या गावाशीं मायलेकरासारखा संबंध असावा, गुरुशिष्यासारखा संबंध असावा. मातेपासून मुलाला प्रेम आणि पोषण

सुट्टीचा दिवस च गायब आहे. आज हि तीनची घटा खणाणली. साडे-तीनला प्रार्थना झाली व बाबा जवळच्या गावाकडे फिरायला निघाले.

रात्र सरली होती, दिवस उगवायचा होता. अधुक प्रकाशात गावात पोहोचलों. तिथे बघितलें तों वरचें आकाश जणू पृथ्वीवर उतरलें होतें. हॅण्ड्स दीपक हातीं घेऊन ग्रामीण भगिनींनीं स्नेहपूर्ण स्वागत केलें. ते दीपक सृष्टीतील भौतिक अंधार मिटवू शकत होते, पण समाजातला अन्याय व विषमतेचा अंधार कसा नी केव्हा नाहींसा होणार ? सर्वोदयाचे प्रदीप्त हृदय दीप पेटतील तेव्हा. त्या दीपानीं उजळलेल्या जगात जो काळा कुट्ट अंधार दिसत होता तो पाहून बाबांचें हृदय विदीर्ण झालें. त्या गावात अर्धेअधिक लोक भूमिहीन होते. तेथील जमिनींचे मालक कुणी शेजारच्या गावात तर कुणी शहरात राहत होते. आजवर त्यांचेजवळ दान मागायला कुणी पोहोंचले देखील नव्हते.

मध्याह्नकालच्या प्रवचनात त्यांची वेदना बोलत होती. "इथल्या लोका-जवळ दान मागणारे पोहोचले असते आणि तरी हि दान मिळाले नसतें तर मला त्याचें यत्किंचित् हि दुःख झालें नसतें. कारण बाबाजवळ दुसरे हि शस्त्र आहेत. अहिंसेच्या शस्त्रागारात शस्त्रांची कमतरता नाही. अहिंसा कधीं हि निष्फळ होणार नाहीं जर तुमच्या आमच्यात तितकी अहिंसा नसेल तर तुम्ही आम्ही निष्फळ होऊ शकतों. परंतु अहिंसेचा एक प्रयोग होत आहे, तो पूर्णपणे अजमावला गेला नाहीं जिथे विधायक कार्याचा आश्रम आहे, तिथे दान मागायला कुणी पोहचत नाहीं तर ती वेगळी गोष्ट आहे. प्रयत्नच दिसत नाहीं तेव्हा तो एक चिंतनाचा विषय बनतो. काळपुरुष आपल्या करता थांबेल का ? आपली वाट पाहील का ? आपल्याला उसंत देईल का ? मात्र कार्यकर्त्यांची निष्क्रियता पाहून माझा उत्साह दुणावतो. मीं अंतःशोधन केले व ह्या निर्णयावर येऊन पोहोंचलों की, हे काम परमेश्वराचें आहे आणि तो च हे करील. ज्याच्यावर परमेश्वराचा आशीर्वाद असेल त्याला तो निमित्त मात्र बनवील. ज्याचें सर्व जीवन आणि चिंतन मार्क्सच्या मार्गानें गेलें त्या जयप्रकाशसारख्या क्रांतिकारांचें चित्त देखील ह्या आंदोलना मुळें प्रभावित झालें. मला ही ईश्वरी घटना वाटते. जे शक्तिशाली नाहींत पण भक्तिशाली आहेत, अशा कित्येकांनीं ह्या कार्यात जीवन समर्पण

केलें. हें कार्य शक्तीनें होणार नाहीं कीं युक्तीनें होणार नाहीं. परतु ज्यांचीं हृदये भगवताच्या भक्तीनें भरलीं आहेत, अशा माणसाच्या द्वारे होईल."

आजची दुसरी विशेष महत्त्वाची घटना होती साहित्यिकांचा मेळावा. माझी माँ ( निरुपमादेवी ) च्या निमत्रणावरुन बगालचे अनेक मान्यवर साहित्यिक आज इथे एकत्र जमले होते. माझी मॉनीं स्वत. क्रातीचा मधुरस चाखला होता, म्हणून त्यांना उत्कटतेनें वाटत होते कीं, इतरानीं हि त्यात त्यांना साथ द्यावी व आनद लुटावा. आश्रमाचे कलावत माझी माँच्या बरोबर सभेचा हॉल सजवीत होते. बाबाच्या आसनामागेंच बापूची खूप मोठी प्रतिमा होती. त्याच्या मुखावर प्रसन्नता होती. सत्याच्या मार्गावर ते एकाकी निघून गेले. पण त्याची हाक कुणीं तरी ऐकली होती आणि त्यानें ती इतराना हि ऐकवली होती. भूदानयज्ञात प्राप्त झालेल्या चाळीस हजार एकर जमिनीवर त्याच्या चरणाची धूळ विखुरली होती.

बाबाच्या आसनासमोर मातीच्या पणत्याचा एक दीपस्तभ ठेवला होता. जमुनादी, श्यामा रांगोळीनें भूमि सजवीत होत्या. कुणितरी कलश आणून मांडीत होती व निर्मला व नीनादी फुलाच्या माळा करीत होत्या. पूजेचें साहित्य ठेवलें होतें. माझ्या हातात 'गीता प्रवचने' पुस्तक होतें त्यातील एका वाक्यावर माझी नजर थांबली होती. "पुरुषोत्तम सेव्य, पुरुष सेवक, आणि सारी सृष्टि पूजेचें साधन." बाबा नेहमीं म्हणतात, "तासा दोन तासाची पूजा पुरेशी नाहीं. तुझी प्रत्येक कृति पूजामय होऊं दे"

सभेच्या आरभीं साहित्यिकाचा परिचयसमारंभ झाला नतर भूदान-कवितांचें गायन. बाबानीं काहीं क्षण दीपस्तंभावर दृष्टि रोखली व नतर ते डोळे मिटून ध्यानस्थ झाले. धूप, उदबत्ती आणि फुलाच्या सुगधानें वातावरण दरवळलें होतें. पण त्याची रचना अशी केली होती कीं स्तभाच्या पायाशीं अकरा पणत्या. नतर त्यावरच्या थरावर नऊ, पुढें सात, पाच, तीन व सर्वांत उच्च जागीं एक पणती होती. जणू एकादश इंद्रियें, नवद्वार, सप्तलोक, पचप्राण, त्रिगुण, पुरुष प्रकृति 'एकमेवाद्वितीयम् ब्रह्म' चें प्रतीक रूप ठेवलेल्या ज्योतींचा प्रशान्त प्रकाश पसरला होता. शब्द-सरिता गंभीर भावानें वाहू लागली.

" लहानपणीं कविता करण्याचा नाद होता मला. माझ्या दृष्टीनें कविता उत्तम झाली कीं ती मी अमिनारायणाला अर्पण करीत असें. एकदा माझ्या आईनें मला गीतेचा मराठी अनुवाद आणायला सांगितला. जो अनुवाद प्रकाशित झाला होता तो जरा अवघड होता, म्हणून तो काहीं तिला आवडला नाहीं. मग ती मला म्हणाली, ' विन्या, तूच का नाहीं करीत रे अनुवाद ? ' तिला विश्वास होता कीं तिचा ' विन्या ' उत्तम अनुवाद करू शकतो." गोष्ट सांगणें सुरू होतें. आईच्या कोमल स्मृतीनें मृदु हृदय व्याकुळ झालें, गळा भरला. कसेबसे शब्द उच्चारले गेले, " मला सर्वांत अधिक बळ जर कुणीं दिलें असेल तर..." थांबले शब्द फुटेनात. आसवांचे मणी ओघळू लागले. सरस्वतीच्या उपासकांनीं डोळे पुसले. सारी सभा चित्रवत् होती. पुन: शब्द ऐकू आले. " माझ्या आईनें दिलें. तिनें माझ्यावर असीम विश्वास ठेवला. त्या विश्वासानें च मला अपार बळ मिळालें. त्यातून च पुढें ' गीताई 'चा जन्म झाला. साहित्यिकाची शक्ति परमेश्वराच्या शक्तीसारखी आहे. मला तुमचा आशीर्वाद हवा आहे "

अश्रु फुलें, शब्द सुमनें, भाव-कुसुमें, कुणास ठाऊक आणखी कसला सुवास होता तो ! पण ते सारे साहित्यिक मंत्रमुग्ध होऊन परतले.



: १५ :

## ' शांतीचे प्रयोग '

मेटिया, मानरा, गोसाई
२०-२२ जानेवारी '५५

लेखणी निर्मलाची परमप्रिय सखी आहे. आणि अलीकडे बाबांनी तिला तिच्यापासून दूर राहायला सांगितलं आहे. पुन्हा एकदा तिने हातीं वेत घेतं तर त्यांनी लगावीन म्हटलं, " तरीपण अगदी उत्तम होईपर्यंत मी पुन्हा एक कार्यक्रम मागतो. हसा जा, नाचा जा, खेळा जा, गात जा."

भरत, रजत त्यामुळे खुप झाले, कारण त्याना खेळायला एक सवगडी मिळाला. काल कलकत्त्याहून आमची बाल मैत्रीण – सिंधु तिवारी – भेटीला आली होती. सिंधु आली कीं हसण्याखिदळण्याला अगदीं ऊत येतो. काल दिवसभर तिनें आम्हाला खूप हसवले. निर्मला तिला म्हणाली, "तू बरोबर राहशील, तर बाबानीं मला दिलेला कार्यक्रम छान पार पडेल."

आज सकाळीं ते सारे परतले त्यामुळें सुन सुन वाटत होत. तेवढ्यात च बाबाच्या शब्दानीं लक्ष वेधलें सेवाग्रामाहून आलेल्या कलापत देवीभाईशीं बाबा बोलत होते, ' जी कला समजायला ट्रेनिंगची जरूर आहे, trained eye, trained ear ची जरूर आहे, ती श्रेष्ठ कला नाहीं. श्रेष्ठ, उच्च कला तर सूर्यनारायणासारखी असते. क्षितिजावर तिचे दर्शन होताच सर्वांच्या हृदयात आनदाच्या ऊर्मि उसळू लागतात.''

काल्पासून आलेली स्वीडनची वृद्ध महिला ' स्टॉलिन शाति पुरस्कार ' विजेत्री आहे. आज सकाळीं बाबा तिला म्हणाले, " लढाई न होणें म्हणजे शाति नाहीं. शातीकरिता विधायक दृष्टिकोण हवा. " दिवसभर त्याच विषयावर त्याचें चिंतन सुरू होते. मग सायकाळच्या प्रवचनात त्यानीं शातीवर सूत्रबद्ध विचार प्रकट केले.

" शातीकरिता शस्त्रास्त्रासारखीं अशातीचीं साधनें बनविण्याचे परशुरामाचे असफल प्रयोग आज हि चालू आहेत. त्याच्याजवळ विचार नाहीं. दुसरा प्रयत्न आहे ' यूनो 'चा. त्यामध्यें राष्ट्राराष्ट्राचे प्रतिनिधी व पुढारी एकत्र बसून सल्लामसलत करून समस्या सोडविण्याचा प्रयत्न करीत असतात. परतु त्याच्याजवळ परस्परविश्वास नाहीं. नैतिक शक्तिवर्धन ( Moral Rearmament ) करणाऱ्याचा तिसरा प्रयत्न आहे. परतु त्याच्याजवळ हिंसा कीं अहिंसा याचा निर्णय नाहीं. शाततावादी (Pacifists) चा हि एक प्रयत्न चालू आहे. त्याचेजवळ निर्णय असला तरी हि सक्रियता व विधायक दृष्टिकोण नाहीं जागतिक शाति आदोलन ( World Peace Movement ) चालविणाऱ्याचे हि प्रयत्न सुरू आहेत.

वास्तविक परिस्थिति अशी आहे कीं, रशिया, चीन, पाकिस्तान, हिंदुस्थान इ० देशाना आज देशाच्या निकासासाठी शातीची जरूर आहे.

म्हणून त्याना शाति हवी आहे. शाति पाण्यासारखी असते. पाण्याचा उपयोग दोन तऱ्हेनें होऊ शकतो. एक धान्य पिकविण्याकरिता तर दुसरा तहान भागविण्याकरिता. समृद्धीकरिता ज्याला शाति हवी आहे तो एकदा समृद्धि झाली म्हणजे असें म्हणू शकतो कीं, आता शाति नको परतु ज्याला पाण्यासारखीच शातीची स्वतत्र तहान आहे, त्याला कुठल्या हि परिस्थितीमध्यें शाति हवी असते. मानवाला जोंवर शातीची अशी स्वतत्र तहान लागत नाहीं तोंवर जगात शाति होऊ शकणार नाहीं. भूदानयज्ञ-द्वारें लोकाना शातीचे असें स्वतत्र मूल्य कळावें असा आमचा प्रयत्न चालला आहे."

ह्या देशात साऱ्या विश्वाविषयीं अविरोध भाव निर्माण करून व्यक्तीच्या जीवनात शाति प्रस्थापित करण्याचे सफल प्रयोग भरतभूमींत प्राचीन काळापासून झाले आहेत. आज हिमालयापासून सागरापर्यंत पसरलेल्या ह्या देशात भिन्न भिन्न वर्ग, जमाती, धर्म, प्रात इ० सर्वांमध्यें अविरोध भाव निर्माण करून समाज जीवनात शाति स्थापन करण्याचा प्रयोग चालू आहे.

बिहार यात्रेतील शहाबाद जिल्ह्याची घटना आहे. विनोबानीं एकदा एका लहानशा गावात प्रवेश केला. गावचे लोक जयघोष करीत होते—"आमच्या गावात भूमिहीन कोणी राहणार नाहीं, राहणार नाहीं (हमारे गाँवमें भूमिहीन कोअी न रहेगा, न रहेगा।)" विनोबा त्याना म्हणाले, "वा! फारच उत्तम गोष्ट आहे ही. सुप्रभाती तुम्हीं शुभसकल्प केला आहे. आता दिवसभर सकल्पसिद्धीसाठीं प्रयत्न करा, कामाला लागा. सकाळचा मत्र तर तुम्ही बोललात सध्याकाळचा मत्र दुसरा आहे तो म्हणजे "आमच्या गावात कोणी भूमिहीन राहिला नाहीं, राहिला नाहीं (हमारे गाँवमें भूमिहीन कोअी न रहा, न रहा।)" गावची मडळी उत्साहानें कामाला लागली. सारे एकत्र आले. भूमिहीन जमले, भूमिवाले जमले हिशेब केला. गावात किती भूमिहीन आहत, त्याना किती भूमि द्यावी लागेल. हिशेब झाला, आकडा निश्चित झाला. भूमिवाल्याच्या हृदयात करुणा जागली त्यानीं आपआपला दविभाग यज्ञात अर्पण केला आणि

गावातील भूमिहीनांकरिता पुरेशी जमीन गोळा केली सध्याकाळीं सभेला सारे जमले. प्रत्येकाच्या चेहऱ्यावर सकल्पपूर्तीचा आनद ओसडत होता. प्रार्थनेची वेळ होताच विनोबा सभास्थानी येऊ लागलेले पाहून त्यांनीं उचरवानें घोषणा केली, "हमारे गाँवमें भूमिहीन कोओी न रहा, कोओी न रहा।" खाजऱ्याला पोहोचलों तेव्हा तसाच उग्र काल होता. बाबांना शहाबादमधल्या घटनेचे स्मरण झालें. ते खाजरानिवासींना म्हणू लागले, "शहाबाद जिल्ह्यात जर ही घटना होऊ शकते तर तुमच्या गावात का नाहीं होऊ शकणार?"

सकाळीं विहिरीवर कपडे धुता धुता डाक मिळाली. घरून शीलाचे पत्र आलें होतें त्यात तिनें हलवा पाठवला होता. बाबांना हलवा द्यायला गेले तर तोंडात टाकत हसत हसत ते म्हणाले, "ही बूर्ज्वा समाजातील कला आहे. खूप मेहनतीनें तयार करायचा पण तोंडात टाकला की विरघळून जातो"

सध्याकाळची प्रार्थना आटोपली. नीनादींनीं अखेरची तान घेतली. स्वर तरग वातावरणात विलीन होऊं लागले. परमेशदानें तबोरा खालीं ठेवला. शब्दतरग उठू लागले "बगालमध्यें प्रवेश केल्यापासून रोज पहाटे व सायकाळीं प्रार्थनेंत भक्तिमय मधुर सगीत मी ऐकता आहें. त्याचा माझ्या मनावर विलक्षण प्रभाव पडत आहे आणि बगाल सोडून जावेंसें वाटत नाहीं. असल भावमय सगीत मला रोज कुणी ऐकवील तर आध्यात्मिक साधनेकरता आणखी काहीं करायची गरज च उरणार नाहीं, असं मला वाटत." साऱ्यांचे चेहेरे अत्यानंदानें चमकू लागले. तोंच त्यांच्या कानीं पुढील शब्द आले, "पण आश्चर्य वाटतें कीं इथ इतकें भावमय सगीत आहे तिथें कार्यकर्त्यांच्या जीवनात सगीत का आढळत नाहीं? भेदभाव, क्लेश, मत्सर, भाडणें का दिसतात? याचें कारण हेंच कीं हिंदुस्थानात आम्हीं भक्ति व धर्माचा जीवनाशीं सबध ठेवला नाहीं. भूदान हें भक्तीचें कार्य आहे. आमचे कार्यकर्ते खेडोपाडीं, गावोगावीं हिंडून लोकांना सगीत ऐकवतील तर भूदानाचा सदेश चटकन् कळेल. आज सगीत स्थिर बसलें आहे. नारदाच सगीत असें बैठे नव्हतें. नारद फिरत होते, हिंडत होते व जागजागीं लोकांच्या कानावर गीत पडत होतें. आपलें चालत फिरतें शातिनिकेतन बनावें अशी माझी इच्छा आहे"

कोकई गावात आम्हीं प्रवेश केला तेव्हा ग्रामवासीयांनी आळापर्यंतच सीमित देऊन विनोबाचें स्वागत केलें. गाव लहान होतें पण एक लहकरतात आणि निष्ठावान् कार्यकर्ता तिथे सतत काम करतो आहे. मेदिनीपूरसारखं विचार एक हि दानपत्र मिळालें नाहीं व इथें १०१ चा आकडा होता कितीमी दाट काळोख असो, तो नाहींसा करायला एक लहानशी पणती पुरेशी होते. विनोबाची क्षुधा दरिद्रनारायणाच्या क्षुधेशीं एकरूप झालेली. त्याचें एवढ्याने कुठलें समाधान होणार ? बिहारने त्याची भूक शमवली होती. १९५३ च्या एप्रिलमध्यें हजारीबाग जिल्ह्यात एका ठिकाणी त्यांनीं प्रथम 'विष्णुसहस्रनाम' ऐकवलें होतें. त्या नावाची यादी वाचण्यात किती तरी वेळ गेला पण विनोबा तन्मयतेनें ऐकत होते.

त्यानंतर त्याची ही नेहमींची मागणी. पलामू जिल्ह्यात पहिल्या च प्रवेशाच्या दिवशीं दोन हजार नावें वाचलीं गेलीं. त्याचा हा हट्ट बिहारमधें ठिकठिकाणीं पुरवला गेला. त्या गोड आठवणी सागून बाबा म्हणाले, "दान देण्याऱ्याचे नाव मला 'विष्णु'नामासमान आहे. इथें आरंभ झाला आहे ही आनंदाची गोष्ट आहे. शून्य होतें तिथें एक झाला आहे ही मोठी च गोष्ट आहे. आता त्यावर शून्यें चढवणें सोपें आहे"

शेजारच्या उकई गावच्या लोकानी आपली सर्व जमीन दिली होती. नास्ता घेऊन आम्ही विनोबाच्या मागोमाग त्या गावात पोहोंचलो. गाव फार च लहान होतें एका विशाल पिंपळाच्या पारावर आंब्याच्या डहाळ्या व केळीच्या खांबाखालीं विनोबाचें आसन होतें. गावच्या चिमण्या पोरानीं मजुळ आवाजात गाणें म्हटलें, "माटीर प्रदीप जलेछी आलो, आमार माटीर घरे." विनोबानीं आशीर्वाद देऊन म्हटलें, "तुम्हीं हें एक धर्म-कार्य केलें आहे. आता तुम्ही सारे भावाभावासारखे सुखानें व स्नेहानें नादा. तुमचीं हृदयें प्रेमानें भरू द्या." बाबानीं गाववाल्याचा निरोप घेतला. वाटलें, मातीच्या घरात तेवणारा तो मातीचा प्रदीप जणु या क्रांतीचा प्रतीक च आहे.

आजच्या सभेंत बाबा म्हणाले, "बंगालची बुद्धि कलकत्त्यात आहे आणि हृदय खेड्यात आहे. मात्र ती बुद्धि तारक नाहीं, वंचक आहे. हें हृदय मात्र

## : १६ :

# सप्तपदी

रसूलपूर, नेकुरसेनी
२३, २४ जानेवारी '५५

सध्या नागपूरचे श्री. आर. के पाटील यात्रेत काही दिवस राहण्याच्या हेतूनें व विनोबांशी चर्चा करण्याच्या निमित्तानें आले आहेत त्यांनीं नुकताच मध्यप्रदेश सरकारातील मंत्रिपदाचा त्याग केला आहे. भूदानात त्यांना जराच रस वाटतो. पाटीलसाहेब Planning Commission चे ( नियोजक मंडळाचे ) सभासद होते. वाटेत योजनेवर चर्चा सुरू होती.

बाबा म्हणत होते, "योजना करताना भूतकाळ, वर्तमान आणि भविष्य तिन्ही लक्षात घ्यावे लागतात. ज्यांना जनतेत जाऊन चळवळ करायची असते त्यांना भूतकाळाबद्दल विचार करावा लागतो. देशाचें बुद्धिवैभव, देशाची परंपरा समजून घ्यावी लागते. टिळक आणि गांधींना अशी चळवळ करायची होती म्हणून त्यांनीं गीतेचें अध्ययन केलें मीं देखील बिहारमध्ये बुद्धाचें स्मरण केलें आणि इथें आता वैष्णव संप्रदायाचे संशोधन करून त्यांना ' अहिंसक कर्मयोगा 'चा विचार दिला.

"परंतु जे राजकारणी असतात, त्यांची दृष्टि वर्तमानकाळापर्यंतच सीमित राहते. म्हणून ते बिचारे बेकारीनिवारणाच्या बाबतच विचार करतात आणि पंचवार्षिक योजना करीत राहतात. जे द्रष्टे असतात ते भविष्याचा विचार करितात मला भविष्याचें स्पष्ट दर्शन होत आहे आणि म्हणून च मी म्हणतों कीं, याच्यापुढें विज्ञान आणि अहिंसेचें युग येणार आहे केवळ विज्ञानानें मनुष्याचा सर्वनाश होईल. आणि विज्ञान नसेल व केवळ अहिंसा राहिली तर समाज जीवन Primitive बनून जाईल. म्हणून विज्ञान व अहिंसा या दोहोंचा बरोबरच विकास झाला पाहिजे.

"लोकसंख्या वाढत आहे हे ध्यानात ठेवूनच योजना करायला हवी. सर्वांना काम द्यायला च पाहिजे. लोकसंख्या कमी व्हावी, जनतेला संयम कसा शिकवायचा हें समाजसुधारकांचें, धर्मनिष्ठांचे, ब्रह्मज्ञानी ऋषींचें काम आहे वैज्ञानिक आणि ब्रह्मज्ञानी दोघे मिळून यावर विचार करतील."

अशी रोचक चर्चा चालत असली म्हणजे अंतर केव्हा संपतें कळत च नाहीं. पिंवळीं प्रफुल्लित झेंडूचीं फुलें व रानातलीं पानें यांनीं सजवलेली कुटी दिसली गावच्या एका कवीनें 'महान् पथिका'चें स्वागत स्व रचित गीतानें केलें गाताना तो भलता च भावावेशात आला होता दोन च दिवसांनीं यगयात्रा संपणार होती म्हणून कीं काय बाबांनीं निरोपाची भाषा सुरू केली स्वागताला जमलेल्या जनसमुदायाला ते सांगत होते, "'सातपदीन सख्यम्'—सात पावलें बरोबर चाललें कीं मैत्री होते आपण सारे इतके दिवस बरोबर राहिलों, चाललों तेव्हा आपला छोटासा मित्रसमाज, बंधुसमाज बनला आहे. हा समाज लहानसा असला तरी हि तो बाहेरच्या समाजाला आपलें रूप देईल परंतु त्याकरिता समाजाशीं एकरूप व्हावें लागेल. मला जर कुणीं विचारलें कीं, पंचवीस दिवस बंगालमध्यें तुम्हीं काय केलें? तर मी सांगेन, थोडंसं दहीं तयार केलें हें दहीं बाहेरच्या साऱ्या दुधाला आपलें स्वरूप देईल."

कुणीं तरी आठवण करून दिली, आज नेताजीजयंति. बाबा प्रवचनात म्हणाले, "आता आपण 'चलो दिल्ली'चा जयघोष केला तर आपली शक्ति क्षीण होईल. आता तर आपल्याला 'चलो देहात' खेड्याकडे चला म्हटलें पाहिजे."

गेल्या आठवड्यापासून स्वीडनहून आलेली 'इरिना' आमच्याबरोबर आहे. तिला पाहून 'पॅट'चें स्मरण होते. तिचे वडील 'भारताचे मित्र' आहेत आणि शेतीचे प्रयोग स्वीडनमध्ये करीत आहेत. काहीं दिवसापूर्वी त्यानीं बाबाना हिंदुस्थानातील खेड्यात उपयोगी पडतील अशीं शेतीचीं सुधारलेलीं अवजारें पाठविलीं होतीं. खादीचा पजाबी पद्धतीचा पोशाख केलेल्या अठरा वर्षाच्या कोवळ्या वयात 'भारत' पाहायाला आलेल्या 'इरिना'कडे पाहून आश्चर्य वाटतें. ती आज परत जाणार होती. उत्कल मध्यें पुन येण्याचें ठरवून जात होती. म्हणून तिला आनदानें निरोप दिला. जाताना तिने बाबाजवळून 'गीता प्रवचना'वर सही घेतली. एरवीं बाबा 'नित्यपठनीय– विनोबा' अशी सही करतात. इरिनाच्या पुस्तकावर त्यानीं 'सप्रेम' (With love) असे लिहून सही केली. इरिना खुष होऊन गेली.

इदूरच्या महाराणी देवी अहिल्याबाईनीं वैद्यनाथधाम ते पुरीपर्यंत रस्ता बाधला आहे. याच रस्त्यानें चैतन्यमहाप्रभु पुरीला गेले होते. अलीकडे आमची यात्रा याच रस्त्याने चालू आहे. आज त्या रस्यावरून चालताना बाबा आम्हाला म्हणत होते, "तुम्ही रेल्वेचा आधार सोडाल तेव्हा तुम्हाला या रस्त्याचा महिमा कळेल, त्यात केवढी शक्ति आहे ते अनुभवाने कळेल." 'दोर कापण्याचे' तत्त्वज्ञान बाबा असें सहज बोलून जातात

अलीकडे माझें 'उपनिषदाचा अभ्यास', 'ईशावास्यवृत्ति', 'स्थितप्रज्ञ दर्शन' इ० बाबाच्या पुस्तकाचें अध्ययन चालू आहे. 'उपनिषदाच्या अभ्यासा'त एक उच्च उडी आहे तें वाचत असताना आकाशात उच्च भरारी मारावी आणि 'स्थितप्रज्ञदर्शन' वाचताना योग्याच्या प्रयोगशाळेंतले प्रयोग पाहावेत. 'गीता प्रवचन' वाचताना नित्यजीवनाकरता मार्गदर्शन मिळवावें. हातीं अशीं पुस्तकें असावींत अन् पायाखालीं कधीं हि न सपणारी लाबच लाब वाट असावी! ही कल्पना मोठी उत्स्फूर्त करणारी व हृदयगम वाटते.

उद्याचा बगालयात्रेचा अखेरचा दिवस. गाणाऱ्याच्या टोळींतील मडळी म्हणत होती, "उद्या बाबा जाणार, तुम्ही जाणार! आम्हाला खूप उदास वाटेल, चुकल्याचुकल्यासारखें वाटेल." दिवसभर सगीताच्या भाषेंतच आम्ही बोलत होतों. चारुदानीं अखेरचे 'रसगुल्ले' खाऊ घातले. श्यामादी

म्हणत होती, ' तुम्ही मला हिंदीमध्यें पत्र लिहा. मी कुणाकडून तरी वाचून घेईन. मी तुम्हांला बंगालीमध्यें लिहीन. ' ठिकठिकाणीं आम्हांला मिळालेलें हें स्नेहामृत ही आमची फार मोठी ठेव आहे. बाबा म्हणतात, ' ज्यानें आपलें घर सोडलें त्याला असा अनुभव येतो कीं, जगांतलीं सारीं घरें जणुं त्याचींच आहेत ! ' आजच्या प्रवचनांत बंगालसाठीं विशेष सूचना होत्या. " बंगभूमि मोठमोठ्या सुधारकांची भूमि आहे. तेव्हां इथें स्पृश्यास्पृश्य, जातिभेद इ० बिलकूल नष्ट व्हायला पाहिजेत. बंगाली लोकांना बंगाली भाषा व बंगाली लिपीविषयीं अधिक प्रेम वाटलें पाहिजे. अजून हि इथें इंग्रजीला प्राधान्य दिलें जातें ही दुःखाची गोष्ट आहे. बंगाली लिपी पूर्व व पश्चिम बंगालला जोडणारा दुवा आहे. त्याच्याच बरोबर हिंदीचा हि अभ्यास करायला हवा म्हणजे तुम्ही साऱ्या भारताची सेवा करूं शकाल."

: १७ :

## प्रेमयात्रा

दातन
२५ जानेवारी '५५

एक अशी दंतकथा आहे कीं, चैतन्यमहाप्रभूंनीं वैद्यनाथधामाहून पुरीला जाताना याच गांवीं थांबून दात घासले होते ( दाँतौन ) म्हणून या गांवाचें 'दातन' नांव पडलें. दातनला एका तळ्याकाठच्या कपितुल्य विशाल वटवृक्षाखालीं आश्रमवासीयांनीं स्वागत केलें. सूर्योदयाचें नयनरम्य प्रतिबिंब तळ्यात पडलें होतें तें प्रतिबिंब पाहून मला आठवण झाली. पावसाळ्याचे दिवस होते. निसर्गानें मांडलेल्या पायांनीं बिहारमध्यें एका गांवाहून दुसऱ्या गांवाकडे जात होतों. भाताचीं शेतें कापलेलीं दिसत होतीं रंगानें नटलीं होतीं. रस्त्याच्या कडेला दोन्ही बाजूंनीं झिरमीं झाडें पाण्याचे थेंब लटकून राहत होती. पाऊस नुकता च पडून गेला होता. सृष्टि शान्त व टवटवीत दिसत होती. सूर्याचें कोंवळें किरण पडूं लागले. सृष्टीनी प्रसन्नता

न्याहाळीत आम्ही अतर कापत होतों. " तो पहा रे जमिनींतून सूर्य उगवतो आहे." बाबांनीं लक्ष वेधलें. रस्त्याच्या कडेला असलेल्या खळग्यात साचलेलें पाणी शात, स्थिर होतें आणि चार पाच पावलावरून दिसत होतें. पाणी नसून तिथें सूर्यनारायण च आहे. जवळ गेल्यावर दिसलें कीं, ते आकाशींच्या सूर्याचें प्रतिबिंब होतें. आकाशातला सूर्य झाडाआड लपला होता. त्यामुळें तें प्रतिबिंब हुबेहूब सूर्यासारखें भासत होतें त्यानतर जवळ जवळ पाव फर्लांगाच्या अतरावर दहा ठिकाणीं असें सूर्याचें दर्शन झालें. बाबा म्हणाले, " ह्यालाच अवतार म्हणतात " त्या दिवशीं आम्हाला अशा दहा अवतारांचें दर्शन झालें होतें. 'अवतारी पुरुष म्हणजे परमेश्वराचें प्रतिबिंब.'... नई तालीमचा वर्ग झाला आमचा.

सूर्यकिरणात चकाकणाऱ्या तळ्यातल्या पाण्यात तरग उठले. कुणी तरी घागर बुडवत असावे. बाबा म्हणत होते, " सूर्योदय ही शुभसंकल्प करण्याची वेळ आहे. मग सारा दिवस या सकल्पसिद्धीकरता साधना करायची. *सूर्यास्त झाला कीं सारें परमेश्वराला अर्पण करून रात्रीं समाधिस्थ व्हायचें.* जीवनातल्या बाल्य, तारुण्य, वृद्धावस्था व मृत्यु ह्या चारी अवस्थाना हें *लागू केले तर समग्र जीवनाचें दर्शन* एका च दिवसात होईल, आणि मग हे सर्व दिवस, आपले जीवन व हे ऋतु म्हणजे एक परमार्थाचा ग्रथच होईल."

*आज सायकाळच्या अखेरच्या प्रवचनात विनोबा बगालच्या प्रेमयात्रेत* झालेले लाभ सागत होते " या सुपीक भूमीमध्यें धर्मविचाराच बीज पेरलें *गेलें आहे. आता या बीजातून विशाल वृक्ष निर्माण होणार आहे या* यात्रेंतला हा पहिला लाभ साहित्यिकाचा आशीर्वाद या आदोलनाला *लाभला हा दुसरा लाभ क्रातीची देवता सरस्वती. जगात जिथें कुठें* महान् परिवर्तन झालें तिथ त्याची तयारी साहित्यिकानी केली आहे येथील *साहित्यिकानीं मला अस म्हटलें कीं, बगालमधें अलीकडे साहित्यिकाची* चेतना मद झाली होती परतु भूदानाच्या नवप्रेरणेनें ते पुन उत्साहित झाले आहेत *या यात्रेचा तिसरा लाभ म्हणजे भक्तिमार्गामध्यें सुधारणा* व्हावी व त्या दृष्टीनें सशोधन व्हावें, ह्यावर येथील वैष्णवसमाज विचार *करू लागला आहे हा.* येथील कॉंग्रेसनें भूदानाचें *काम* करण्याचें ठरवलें आहे. पक्षातीत होऊन शुद्ध भावानें जर कॉंग्रेस भूदानाचें काम करील तर

ती अधिकाधिक शुद्ध होत जाईल. हिंदुस्थानातील प्रत्येक राजकीय पक्षाला शुद्धीकरणाकरिता त्यागाच्या कार्यक्रमाची आवश्यकता आहे. इथें आम्हाला कांहीं साथी असे मिळाले कीं ज्यांनीं हें काम म्हणजे परमेश्वरसेवा समजून च काम केलें. सर्वांत मोठा लाभ म्हणजे बंगालच्या जनतेच्या दर्शनानं माझ्या हृदयात प्रेमाची वृद्धि झाली. प्रेमाबरोबर जिथें विचार जोडला जातो तिथें प्रेम अधिक बलवान् होतें."

वगयात्रेंतील सेवक, यात्री आशादेवींचे सदा ऋणी राहतील. कारण त्यांनीं विनंति केली अन् बाबांनीं दररोज सायंकाळीं कार्यकर्त्यांना जीवनाची वाट चालण्याकरता शिदोरी दिली. सुरवातीच्या दिवशीं सारमोनीला ह्या वर्गांना आरंभ झाला. ‘प्रार्थना का करावी, कशी करावी, समत्वयुक्त कर्मयोगाचें रूप त्याला कसें द्यावें’ इ० समजावलें. मानसिक पातळीवरून वर उठणें आवश्यक आहे, अपरिग्रहाची साधना, ब्रह्मचर्य, प्रार्थनेचें रहस्य, सर्वत्र हरिदर्शन, शेती करीत असताना जीवनविकास कसा होऊ शकतो, भक्तिमार्गाची साधना, अनिंदाव्रताची आवश्यकता इ० सारें सांगून कार्यकर्त्यांच्या जीवनयात्रेचा मार्ग उजळवला. दानवरा सत्यावरचा वर्ग झाला. त्यात बाबा म्हणाले, "इतर कुठल्या हि पापापेक्षा गंभीर अधिक पाप कोणतें असेल तर तें असत्य. त्यापुढें कुठलें हि पाप इतकें भयंकर नाहीं. आध्यात्मिक साधनेंत 'सत्या'चें स्थान अद्वितीय आहे."



# उत्कल

## : १८ :

## कलिंगभूमींत

लख्खननाथ रोड
२६ जानेवारी '५५

घड्याळानें साडेतीनचा ठोका दिला आणि बीनादीनें ईशावास्याचा बंगाली पाठ सुरु केला. बंगालची अखेरची प्रार्थना आटोपली. स्वातंत्र्य-दिनाच्या उषेने आपलें आरक्त वैभव उधळीत क्षितिजावर पाऊल ठेवलें. वंगजनतेचें भरपूर प्रेम लुटून विनोबानीं उत्कलकडे कूच केलें. वाटेंत लागणारी बंगालचीं खेडीं अखेरचीं प्रेमपुष्पें उधळीत होतीं. वंग उत्कल सीमारेषा दुरून दिसूं लागली. सुंदर सजवलेलें उंच द्वार आणि लोकांची अपार गर्दी. एका च महिन्यांत विरह-मीलनाचा, हर्ष विषादाचा एकत्र अनुभूतीचा हा दुसरा प्रसंग होता.

चारुदा निरोपाचें भाषण करायला उभे राहिले. त्यांचें कोमल वंगहृदय विकल झालें होतें. ते बोलूं लागले, " आम्ही क्षुद्र आहोत, नालायक आहोत, पण बाबाच्या आशीर्वादानें पाऊल पुढें पुढें टाकीत आहोंत. कार्य सिद्धीस जाईपर्यंत मी स्वस्थ बसणार नाहीं." एवढें कसेंबसें बोलले आणि मटकन् खालीं च बसले. त्यांचा नेहमींचा सौजन्यशील, सोज्ज्वळ, शांत चेहरा त्यांनीं दोन्ही हातांनीं झाकून घेतला आणि बालकासारखे हुंदके देऊन ते रडूं लागले. त्यांची ती सात्त्विक नी प्रेमळ मूर्ति हृत्पटावर कोरली गेली. त्या क्षणीं परमेश्वराजवळ आपलें सारें मन मोकळें करणाऱ्या व त्याच्या हातीं आपल्या रथाचे च नव्हे तर जीवनाचे हि लगाम सोपविणाऱ्या अर्जुनाच्या ऋजुतेचें नी शरणागतेचें स्मरण झालें. अतुलबाबू म्हणाले, " विनोबानीं आम्हांला ' नूतन आलोक ' दिला आहे. त्या च उजळलेल्या वाटेनें आता आम्ही हिंडूं, काम करूं."

'पथेर साथी नमी वारवार' बीनादीच्या गोड गळ्यातून करुणोत्कट सूर निघत होते मधून मधून ती डोळे पुसत होती गोपालबाबू आपले अश्रू तमोऱ्याच्या आड लपविण्याचा निष्फळ प्रयत्न करीत होते आणि परमेशदा डोळे मिटूनच साथ देत होते तमोऱ्याच्या तारा छेडल्या जात होत्या त्या नाजूक आवाजातील कप सर्वांच्या हृदयाची स्थिति दर्शवीत होता वग उत्कलची सीमा अश्रुगगेनें पावन झाली त्या अश्रूच्या प्रत्येक बिंदूमध्यें जणु शक्ति साठली होती. विनोबा म्हणाले, "सगमस्थान नेहमींच पवित्र मानलें जातें अशा स्थानावर आपण सारे एका भावगगेंत डुबत आहोत उत्कल मध्यें तर मी परिपूर्ण दर्शनाची अपेक्षा करीत आहें. इथ भूमिकाति होणार आहे" भविष्यसूचक उद्गार वाटले ते. वगभगिनींनीं बाबाना कुकुमतिलक लावला वगभूमीला अखेरचे प्रणाम करून बाबानीं पाठ फिरवली

उत्कलची जनता कितीतरी दिवसापासून वाट पाहत होती. विनोबाना पाहताच हजारों मुखातून गगनभेदी गर्जना झाली, 'महात्मा गाधी की जय' उत्कलच्या वतीने तेथील वृद्ध तपस्वी आचार्य हरिहरदास व गोपबधु चौधरी यानीं स्वागत केलें. जनसागराला भरती आली होती. त्यातच पत्रकार, फिल्मवाले, फोटोग्राफर, सरकारी अधिकारी, मत्रिगण इ० साऱ्याना पाहून वाटलं आता जनता आणि सरकार ह्यान्दोहोंतील अतर नाहींसें होण्याची प्रक्रिया सुरु झाली आहे. कुणीं तरी म्हटलें, "नबबाबू (श्री. नबकृष्ण चौधरी, मुख्यमत्री) दिसत नाहींत कुठें?" साऱ्यानीं डोळे फिरवले. गर्दीत कुठल्याशा जीपवर उभे होते ते. जनतेचा प्रथम सेवक जनतेंत उभा होता

उत्कल गरीब आहे, त्याच्याजवळ पैसा नाहीं. उत्कल श्रीमान् आहे, त्याच्याजवळ सेवारूपी धन आहे उत्कल मागासला आहे, त्यावर पाश्चात्य सस्कृतीचा रग फारच कमी चढला आहे. उत्कल पुढारलेला आहे, प्राचीन भारताच्या सस्कृतीचा उत्तम अश तिथ प्रगट होत आहे. "धावणाऱ्या इतराना त उभे राहून मागें टाकतें." (तत् धावत अन्यान् अत्यति तिष्ठन्।). विनोबानीं उत्कल भूमीमध्ये प्रथम प्रवेश केला आणि त्याना पहिल्या भेटींत च एक लाख पधरा हजार एकर जमीन, ४० हजार दानपत्रें

व ४६ ग्रामदान अर्पण केले. हें उत्कलमध्यें च का घडलें ? वैज्ञानिक म्हणतात, "कारणाविना कोणती हि गोष्ट घडत नाही." ६ ऑगस्ट १९४५ या दिवशीं हिरोशिमावर प्रलयाची आठवण करून देणारें काही तरी पडलें. त्याचा संबंध एका अतिसूक्ष्म परमाणूशीं आहे." वैज्ञानिकाचें हें म्हणणें आम्ही अज्ञानी मानव चटकन् कबूल करतों. परंतु महात्मा वारंवार सांगतो, 'तपस्येंत, निरहंकार सेवेत शक्ति असते, प्रलयकारी शक्ति नव्हे तर निर्माणकारी.' तें मात्र आपल्याला कळू शकत नाही.

१९२१ सालीं गांधीजींची हाक ऐकून आपल्या सुखी जीवनाचा त्याग करणारे जे पराक्रमी वीर निघाले त्यांत उत्कलचे गोपबाबू व त्यांच्या पत्नी रमादेवी होत्या. त्या क्षणापासून गेलीं तीस वर्षें सतत त्या उभयतांनीं गांधीजींबरोबर 'सत्याची उपासना' केली. भारतं यांच्या बेड्या खळखळ तुटल्या, स्वराज्य आलें परंतु गांधीजींचें स्वप्न साकार झालें नव्हतें ही गोष्ट या गांधीभक्तांच्या हृदयाला बेचैन करीत होती. देशांत सर्वत्र असंतोष होता. पण मार्ग सापडेना. चिंतन चाल्लें च होतें. तों च एका दिवशीं अग्नी चैतन्याचे वारे खेळविणारी बातमी आली. तेलंगणांतील धगधगत्या ज्वाला विझविल्या गेल्या. अशांतीचें शमन शांतीनें झालें. शांति मिळविण्याकरतां शांतीची उपासना शांतीनें करीत- विनोबा तिथें पोंहोंचले होते. शांति *मिळाली. अहिंसेचा विजय झाला. विनोबाच्या पायांना गति मिळाली* आणि इकडे गोपबाबू व रमादेवींनीं उत्कलची प्रदक्षिणा सुरू केली. गांवोगांवीं, खेडोपाडीं पायीं चालत जाऊन गोरगरीबांच्या सुखदुःखाशीं ते *समरस होऊं लागले. तेलंगणांत विनोबांना भूमीचें दान मिळालें. पण* इथेहि तें कसें शक्य आहे, असा विचार प्रथम त्यांच्या मनांत आला. परंतु रमादेवींनीं देवाचें नांव घेऊन एक दिवस जमीन मागितली. मातेच्या *मागणीला उत्कलवासीयांनीं शिरोधार्य मानलें. उत्कलची दानगंगा अशी* वाहूं लागली.

एका विस्तृत मैदानासमोर मातीची स्वच्छ सारवलेली प्राथमिक शाळेची इमारत होती. तिला आम्हीं आमचें 'घर' बनवलें. हिरव्यागर्द मेंदीचें कुंपण होतें, पिवळींधमक झेंडूचीं फुलें हसत होतीं नी रांगोळी 'साक्षी

पाहून चला ' म्हणत होती. सारें काही साधे होते. कुठला हि वडेजाव, दिखाउपणा नव्हता. तो साधेपणा च गोड नी सुंदर वाटू लागला

दुपारीं कार्यकर्ते जमले. एकाने विचारलें, " भूदान चळवळीच्या मागें प्रेरणा तुमची आहे. तुमच्या मजबूत पण वृद्ध खांद्यावर हें आंदोलन उभें आहे. आंदोलन चालू राहावें म्हणून कोणाला वारस नेमलें आहे तुम्हीं ? "

विनोबा—मी तर म्हणतो, ही चळवळ परमेश्वराच्या खांद्यावर उभी आहे, माझ्या नाहीं तोच मला प्रेरणा देतो आणि चालण्याची शक्ति देतो. माझ्यानंतर परमेश्वराला जो हवा असेल त्याचा हात धरून तो त्याला चालवील. त्याची चिंता मी का करूं ? मी तर निमित्तमात्र बनलों आहे. याचा अर्थ असा कीं, ह्या कामाची जबाबदारी प्रत्येकावरच आहे.

प्रश्न — तुमची ही चळवळ निरनिराळ्या पक्षातील संधिसाधू ( opportunisits ) लोकांना वाव देणारी आहे, अशी टीका काहीं लोक करतात. तुमचें यावर काय म्हणणं आहे ?

विनोबा — संधिसाधू लोकांना सुअवसर, सुसंधि मिळणें केव्हा हि चांगलें. परंतु बहुधा असे लोक कुठल्यातरी भलत्याच ( बुरे कामर्में ) कामात अडकलेले आढळतात म्हणून अशा लोकांना तर माझें आव्हान आहे कीं त्यांनी सर्वांनीं मिळून हें काम १९५७ पर्यंत पूर्ण करावें. ते आम्हाला exploit करू शकत नाहींत उलट ते स्वतं च exploit होतील.

' आम गॉरे भूमिहीन रहिबे नाहीं, रहिबे नाहीं ' हा जयघोष करीत चारी दिशानीं लोकांच्या झुंडी येत होत्या. पाहता पाहता विराट् जनसमुदाय बनला. उडिया भाषेंत स्थितप्रज्ञाच्या लक्षणाचा पाठ आटोपला. उच्च आवाजात विनोबा बोलू लागले,

" माझ्या अत्यंत प्रिय मित्रांनो,

" अखेर एकदा माझें या वीरभूमीमध्यें आगमन झालें आहे, त्याचा मला अतिशय आनंद होत आहे. ह्या च वीरभूमींत सम्राट् अशोकाला अहिंसेची दीक्षा मिळाली होती आणि ' चंड अशोका 'चें परिवर्तन ' धर्म अशोक 'मध्यें झालें होतें. ही ती कलिंगभूमि ! येथील वीरानीं सख्यानंल कमी असून देखील सम्राटाच्या बलशाली सेनेशीं टक्कर दिली होती."

कलिंगभूमि आणि सम्राटाचें हृदयपरिवर्तन ! ज्यांच्या शब्दांनी चहूदिशी काळाचा पडदा दूर झाला. सख्याबल अपुरे असून हि महापराक्रमी चक्रवर्ति सम्राटाच्या अथांग सेनेला तोंड देणाऱ्या शूर कलिंगवीराच्या तितिक्षेनें सम्राटाच्या हृदयात परिवर्तन घडवून आणलें. ते वीर कापले जात होते पण पळ काढत नव्हते. आपल्या रुधिरानें त्यांनी सारी भूमि आरक्त करून टाकली. त्या आरक्ततेच प्रतिबिंब सम्राटाच्या हृत्पटलावर उमटलें नी तिथें अनुराग प्रगटला. बाहेरचा संग्राम संपला, आतला सुरु झाला. रणांगणावरील संग्रामात शस्त्रबलानें विजय मिळवून हि तो पराभूत झाला होता. आतरिक संग्रामात पराभूत होऊन हि तो विजयी झाला होता. विजय आणि पराजयाची ही एकत्र अनुभूति जगाच्या इतिहासात अद्वितीय स्थान मिळवून बसला होती. मध्यंतरींच्या अनेक वर्षांच्या काळात विस्मृतींत विलीन झालेल्या कलिंगभूमींत पुन: एक वार नवदर्शनाची प्रभा फाकू लागली होती. कलिंग भूमीला पुन: एक वार श्रेय मिळणार होतें.

एक काळ होता, बळीराजानें सर्वस्व अर्पण करून परमेश्वराला कायमचें जिंकलें होतें. कलिंगवीरांनीं सर्वस्व अर्पण करून अशोकाच्या हृदयातील परमेश्वराला जागवल होतें. आज सर्वस्वदान देणाऱ्या कलिंगवीरांमुळें समस्त मानवजातीच्या हृद्देशात क्रातीची प्रक्रिया आरंभ होत होती. एका काळीं यज्ञात आहुति अर्पण करून विश्वनियामक देवताना संतुष्ट करून शांति पुष्टि तुष्टीची निर्मिति केली जात असे. कलिंगवीरांनीं समरयज्ञात आपल्या प्राणांची आहुति अर्पण करून अशोकाच्या हृदयभूमींत शांति तुष्टि पुष्टीच्या तत्त्वज्ञानाचे बीजारोपण केले. आज कलिंगवासी भूदान यज्ञात आपल्या काळजाच्या तुकड्याच्या आहुति अर्पण करून पृथ्वीतलावर शांति, तुष्टि, पुष्टीचें साम्राज्य निर्माण करू पाहत होते. यज्ञाची ती च सनातन प्रक्रिया चालू होती, आविष्कार तेवढा नूतन होता !



## : १९ :

# पूर्णांचा समन्वय

नाम्पो
२७ जानेवारी '५५

पहाटे पणत्याच्या प्रशान्त प्रकाशात यात्रेला आरंभ झाला. वाटेंत लागलेल्या प्रत्येक गावात दुतर्फा पणत्याची रांग होती. चोहोंकडे जणु दिवाळी चालली होती. नवीन च तयार केलेला लहानसा रस्ता कच्चा होता. दोन च दिवसापूर्वी माझ्या चपला तुटल्यामुळें त्या खडकाळ रस्त्यावर प्रत्येक पाऊल सभाळून टाकावे लागे. 'क्षुरस्य धारा निशिता दुरत्यया दुर्गं पथस्तद् कवयो वदन्ति'चें स्मरण होत होतें. बाबा बोलत होते अशा वेळीं बहुधा प्रत्येकाची च बाबांच्या जवळ जवळ चालण्याची धडपड असते वाट लहानशी च, अरुंद असल्यामुळें सारे ऐकू शकत नव्हते पण आज इथें वेगळें च दृश्य पाहायला मिळत होते प्रत्येकाला वाटत होतें, "आधीं त्याला ऐकू दे" चोधरी कुटुंबाची सारी मंडळी बरोबर होती, पण सेवा आणि त्याग ह्यामध्यें स्पर्धा करणे एवढें च त्याना माहीत. त्यामुळें त्यांच्यापैकीं कुणी समोर दिसेना. बाबांच्या मागोमाग चालणाऱ्यांच्या गर्दींत कुठे तरी गोपबाबू होते एखाद्या तपस्वी ऋषीप्रमाणें दिसणाऱ्या गोपबाबूंना येथील जनतेनें 'उत्कलचे गांधी' हा बहुमान दिला आहे गर्दीच्या दुसऱ्या कोपऱ्यात त्यांचे धाकटे बंधु नवबाबू होते, ज्याना येथील जनतेनें 'मुख्य मंत्र्या'च्या पदावर बसविले आहे बाबांच्यापुढे शंभर पावलावर चालणाऱ्या 'मुख्य मंत्र्या'ची पत्नी मालतीदेवी पथ प्रदर्शिकेचे काम करीत होत्या आणि रमादेवी चालता चालता यात्रीदलाच्या व्यवस्थेसंबंधीं बरोबरच्या कस्तुरबा ट्रस्टच्या सेविकाबरोबर योजना आखीत होत्या. बाबांच्या एका बाजूला गोपबाबूंचे चिरंजीव मन मोहनभाई होते ते बाबांच्या भाषणाचा उडिया भाषेंत अनुवाद करतात त्यांच्या मागें आमची सुमित्रा वहिनी होती दुसऱ्याना जेवू घातल्याशिवाय ती कधीं जेवीत च नाहीं. 'भाबी, अशाने आम्ही राऱ्या च नणदा बनून जाऊ' असें तिला म्हटले कीं नुसते स्मित करीत म्हणते, "बना कीं! आवडेल मला!"

साधेपणाच्या गोष्टी बोलणें, त्याचें चित्र रगवणें किती सोपें आहे ! परतु उत्कलच्या ह्या मडळींचा साधेपणा ' जोले तैसा चाले ' चें स्मरण करून देणारा वाटतो.

गुजराथहून आलेल्या एका माईनीं विचारलें, " समन्वय म्हणजे काय?" दोन्ही हात उंच करून उच्च स्वरात बाबा म्हणाले, " ॐ पूर्णम् अदः पूर्णम् इदम् । " लोक मला विचारतात तुम्ही वेदान्त आणि बौद्ध धर्मांचा समन्वय करू इच्छिता तर काय ते दोन्ही अपूर्ण आहेत ? मी म्हणतों, " अपूर्णांचा समन्वय होऊन पूर्ण दर्शन मिळेल हा विचार च मुळीं चुकीचा आहे. भारतात हिंदु, बौद्ध, इस्लाम, ईसाई इ० जे प्रमुख विचार आहेत ते सर्व पूर्ण आहेत; त्या सर्व पूर्णांचा समन्वय करून त्यातून परिपूर्ण निर्माण करण्याचा आम्ही प्रयत्न करीत आहोंत."

प्रश्नकर्त्यांची जिज्ञासा वाढली. " त्याचा मार्ग कोणता ? " समोर रस्त्यावर निर्देश करीत हसत हसत बाबा म्हणाले, " अहो, हाच मार्ग, हाच रस्ता, ज्यावर आपण आता चालत आहोंत. आज बालेश्वर, उद्या कटक, परवा पुरी ! पुढें पुढें जात राहू. मजुराचा चागुलपणा मालकाजवळ, मालकाचा मजुराजवळ नेऊ. असेंच गरीब श्रीमत, शिक्षित अशिक्षित, स्त्री पुरुष प्रत्येकाजवळ जाऊ." एवढें बोलून ते गुणगुणू लागले, " बडेकी बडाई छोटेकी छोटाई दूर करे. "

त्या गृहस्थानीं सत्याग्रहावर एक प्रश्न विचारला. बाबा म्हणाले, " आज हि माझा सत्याग्रह च चालू आहे. थडी, वारा, ऊन, पाऊस यांची पर्वा न करता चालणें, सर्व साधनें उपलब्ध असताना पायीं यात्रा करणें, हें सारें म्हणजे सत्याग्रहाचा च एक प्रकार आहे लोक म्हणतात, ' हा सत्याग्रहाचा फारच सौम्य प्रकार झाला. तीव्र प्रकार पाहिजे. ' पण ते हे विसरतात की, सौम्य, तीव्र, तीव्रतर ही हिंसेची परिभाषा झाली. अहिंसेमध्यें जें सर्वांत सौम्य शस्त्र असतें ते च अधिक प्रभावी होतें. "

चर्चा सुरु असताना च मुक्कामावर पोहोचलों. बाबा म्हणतात, " आपल्या यात्रेचा हा च आनंद आहे. मुक्त आकाशाखालीं मुक्त चिंतन. " हल्लीं भारताच्या पूर्वकिनाऱ्यावर यात्रा चालली आहे. समुद्रालगतचा प्रदेश

असल्यामुळें सृष्टीचें नवीन च रम्य रूप दिसत आहे. सर्वत्र ताड, खजूर, नारळ आणि केळीचीं झाडें दिसत होतीं. नास्त्याला ओला नारळ आणि केळीं मिळतात आणि त्याबरोबर इथें सर्वांचे जे उन्मुक्त प्रेम मिळतें त्यानें जेवणाची गोडी वाढते. रमादेवी [ ओरिसांत आईला ' बोऊ ' म्हणतात ] आमच्या ' बोऊ ' आणि मालतीदेवी 'नुमा' यांच्या ओरिसाभर पसरलेल्या मुलींमधें आमची गणना पूर्वीपासून च होती. बंगालमध्यें जन्म घेऊन उत्कलला आपली कर्मभूमि बनविणारी मंगलामावशी आमच्या यात्रेची व्यवस्था करते. उत्तरा ( नरहरीबाबूंची ज्येष्ठ कन्या आणि कै. महादेवभाई देसाईंची सून ) नुकतीच गुजराथमधून इथें काम करायला आली आहे. तिचीं दोन मुले सघमित्रा व नचिकेता या दोघांची आम्हा मावशींशीं दोस्ती व्हायला वेळ लागला नाहीं. सारा दिवस त्यांच्या खोड्या सुरू असतात. सहा वर्षांची सघमित्रा सभेमध्यें भूदानाचें उडिया साप्ताहिक ' ग्रामसेवक ' विकते तर तीन वर्षांचा चिमणा नचिकेत बोबड्या बोलांत भूदानाच्या घोषणा करीत असतो.

इथें सकाळ सध्याकाळच्या प्रार्थनेची जबाबदारी मंगलामावशींवर आहे. आजच्या प्रार्थनेंत मावशींनीं अच्युतानंदाचें एक भजन म्हटलें,

' आत्मारे आत्माकु देख ' ( आत्म्यांत आत्म्याला पहा ).

त्याचा उल्लेख करून बाबा आज भाषणांत म्हणाले, " आत्मौपम्यबुद्धि भूदान यज्ञाचा पाया आहे."

## : २० :

# 'मानपूर'चें 'ऑस्ट्रेलिया'वर आक्रमण

बढापाल, जामसूलि
२८, २९ जनेवारी '५५

बाबा मनमोहनभाईंशीं (बुलुभाई) उडिया लिपीविषयीं बोलत होते. बाबांचें म्हणणें, "उडिया लिपि कठीण आहे. तुमचा 'त' तस्लीफ देणारा व 'र' रडविणारा आहे. ज्या मुलाना ही लिपि शिकावी लागते त्याच्यावर हा मोठा अन्याय आहे. त्याची मला मोठी दया येते. असें वाटतें, ही लिपि बालशत्रु पंडितानीं निर्माण केली आहे. इथें अद्याप बहुसंख्य जनता अशिक्षित आहे तेव्हा लिपिसुधार करणें तुम्हाला फार सोपें आहे. तुमच्या अक्षरावर मोठमोठे फेटे का आहेत ? इथे लोक तर फेटे घालीत नाहींत" बुलुभाई हसत हसत म्हणाले, "डोक्यावरचे काढून अक्षरावर ठेवले असतील !"

बुलुभाई 'ग्रामसेवक' पत्रिकेचे संपादक आहेत. त्यांनीं लिपीविषयीं काहीं सुधारणा सुचविल्या आहेत आणि त्याच्या साप्ताहिकात त्यांनीं त्या अमलात हि आणल्या आहेत. देशाची एकता आणि भाषाची देवाण घेवाण या दृष्टीने बाबाची सूचना अशी आहे. "प्रत्येक भाषेचीं काहीं उत्तमोत्तम पुस्तकें त्या त्या भाषेच्या लिपीमध्ये तर प्रकाशित व्हावींत च परंतु काहीं नागरी लिपीमध्ये हि व्हावीत. सर्व भाषावाले नागरी लिपि स्वीकारतील तर एक मेकाची भाषा शिकणें अतिशय सोपें होईल."

आज स्नान करण्याकरता सुवर्णरेखाचें निर्मळ व विशाल पात्र होतें. कपडे धुताना उत्तराची झटपट काम उरकण्याची पद्धत मोठी आकर्षक वाटत होती. ती दोन्ही पोराना स्नान घालून स्वयंपाकघरात काम करायला केव्हा पसार झाली कळलें सुद्धा नाहीं. गोपराजूची सोज्ज्वळ नी प्रेमळ कन्या अन्नपूर्णादेवी आमची चुनीअप्पा [इकडे वडील बहिणीला 'अप्पा' म्हणतात] आपल्या सारगर्भ विनोदानें वातावरणात खेळकरपणा निर्माण करते. अगदीं प्रथम एक वर्षा

पूर्वी मीं त्याना पाहिले होते तेव्हा वाटलें होते कुणी साधीभोळी सेवाळ नाई असेल, पण हळूहळू या झाकल्या माणकाची ओळख होऊ लागली. चुनी-अप्पानीं 'गीता-प्रवचन' व इतर हि काहीं हिंदी पुस्तकाचे ओडिया भाषेत भाषातर केलें आहे. 'ग्रामसेवक'ची अर्धीअधिक जबाबदारी त्याच उचलतात. आपल्या बुद्धिमत्तेचा नि विद्वत्तेचा पत्ता कुणाला लागू नये असा त्याचा सतत प्रयत्न असतो. पण आम्ही मात्र त्याच्या 'तिजोरी' वर हल्ला करून त्यातील रत्ने लुटण्याची संधि कधीं दवडत नाहीं. त्याच्या सर्व घरच्या मडळींत वावरताना बाबाचें वाक्य राहून राहून आठवतें. "रक्त पाण्यापेक्षा घट्ट असत. पण पाणी रक्तापेक्षा अधिक पवित्र असत." (Blood is thicker than water but water is purer than blood).

दुपारीं कार्यकर्त्यांच्या सभेत एक प्रश्न विचारला गेला. "सार्‍या वातावरणात सर्वोदयाचा विचार पसरेल तेव्हाच काम होईल. तोंवर एकाच गावात काम होणे शक्य आहे?" या प्रश्नाचें उत्तर प्रार्थनासभेतील भाषणात होतें. "सर्वोदयविचाराचे हेच वैशिष्ट्य आहे कीं, ज्याला तो विचार पटला तो एकटा देखील तो विचार अमलात आणू शकतो. सार्‍या जगाविरुद्ध अन्यायाचा प्रतिकार करण्याकरता एक माणूस हि उभा राहू शकतो. हेच सत्याग्रहाचे तत्त्व आहे या तत्त्वाचा उदय आपल्या देशात झाला आहे. आजकाल शस्त्रत्यागाची गोष्ट निघाली कीं प्रत्येक राष्ट्र म्हणतें कीं समोरचें राष्ट्र जेव्हा शस्त्रत्याग करील तेव्हा च मी हि करीन. अशा तर्‍हेनें एकीकडे शस्त्रास्त्र वाढविणे चालू आहे नी दुसरीकडे शातीच्या गोष्टी चालू आहेत. ज्या क्षणीं कुणी एक व्यक्ति, एक गाव वा एक समाज हिंमतीनें पुढे येईल, त्या क्षणीं हें दुष्ट चक्र (vicious circle) खडित होईल."

उत्कलमध्ये सर्वांत पहिले ग्रामदान 'मानपूर' या गावात झालें. त्याचा उल्लेख करून विनोबा म्हणाले, "जगातला प्रत्येक मनुष्य विश्वनागरिक आहे, हा भारताचा विचार आहे. भूदानाचा हा विचार आतरराष्ट्रीय क्षेत्रात पसरेल, त्याचें नेतृत्व येथील सेवकाकडे येईल. म्हणून च माझें म्हणणें आहे की, मानपूरचें आक्रमण ऑस्ट्रेलियावर होणार आहे."

हर्षभरानें सारे क्रातिविचार ऐकत होते. सभा सपली. "आम गाँरे भूमिहीन रहिबे नाहीं, रहिबे नाहीं, रहिबे नाहीं" (आमच्या गावात

कुणी भूमिहीन राहणार नाहीं ) चा उद्घोष झाला. दोन्ही हात उंचावून जयघोष करणाऱ्या जनतेमध्ये मुख्यमंत्री ( नवबाबू ) सामील झाले होते.

गोपबाबू ( बाप्पा ) चे भाचे जितेंद्रभाई नुकतेच जर्मनीहून तत्त्वज्ञानाची डॉक्टरेट घेऊन आले होते. सध्या ते यात्रेंत आहेत. जामसुलि या गावाकडे जात असताना त्यांची तत्त्वज्ञानावर बाबांशीं चर्चा सुरु होती. बाबा म्हणत होते, " उपनिषद् हें वेदाविरुद्ध बंड आहे असें पाश्चात्यांचें जें मत आहे, तें सर्वशः चुकीचें आहे. उपनिषदांतलीं कांहीं वचनें घेऊन ते असा निष्कर्ष काढतात. पण तसें पाहिलें तर प्रत्यक्ष वेदांत हि असलीं वचनें आढळतात. वेदांतील शब्दाचा अर्थ वर वर दिसतो तसा नाहीं. भाषा जेव्हा तयार होत होती तेव्हांचे ते शब्द आहेत. तेव्हा शब्दाच्या मुळाशीं जायला हवें. त्या शब्दाचे आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक अशा तीन दृष्टि-कोणांतून तीन अर्थ करता येतात."

स्वागताकरिता उभारलेल्या द्वारावर गोकुळाचें चित्र होतें. त्याच्याकडे बोट दाखवून सकाळीं बाबा जमलेल्या समुदायाला म्हणत होते, " असें गाव करायचें आहे बरें का आपल्याला ! "

मध्याह्नकाळच्या भाषणांत गोकुळाचें शब्दचित्र त्यांनीं गावकऱ्यांसमोर मांडलें. " लोक म्हणतात, हा बाबा साऱ्या दुनियेलाच बाबा करायला निघाला आहे. पण असा आक्षेप घेणारे लोक असंग्रही समाज म्हणजे काय तें समजले नाहींत. बाबांच्या असंग्रही समाजाचीं पाच लक्षणें आहेत. (१) समाजात प्राचुर्य राहील, लक्ष्मी विपुल राहील, (२) लक्ष्मीचें समान विभाजन, वितरण होईल, (३) दारू, सिगरेट इ० निरर्थक वस्तूंचा संग्रह राहणार नाहीं, (४) क्रमयुक्त संग्रह राहील. तो क्रम म्हणजे उत्तम अन्न, कपडा, उत्तम घर, शेतीचीं अवजारें, ज्ञानार्जनाचीं साधनें, मनोरंजनाचीं साधनें असा राहील, (५) पैशाचा संग्रह कमींत कमी राहील.

शेवटीं बाबांनीं प्रश्न केला, " असंग्रही समाजाचें हें चित्र पाहून आशा वाटते कीं निराशा ? " मीं सहज वळून बघितलें. माझ्या शेजारींच बसलेल्या गावकऱ्याच्या चेहऱ्यावरचे भाव किती मोलके वाटले ! सारी आशा प्रगटली होती तिथें. जणू त्याला म्हणायचें होतें, " असें गोकुळ, असा स्वर्ग जर मिळत असेल तर जमीनच काय, सर्वस्व देखील अर्पण करू आम्ही ! "

आजकाल श्रमदानाचा कार्यक्रम चालतो. आज सकाळीं काहीं मंडळी गावगाल्याचे तलाव खणणें चालू होतें तिकडे गेली, काहीं स्वयंपाकघरात गेली. यात्रीदलाचे एक भाई सांगत होते, "मातीच्या टोपल्या वाहून वाहून आम्ही दमून गेलों होतों पण नुमा (मालतीदेवी) मात्र मजेत टोपल्या उचलीत होत्या." इकडे आम्ही कणीक मळत होतों तेवढ्यात कार्पेत आसन व हातात चाकू घेऊन नाना तिथें आले अन् सरळ भाजीच्या ढिगाजवळ आसन घालून बसले. मग एकेक वांगे उचलून ते कापू लागले. त्याची ती पद्धत पाहून वाटेल कीं जणू एखादा चित्रकार कुशलतेने चित्र काढीत असावा किंवा कोणी भक्त एकाग्रतेनें पूजा करीत असावा. कॅमेरावाले आणि फिल्मवाल्याची धावपळ सुरू झाली.

बालकाला समजवायचें तें बोलून नव्हे तर करून. नाना आम्हाला कर्मयोगाचा पाठ असा च देत असतात. कृष्ण स्वत. अर्जुनाच्या घोड्याचा खरारा करीत असे, राजसूय यज्ञाच्या वेळीं उष्टया पत्रावळी उचलत असे; मग भक्ताकरता याहून दुसरा कोणता उपदेश हवा? जेवताना हें सारें आठवत होतें. आज वांग्याच्या भाजीला अवीट गोडी होती!



## : २१ :

## 'गांधीजींच्या विश्वासास पात्र व्हा'

मथानी, रूपसा
३०, ३१ जानेवारी '५५

सान्या सृष्टीला रश्मिसूत्रात ओवून प्रकाशमान करणारा आदित्य अस्ताचलाकडे वळताच काळोखाची चाहूल लागते. पुढें पुढें जाणाऱ्या त्याच्या पावलांबरोबर आशेचीं किरणें दूर पळतात आणि मग निराशेची लांबच लांब रात्र सुरू होते वाटतें, आता सदा सर्वदा अंधारच अंधार राहणार! पण पुनः प्रभात होते. उदीयमान आदित्याला पाहताच मानवाला वाटतें, कुणी नूतन दूत आला आहे. पण काल त्याचा अस्त झाल्यावरनें वाटत होतें तो कालचा च सूर्य असतो!

आज ३० जानेवारी. राष्ट्रपिता बापूची पुण्यतिथि ! आजच्या भाषणात बाबा आत्म्याच्या अमरतेची अनुभूति सांगत होते, " गांधीजींच्या प्रयाणाची बातमी मीं ऐकली त्याच क्षणीं माझ्या मनात आलें कीं, आता बापू अमर झाले. आज या क्षणाला हि मला हीं च अनुभूति होत आहे. बापू देहधारी होते तेव्हा त्यांच्याजवळ पोहोंचायला थोडा तरी वेळ लागत असे. पण आज तर त्याना भेटायचें असलें म्हणजे क्षणाची हि वेळ लागत नाहीं. जरा डोळे मिटून विचार केला म्हणजे त्याची भेट होऊन जाते." ' आर्त भक्त ' बोलू लागला, " गेले वर्षी पावसाळ्यात पूरपीडित प्रदेशात यात्रा सुरू होती. तेव्हा देखील मला एक क्षणभर हि असें वाटलें नाहीं कीं मी मोठ्या कठीण मार्गानें चालत आहें. मला सतत वाटे कीं बापूच्या मागे मागें, त्यांच्या चरणचिन्हावरून मी चालत आहें.

" आज सात वर्षे झाल्यानतर असें म्हणताना आनद होत आहे कीं, देश हळूहळू बापूच्या उपदेशाच्या जवळ जवळ येत आहे. आज ' पब्लिक सेक्टर ' आणि ' प्रायव्हेट सेक्टर ' हा वाद चालू आहे. पण सपत्तीवाले सर्वोदयाचा विचार समजून घेतील तर हा वाद मिटेल. आज गाधीजींच्या प्रयाणदिवशीं माझ्या सर्व च श्रीमान् मित्राना माझा प्रेमपूर्वक आग्रह आहे कीं, गाधीजींनीं आमच्यावर श्रद्धा ठेवली होती तर आपण त्या श्रद्धेला पात्र होऊ या. श्रीमतानीं तीन गोष्टी कराव्या अशी माझी मागणी आहे. (१) नफा आणि व्याज सोडून द्यावे. (२) सपत्तीचा उपयोग ट्रस्टीच्या नात्यानें करण्याची जबाबदारी घ्यावी. (३) प्रेमाखातर सर्वोदयविचाराच्या मान्यतेची खूण म्हणून सपत्तिदानात सहावा हिस्सा द्यावा."



: २२ :

# जनतारूपी गाईचें दोहन

वैलिंगा, मानितरी, पूर्णपादपिद।
१–३ फेब्रुवारी '५५

आजपासून आमची तीन दिवसांची मयूरभज जिल्ह्याची यात्रा सुरू झाली. मयूरभज पूर्वी संस्थान होतें आणि येथील इतर संस्थानापेक्षा सुधारलेलें होतें. इथून जंगलाचा भाग सुरू होतो. त्यामुळें येथूनचे वन व हरितसृष्टीची डोळ्यांना मेजवानी मिळते. मानितरीला शिवाच्या देवळाच्या भल्या मोठ्या आवारात फळाफुलांनी लदबदलेल्या बागेंत बाबांसाठीं एक झोपडी व आमच्याकरता एक तंबू होता. त्याच्यामागें च लांब रुंद हिरव्यागार पाण्यानें तुडुंब भरलेला तलाव होता. चारी बाजूंना उंच उंच हिरवीं झाडें होतीं. सर्वत्र शांति, शीतलता आणि प्रसन्नतेच्या साम्राज्यात स्नान करताना स्वच्छ शीतल पाण्याचा स्पर्श विशेष सुखकर वाटला. चार भिंतींआड त्याच त्या वातावरणामध्यें स्नान करण्यात ह्या मुक्त आनंदाला पारखें व्हावें लागतें.

सिंधी भाषेंत एक म्हण आहे, "पहले भूखीया पीर दुखीया बाद सुखीया." सर्वप्रथम भुकेल्या माणसाला मदत द्यावी, नंतर जो दुःखी असेल त्याला व शेवटीं जो सुखी असेल त्याला मदत द्यावी. ती म्हण सांगून बाबा प्रवचनात म्हणाले, "भूदानानें सर्वांत प्रथम मदत भुकेलेल्यांना च होते. सरकारचीं अशीं कित्येक कामें असतात कीं त्यांनें पहिली मदत सुखी लोकांना मिळते. भूदान एक शुद्ध धर्मकार्य आहे. त्याच्याकरता विशालहृदयी, सत्त्वगुणी सेवकांची जरूर आहे."

कार्यकर्त्यांच्या सभेंत बाबा म्हणत होते, "उत्कलमधील कोरापूट जिल्ह्यात ग्रामदानाची संख्या वाढते आहे. तिथें आदिवासी हि बरेच आहेत. तिथें काम करायला जाणाऱ्या कार्यकर्त्यांमध्यें 'मिशनरी स्पिरिट' असलें तर च काम उत्तम होईल. या कामाकरिता आपलें जीवन अर्पण करावें लागेल." बहुधा प्रश्नकर्त्यांचे प्रश्न नवीन नसतात, पण बाबांच्या उत्तरात मात्र नित्यनूतनता आढळते. एका प्रश्नाचें उत्तर देताना ते म्हणाले,

" प्राचीन काळीं लोकाना हें माहीत नव्हते कीं गाय दूध देते. म्हणून ते गायींना मारून खात असत. पण हें जेव्हा त्याना कळलें तेव्हापासून गाय मारण्याची आवश्यकता राहिली नाहीं. रशियाचे लोक गाईला मारून तिला खाण्याचे प्रयोग करीत आहेत. त्याना हें माहीत नाहीं कीं जनतारूपी गाय दूध देते. पण माझें काम गाईचें दोहन करून दूध प्राप्त करण्याचें आहे. "

पूर्णवादीपदा कोण्या एके काळीं एका राज्याची राजधानी होती. बाबा त्या गावच्या लोकाना म्हणाले, " तुम्ही परस्पराची चिंता कराल तर हे गाव पूर्वीसारखेंच वैभवाला चढेल. दुसऱ्यावर जबरदस्ती करून स्वत. वैभव प्राप्त करण्याचे पूर्वीचे दिवस आता गेले. आता प्रेमानें व सेवेनें च वैभव मिळेल. "

आग्ऱ्याहून आलेले श्री. बाबुलाल मित्तल नुकतेच यात्रेत सामील झाले आहेत. बाबुलालजी उत्तर प्रदेश विधान सभेचे सभासद तसेंच आग्ऱ्याच्या सामाजिक जीवनातील एक प्रसिद्ध गृहस्थ आहेत. तीन वर्षांपूर्वीं बाबा आग्ऱ्याला गेले होते तेव्हापासूनच भूदानानें बाबुलालजींच्या मनात बेचैनी निर्माण केली होती. आता सारीं बधनें झुगारून देऊन सर्वस्वीं मुक्त होऊन सेवा करण्याकरता ते बाबाकडे आले आहेत. त्यांच्याशीं झालेल्या चर्चेवरून मीं ताडलें कीं, बाबा ह्याना बहुधा कोरापुटनिवासी करणार व आदिवासीं च्या सेवेचें भाग्य त्याना लाभणार. पण मीं सहज विनोद केला, " मित्तलजी, बाबा तुम्हाला चागलेच अडकवणार असं दिसतय्." ते अत्यत नम्र गृहस्थ आहेत. ते गभीरपणें मला म्हणाले, " माझ्या जीवनाचे लगाम च मीं त्यांच्या हातीं सोपविले आहेत. आता यापुढें त्यानीं आज्ञा करावी आणि मीं तिचें पालन करावें हेंच माझें जीवन. "



## : २३ :

## अमृतस्य पुत्राः

अयोध्या, रेमुना, बालेश्वर
४ ६ फेब्रुवारी '५५.

अयोध्येला पोहोंचताच बाबाचे 'नाटक' सुरु झालें. स्वागताला आलेल्या मंडळींमध्यें गावचे जे पाच मुख्य लोक होते त्याना जवळ बोलावून ते म्हणाले, "हें पहा, हे पाच पांडव आहेत." मग त्यातील प्रत्येकाला एकेका पांडवाचें नाव मिळालें. तेवढ्यात आणखी एक गृहस्थ उठून उभे राहिले. ते प्रमुखापैकीच होते. कुणीतरी म्हणालें, "कर्ण देखील आला आहे." बाबा त्यावर पटकन् म्हणाले, "अरे वा! फार छान! आता तुम्ही सर्व पांडव मिळून गावची सारी जमीन दान द्या. कमींत कमी गावच्या जमिनीचा सहावा हिस्सा तरी द्या."

माझ्या आईनें अमरावतीहून पाठविलेलें तिळगुळाचें पार्सल कऱ्याच ठिकाणीं हिंडून आज माझ्या हातीं लागलें. सर्वांना तिळगूळ वाटत मी महादेवीताईंना द्यायला गेलें. ताईंची तब्येत अलीकडे चागली राहत नाहीं, म्हणून त्यानीं बाबाना विचारलें, "हें खायला मला हरकत नाहीं ना?" बाबा हसत म्हणाले, "खा कीं! पण थोडा मला देऊन मग खा." आणि त्यानीं वडीचा एक लहानसा तुकडा तोंडात टाकला देखील मीं लगेच आईला पत्र लिहून टाकलें, "तुझ्या हातचा तिळगूळ बाबानीं आपणहून खाल्ला."

नवबाबू मुख्य मंत्री आहेत च पण भूदान कार्यकर्ते देखील आहेत. त्यामुळें यात्रेमध्यें सरकारतर्फे रेकॉर्डिंग मशीन फोटोग्राफर, जिपेची गाडी इ० व्यवस्था केली गेली आहे. आमच्याबरोबर राहणारे सरकारी अधिकारी देखील इतर कार्यकर्त्यांमध्ये मिसळून गेले होते. पण बाबाना हा सारा थाट कुठून आवडायला? त्यानीं आज जिपेची गाडी परत पाठविण्याचा आदेश दिला. बिहारमध्ये असताना हि सरकारची एकेक मदत त्यानीं अशीच परत

पाठविली होती. त्यांची अशी च इच्छा असते कीं, जास्तींत जास्त काम जनशक्तिद्वारें व्हावें व सरकारी मदत कमींत कमी घ्यावी.

रेमुना हें गाव उत्कल भूदान समितीचे संयोजक श्री. शरच्चंद्र महाराणा ( गोपबाबूंचे जावई ) यांचें आहे. म्हणून आज चुनीअप्पांनीं विशेष थाटानें आमचें आदरातिथ्य केलें. नास्त्याकरिता त्यांच्या घरून च 'पीठा' नावाचें येथील एक पक्वान्न आलें होतें. या प्रांतात बहुतेक पदार्थ तांदूळ व नारळाचे करतात. मला मात्र चुनीअप्पांच्या घरच्या झाडावरील टपोरीं रानबोरें च खूप आवडलीं. बंगालप्रमाणें च इथें हि लोक मासे खातात. अनेक घरात विहिरीसारखीं छोटीं छोटीं तळीं असतात, त्याला 'पोखर' म्हणतात, त्यात मासळी पाळतात आज चुनीअप्पांचा मुलगा ज्ञानदेव मोठ्या मजेत मासे पकडीत होता.

रात्रीं सारें काम आटोपलें कीं कधीं कधीं आमची मैफल जमते. आज नुमा आणि चुनीअप्पा आपले जुने अनुभव सांगत होत्या. नुमांच्या व्यक्तित्वाचा एकेक पैलू पाहून आश्चर्यानें दिङ्मूढ होण्याची वेळ येते उत्कलच्या यात्रेला सुरुवात झाली त्या दिवशींची च गोष्ट. भगिनी वर्गाला दिलेल्या ल्हानशा खोलींत खूप च गर्दी झाली होती. रात्रीं आमची झोंपण्याची ठीक व्यवस्था करून नुमा डोक्यावर वळकटी घेऊन खोलीबाहेर जाऊं लागल्या. मीं विचारलें तर म्हणाल्या, "शेजारच्या झोपडींत ती संथालीबाई गाणें म्हणते आहे ना, तिथें जातें. तिचें गाणें ऐकेन आणि मग तिच्या जवळ च झोंपून जाईन." त्यांच्या उत्तरानें मला जबरदस्त धक्का बसला! त्या धक्क्यातून मी जागी होण्यापूर्वी च त्या निघून देखील गेल्या! बापू ह्यांना 'झंझावात' ( cyclone ) म्हणत त्यांची विमुक्तता मोठी विलोभनीय वाटते.

जनतेची सेवा करताना जनतेशीं एकरूप होणारी मुख्य मंत्र्याची ही मुक्त पत्नी आपल्या जीवनानें क्रांतीचे पाठ आम्हाला देत होती. स्वातंत्र्यसंग्रामात नुमा नेहमीं च आघाडीवर असायच्या. उत्कल प्रांतिक काँग्रेस कमिटीच्या अध्यक्षतेचें व भारतीय संविधान सभेच्या सभासदत्वाचें अशीं दोन्ही कामें त्या करून चुकल्या आहेत. पण त्यांना सत्तेमधें कधीं हि रस वाटला नाहीं. त्यामुळें तीं सारीं बंधनें फेकून देऊन त्यांनीं अनुगुलला आश्रम आणि एक मूलोद्योगी

विद्यालय सुरु केले. खेडोपाडीं हिंडून जनतेचें सुख दु ख जाणून घेणे, सर्वोदय विचाराचा प्रचार करणे व अन्यायाविरुद्ध आवाज उठवणें हें त्याचें नित्याचे काम आहे. एकदा तर त्यांनीं मुख्य मंत्र्याकडे गेलेल्या एका मोर्च्याचें नेतृत्व स्वीकारलें होते आणि आदिवासींची दुर्दशा पाहून सरकारवर जाहीरपणें कडक शब्दात टीका देखील केली होती.

अलीकडे दादा धर्माधिकारी आणि विमलताई ठकार दोघें हि यात्रेत आलीं आहेत बाबाची त्यांच्याशीं जी चर्चा चालते, त्यानें आमच्या बुद्धीला चागली च मेजवानी मिळते. बालेश्वरला जाताना बाबा म्हणाले, "अहिंसेच्या परिभाषेंत विचार करायचा आहे तर अधिक सौम्य उपाय शोधला पाहिजे. तीव्र पासून सौम्य, मग सौम्यतर आणि शेवटीं सौम्यतम ही अहिंसेची प्रक्रिया आहे."

बालेश्वरला आम्ही एका कॉलेजमध्यें राहिलों. शाळा कॉलेजचे विद्यार्थी स्वागताला जमले होते मुक्कामावर पोहोंचल्यावर बाबा नित्यक्रमानुसार जमलेल्या जमावाला उद्देशून कधीं गोड, कधीं गभीर, कधीं विनोदी असें छोटेसें भाषण करितात. आज त्याना नवीन च लहर आली आणि आवारात शिरता च नेहमींचा शिरस्ता मोडून सरळ हिरवळीवर जाऊन बसले. दवानें हिरवळ ओलीचिंब झाली होती. ताई चटकन् धावल्या, घोंगडें पुढें केलें, पण विनोबाना चाकोरींत बसणें कुठें आवडतें! आता ते मुलाना 'धरती आपली माता आहे' हा विचार सागतात कीं सर्वोदय विचाराचा प्रचार करण्याचा आदेश देतात इकडे सर्वांचें च लक्ष लागलें. मीं पेन सरसावली तों च त्या गर्दीतील एका आठ दहा वर्षांच्या मुलाला ते म्हणू लागले, 'तू ऊठ अन् भाषण कर.' तो बिचारा जागच्या जागीं चुळबुळ करु लागला. पण थोडा च वेळ. मग धिटाईनें उठून उभा राहिला आणि ओडिया भाषेंत अस्खलित व सुदर दहा बारा वाक्यें बोलला. त्याच्या बोलण्याचा आशय असा होता : "महात्मा गाधींनीं देशाला स्वराज्य मिळवून दिले परतु अद्यापि हि देशातील दु ख, दैन्य व विषमता नाहींशी झाली नाहीं. ती नाहींशी करण्याकरता हा 'द्वितीय महात्मा आला आहे.' त्याला सहयोग देणं आपणा सर्वांच कर्तव्य आहे. त्याच आम्ही हार्दिक स्वागत करतों."

भूदानाचा सदेश उत्कलमध्यें असा कानाकोपऱ्यात, पोराबाळापर्यंत पोहोंचला आहे. बाबा नेहमीं च म्हणतात, "मी जमिनीवर फिरतों आणि जमीन च मागतों, असें असून हि माझा विश्वास मात्र हवेवर च आहे. माझें काम हवेनें च होणार आहे. उद्या हीं लहान लहान मुलें च नाहींत, तर हीं झाडें, हे दगड, हे पक्षी – सारे भूदानाचा सदेश पसरविण्याचें काम करतील."

आजचीं वर्तमानपत्रें सागत होतीं– फ्रान्समध्यें मॉंड फ्रान्स ( Maunde France ) चें सरकार हरलें. नुक्ता च तर तो फ्रान्सचा 'हीरो' झाला होता! ती बातमी ऐकताच बाबांच्या तोंडून उद्गार निघाले, "लक्ष्मी चचल होती है। ऐसा कहा जाता है। पर राज्यलक्ष्मी उससे भी अधिक चचल होती है। और प्राज्यलक्ष्मी तो और भी चचल होती है।"

सकाळीं दहाच्या सुमारास उत्कलच्या मान्यवर साहित्यिकाची बैठक झाली. देवी सरस्वतीच्या मदिरात ऋषींचें ब्रह्मविद्येवर स्तुतिगान सुरु होतें. मदिराच्या गाभाऱ्यातून देवी सरस्वती वीणेच्या तारा छेडून साथ देऊं लागली. बाबा बोलत होते.

"साहित्यिकाचें लक्षणच हें आहे, ते सप्रदायातीत असतात. सप्रदायात बद्ध राहणारे साहित्यिक चिरतन नव्हे तर तात्कालिक साहित्यिक असतात. साहित्यिक ठिणगी ओळखतो. प्रकाशाचा अकुर पाहून च परीक्षा करतो.

"जगाच्या कुठल्या च भाषेंत निष्ठाभावानें 'तत्त्वमसि', 'तू ब्रह्म आहेस' असें म्हणणारें साहित्य नाहीं. हें च आमचें वैभव. ह्याचा च आम्हाला अभिमान आहे. भूदानानें भूमिसमस्या सुटेल, राजनीतीवर परिणाम होईल व लोकनीति येईल, हे आमचे सारे दावे गौण आहेत. आमचें म्हणणें हें च आहे. ब्रह्मविद्येच्या परिणामामुळें येथील हवेंत जी अहिंसा आहे, त्याचें चिन्ह भूदानयज्ञात प्रगट होतें. ही ब्रह्मविद्या साऱ्या जगात पसरेल असा माझा विश्वास आहे. शेवटीं, तुम्हीं याच भूमींत जन्म घेतलेले. हिंदुस्थानाचा मूळ स्रोत सोडून तुम्ही कुठ जाणार? तुम्ही किती हि टाळावू असाल तरी तुम्ही जे लिहाल त्यातून आत्मविद्येचें प्रकाशन तुमच्या कळत नकळत होईल. तुमच्यावर माझी श्रद्धा आहे. कारण तुम्ही 'अमृतस्य पुत्राः' आहात!"

संध्याकाळच्या विराट् सभेंत बाबांनीं 'धर्मार्थकामाः सममेव सेव्याः' वर भाष्य करताना समाजशास्त्राचें मूलभूत विवेचन केलें. "साऱ्या समाजाला मोक्षपरायण बनविणें हा च आमच्या समाजजीवनाचा महत्त्वपूर्ण आधार आहे. दुसरा आधार म्हणजे धर्म, अर्थ आणि काम ह्या तिन्हींचें समान सेवन समाजात होईल अशी योजना. तिसरा आधार हा आहे कीं, मानव-स्वभाव दिवसेंदिवस बदलत जात आहे, त्याला आपण योग्य दिशेनें नेऊ शकतों अशी निष्ठा आमच्यामध्यें असली पाहिजे, असा पुरुषार्थ आपल्याला केला पाहिजे."

## : २४ :

## सत्ता कुणाची ?

शेरगढ, बहानगाबाजार, सोरो
७-९ फेब्रुवारी '१९५५

दादांशीं चर्चा सुरु होती. दादा म्हणत होते, "मार्क्सच्या Expropriation of the expropriators चा अनुवाद तुम्हीं 'अपहर्त्यांचें अपहरण' असा केला आहे. परंतु मला 'अपहरण' ऐवजीं 'प्रतिहरण' किंवा 'परिहरण' शब्द अधिक आवडतील. भांडवलवाल्यांकरिता 'अपहर्ता' ह्या शब्दाचा प्रयोग करणें उचित आहे, पण कम्युनिस्टांकरिता तो च शब्द-प्रयोग करणे उचित नाहीं. म्हणून कम्युनिस्ट जें काम करतात, त्याला 'अपहरण' न म्हणता 'प्रतिहरण' म्हणावें. कारण भांडवलवाल्यांचें कार्य जितकें वाईट तितकें कम्युनिस्टांचें कार्य वाईट नाहीं."

त्यावर बाबा म्हणाले, "पण खुद्द मार्क्स स्वतः च दोन्हींकरिता Expropriation शब्दाचा प्रयोग करीत असे. वास्तविक दोघाना हि 'अपहर्ता' म्हणणें च ठीक होईल. हिंसा, मग ती कुणी हि करो, वाईट च आहे. सोन्याची सुरी झाली म्हणून काय झालें ? ती जीव घेणार च. म्हणून हिंसा सर्वथा त्याज्य च आहे."

अलीकडे बाबाचें ओडिया 'गीता-प्रवचनें' वाचणें चाललें असतें. त्यात त्याचें ओडियाचें अध्ययन हि होतें व ओडिया 'गीता प्रवचना'त सुधारणा हि होतात. बाबानीं आम्हाला ओडिया शिकण्याचा आदेश दिला आहे. ते नेहमीं म्हणतात, ज्या प्रदेशाची सेवा करायची त्या प्रदेशाची भाषा अवश्य शिकली पाहिजे. बाबाना हिंदुस्थानातील सर्व च भाषाचें ज्ञान आहे. त्यानीं प्रत्येक भाषेचें अध्ययन केलें आहे. पण इतर भाषात बोलण्याची सवय नसल्यामुळें त्याच्या भाषणाचा अनुवाद होतो. आता उत्कलमध्यें बुलुभाई त्याचे अनुवादक बनले आहेत. सभेमध्यें ते बाबाच्या शेजारीं पद्मासन घालून डोळे मिटून बसतात, नी बाबाचीं चारपाच हिंदी वाक्यें सपता च तावडतोब त्याचा सरस अनुवाद करतात. बाबाच्या भाषणात नित्यनूतनता असते. कधीं ब्रह्मविद्येचा महिमा गातील तर कधीं मुलाच्या शिक्षणावर सुस्पष्ट विचार माडतील, कधीं आतरराष्ट्रीय गोष्टी सागतील, कधीं ग्रामसमाजाचें चित्र डोळ्यासमोर उभें करतील, कधीं प्राचीन काळात नेतील तर कधीं आधुनिक काळात, पण बुलुभाई तितक्याच सहजतेनें अनुवाद करतात. बघणारे लोक कौतुक करतात, 'बुलुभाई तर थेट बाबाचा आवाज च बनले आहेत.' 'अनुवाद ही देखील साधना च होऊ शकते' आणि बाबा हि कौतुकानें, अभिमानानें येणाऱ्या जाणाऱ्या पाहुण्याना सागतात, "मी तर बुलूच्या अनुवादावर फिदा आहें. तो ध्यानस्थ बसतो ना, म्हणून च इतका अचूक व सुदर अनुवाद करू शकतो."

भौतिक वादानें उबून जाऊन जीवनाच्या शाश्वत मूल्याचा शोध करीत एक अमेरिकन गृहस्थ कुटुबासह हिंदुस्थानात आले आहेत. गेले काहीं दिवस ते सोखोदेवरा (बिहार) येथील जयप्रकाशजींच्या आश्रमात राहत होते. तिथून च ते बाबाच्या भेटीला आले आहेत. आज ते बाबाना म्हणत होते, "भूदानाचे कित्येक कार्यकर्ते ह्या आदोलनाकडे केवळ आर्थिक दृष्टिकोनातून च पाहतात. तें पाहून मला अतिशय दु ख होतें. साऱ्या जीवनाकडे च आर्थिक दृष्टिकोनातून पाहिल्यामुळें च तर माझ्या देशाची अशी विलक्षण अवस्था झाली आहे. एवढा सपन्न देश आहे, पण आतरिक समाधान मात्र कुणाला हि नाहीं. तिथें तुमच्या भूदानाच्या आदोलनातून आध्यात्मिक प्रकाश

मिळेल अशी मी अपेक्षा करीत आहे " बाबा त्याना म्हणाले, " भूदान-यज्ञाचा पाया च मुळीं अध्यात्माचा आहे. "

बहानगाबाजारला बाबानीं आपली 'नवी पेन्शन योजना' मांडली. " घरामध्यें आवश्यक वस्तूचा तेवढा च संग्रह असावा व बाकी सारे समाज-रूपी बँकेत जमा करावे. ज्यानें तारुण्यात गावाची सेवा केली त्याची वृद्धावस्थेंत गाव खास सेवा करील. अशा वृद्धाचें ओझे वा भार होणार नाहीं, उलट त्याच्या अनुभवापासून सान्यांना लाभ च होईल. अपरिग्रहाची मूर्ति घरची 'स्त्री' आहे मी तुम्हाला सन्यासाची नाहीं तर 'गृहिणी'ची दीक्षा द्यायला आलों आहे. तुम्ही मातृवात्सल्यान समाजाला दान देत चला."

उत्कलमध्ये काम करणाऱ्या कार्यकर्त्यांना आळीपाळीने बाबाच्या बरोबर राहता येईल अशी योजना केली आहे. रोज सकाळीं चालताना वाटेवर त्या कार्य-कर्त्यांचा बाबाशीं परिचय करून देण्याचा कार्यक्रम चालतो. मग बाबा कार्य-कर्त्यांच्या पाठीवरून हात फिरवतात व म्हणतात, 'ह, चल. आता साग मला तुझी गोष्ट अगदीं जन्मापासून आजपर्यंत' अन् मग अगदीं तन्मयतेनें ते त्याची रामकहाणी ऐकू लागतात. आमच्याबरोबर निशाकर दास नावाचा एक हरिजन कार्यकर्ता आहे. खूप छान गातो. त्याची बाबानीं विशेष च जिव्हाळ्यानें चौकशी केली त्याच्या मनात हरिजनाविषयीं जें अपूर्व प्रेम आहे त्याचें नित्येकदा अस दर्शन होतें. जणू आपल्या पूर्वजांनीं शेंकडों वर्षे हरिजनावर केलेल्या अन्यायाचें परिमार्जन च ते करीत आहेत. निशाकर-भाईच्या गाण्याची प्रशसा करताना बाबा म्हणाले, " भक्तीनें गातो आणि आवाज तर गोड च आहे त्याचा. एखाद्या पक्ष्यासारखा गातो तो. "

सोरोला जाताना बाबानीं विमलाताईना त्याची कहाणी सागायला सागितलें. विमलाताईना लहानपणापासून च देवदर्शनाची तीव्र लालसा होती. वयाच्या सातव्या वर्षी च देवाच्या दर्शनाकरता त्या जगलात पळून गेल्या होत्या. त्याचे आजोबा मोठे रामभक्त होते. त्याच्याबरोबर भजन, पूजाअर्चा वगैरे त्याना फार आवडे पुढे कॉलेजचें शिक्षण सपवून त्यानीं काहीं दिवस तुकडोजी महाराजाच्या 'गुरुदेव सेवामंडळा' तर्फे काम केलें. काहीं दिवस हिमालयात लक्ष्मण झूल्याजवळ तपस्या हि केली. आता भूदान यज्ञाचें

कार्य करीत असताना त्याना ईश्वरदर्शनाची अनुभूति होत आहे, असें त्या सागतात.

उत्कल बापूचा प्रिय प्रदेश. येथील गरीब व दु:खी जनतेच्या सेवेकरता त्यानीं गुजरातहून काहीं सेवक पाठवले होते. त्यातील प्रमुख जीवरामभाई यानीं भद्रकजवळ आश्रम स्थापला होता आणि उत्कलची सेवा करीत असताना च ते देवाघरीं गेले होते. त्याच्यापैकीं ईश्वरलाल व्यास व पुरीबाई बापूच्या आज्ञेनुसार उत्कलची सेवा करीत. ते इतके 'ओडिया' बनले आहेत कीं, मातृभाषा गुजराथी देखील नीट बोलू शकत नाहींत. व्यासजी हल्लीं यानीदलात सामील झाले आहत. बापूच्या उत्कल यात्रेंत त्याचें प्रिय कार्य 'अन्नपूर्णेचें' होतें, असें ते अभिमानानें सागतात. आज हि तें च काम त्यानीं उचलले आहे. पुरीबाई आज वृद्धावस्थेंत हि उत्साहानें काम करीत आहेत. सोरो जवळ त्याचा आश्रम आहे.

बाबा सोरोला जाताना तेथें थोडा वेळ थाबले होते. पुरीबाईच्या खोलींत टेबलावर तीन वस्तु होत्या. बापूची प्रतिमा, टकळी व गीता प्रवचन. सारे मायेचे पाश तोडून भारताच्या पश्चिम किनाऱ्याहून पूर्व किनाऱ्यावर येऊन अविरत सेवा करण्यामागें कुठलें सामर्थ्य होतें? जणू त्या तीन वस्तु या प्रश्नाचे समर्पक उत्तर देत होत्या पुरीबाईंनीं त्याना आलेलीं बापूचीं जुनीं पत्रें बाबाना दाखविलीं. "ही तर तुमची सपत्ति आहे" त्यावर पुरीबाईना जवळ बसवून घेऊन बाबा म्हणाले, "हा कोण्या ज्ञान्याचा आश्रम नाहीं, तर भक्ताचा आहे. तेव्हा इथल्या कामाचें प्रमाण पाहायचें नाहीं, तर कामामागचें प्रेम पाहायचें आहे."

आज दुपारी काहीं गावची मडळी बाबाच्या भेटीला आली होती. भूदानाचा मार्ग परिणामकारी होऊ शकेल कीं नाहीं अशी शका होती त्याना. बाबा म्हणाले, "तुम्हाला हा करुणेचा मार्ग पटत नसेल तर खुशाल कत्तली करा, रक्तरजित क्राति करायला समाजात जा. असे उदासीन, भेकडासारखे का बनता? मला जो मार्ग पटतो त्या मार्गानें मी जाईन, तुम्हाला जो मार्ग पटतो त्यानें तुम्ही जा."

सभेत प्रखर सत्याचें दर्शन करून देताना बाबाचा आवाज खूपच चढला होता. शब्द तीव्र होते.

" भूदानाचें कार्य सम्राटाच्या नाहीं, पैगंबराच्या मार्गानें चाललें आहे. प्राचीन काळीं राजा उत्तम असला तर प्रजा सुखी होई व राजा वाईट असला म्हणजे प्रजेची दुर्दशा होई. त्या काळापेक्षा आज आपण पुढें गेलों आहोंत. आज प्रत्येकाला मताधिकार मिळाला आहे असें असून हि जनशक्ति तयार होत आहे असें दिसत नाहीं. उलट, ज्याना निवडून दिलें जातें त्याच्या हातीं एखाद्या राजापेक्षा हि अधिक सत्ता राहते, प्रजा नामधारी च राहते. मद्रास आणि मुंबईला दारूबंदी झाली आहे, इतर प्रांतात अजून झाली नाहीं ह्याचा अर्थ असा होतो का, कीं मद्रास व मुंबईच्या जनतेला दारूबंदी हवी आहे व इतर प्रांतातील लोकाना नको आहे ? याचा अर्थ इतका च कीं, मद्रास व मुंबई येथील मुख्य मंत्र्याना दारूबंदी हवी आहे आणि इतर प्रांताच्या मुख्य मंत्र्याना ती नको आहे. सत्तेचें विकेंद्रीकरण होईल आणि पक्षनिष्ठ राजकारणापासून मुक्ति मिळेल तेव्हा च जनतेच्या हातीं खरी सत्ता येईल. भूदानानें स्वतंत्र जनशक्ति विकसित करण्याचें काम चालू आहे. मी तर म्हणतों कीं, सत्ता 'बाबा'ची हि चालायला नको नी 'बाबू'ची हि चालायला नको सत्ता तर विचाराची, आत्म्याची चालली पाहिजे."



## : २५ :
## भूमिचोर

जामझाडी
१० फेब्रुवारी '५५

चरणचक्राबरोबर बाबाचें चिंतनचक्र देखील वेगानें फिरत होतें. " भूदानाच्या चळवळीचें अधिष्ठान अध्यात्मनिष्ठा आहे. अध्यात्मनिष्ठा हें जीवनाचें सार आहे. ज्याच्या हृदयात ' ब्रह्म सत्य जगन्मिथ्या ' हा बोध निरंतर जागृत राहील तो च समाजसेवेचा अधिकारी होईल त्याच्या हृदयात प्रेम आणि वाणींत मधुरता येईल. जो जगाला सत्य समजतो तो च सत्ता आणि संपत्तीच्या संप्रदायाच्या मार्गे लागतो."

एका रमणीय तळ्याकाठीं झोपडींत बाबाचा निवास होता. झोपडीचा दरवाजा खूप च ठेंगणा असल्यामुळे बाबाना बर च वाकून आत जावें लागलें. झोपडींत शिरता शिरता ते गुणगुणू लागले, *'नम्र झाला भूता त्यानें कोंडिलें अनंता.'* मग आमच्याकडे वळून विचारू लागले, 'सागा पाहू ही कहाणी?' मीं पटकन् ताईंकडे पाहिलें. ताई जयभाईकडे पाहू लागल्या. निर्मला हळू च पुटपुटली, लक्षात नाहीं येत बाई. कुणाला च सागता येत नाहीं व आम्ही एकमेकाच्या तोंडाकडे पाहत आहात असे पाहून शेवटीं बाबानीं च ती कहाणी सागितली. "बळीराजाची कहाणी आहे. त्यानें नम्र होऊन परमेश्वराला कायमचें कैद केलें होतें."

इथून जवळ च असलेलें 'निरचीपूर' गाव समग्र ग्रामदानात मिळालें आहे. त्या गावच्या धनवान् लोकाचें मन जेव्हा माघार घेऊ लागलें तेव्हा रमादेवींनीं त्याना हिंमत दिली. त्या आज दुपारीं गावच्या सर्व लोकाना बाबाजवळ घेऊन आल्या. त्यातील काहींची शका होती, ब्राह्मणानी आजवर कधीं नागर हातीं धरला नव्हता. आता ते तो हातीं कसा घेतील? बाबा ब्राह्मणानीं राजसत्ता हातीं घेऊ नये असें हि म्हणतात, पण तसें कुठें झालय? आणि नागर म्हणजे विंचू आहे का, कीं हातीं धरता च तो चावेल? काळ बदलला आहे. नदी कुठल्या दिशेनें वाहत आहे याकडे जरा लक्ष असू द्या. आता यापुढें जो स्वत करणार नाहीं त्याजवळ जमीन राहू च शकणार नाहीं.

दुसऱ्यानें प्रश्न केला : 'सारी जमीन देऊ तर मुलींच्या लग्नाचें कसें होईल?' प्रश्नकर्त्याला वाटलें असेल, सन्याशाला हा नाजूक प्रश्न कसा समजेल? पण त्याला हें माहीत नव्हतें कीं ह्या सन्याशाचें कुटुंब फार मोठें आहे. त्यात चाळीस कोटि माणसें आहेत बाबा मिस्किलपणें हसत म्हणाले, "हें पहा, तुम्ही मुलींच्या लग्नाविषयीची फिकीर नका करीत बसू. तुम्ही म्हणाल ही आमची मुलगी लग्नाची आहे, तर आम्ही म्हणू हा बघा आमचा मुलगा लग्नाचा आहे. झाले, प्रश्न च मिटला." सारी मडळी खो खो हसत सुटली. गावकऱ्याचें पूर्ण समाधान झालेलें दिसत होतें. 'तुम्ही एका हातानें द्या, परमेश्वर तुम्हाला हजारों हातानीं देईल तुम्ही दुसऱ्याची चिंता करा, मग

सारा गाव तुमची चिंता करील.' हा विचार त्याच्या मनात ठसला होता. मोठ्या आनंदाने ती मडळी परतली.

आज प्रार्थना प्रवचनात ह्याचा बाबानीं उल्लेख केला : " चालत्याबोलत्या दरिद्रीनारायणाची तुम्ही पूजा करा. अन् मग जर परमेश्वराने दर्शन दिले नाहीं तर मला येऊन सागा." नतर म्हणाले, " कृष्ण जसा ' लोणीचोर ' होता, तसा ' भूमिचोर ' बनण्याची माझी इच्छा आहे. कृष्ण लोणी चोरून एकटा खात नसे, तर सर्व बालगोपालाना वाटीत असे. भूमिदानात भूमीचें असें च वाटप करायचे आहे."

सूर्यास्त पाह्यला मी व निर्मला बाहेर पडलो. विविध रगानीं नटलेले क्षितिज पाहून हृदय नाचू लागतें. मावळतीचीं सोनेरी किरणें माडाच्या उच झाडाना खुलवत होतीं. सारी सृष्टि हिरवीगार दिसत होती. या दिवसात तिकडे वऱ्हाडात रखरखीत मुद्धा झालें असेल. मोकळें रान आणि ल्हान ल्हान खोपटें न्याहाळीत असताना च सध्याछाया समोरच्या तळ्यात पडू लागली. सूर्यकिरणानीं चमचमणारें पाणी क्षणाक्षणाला काळवडू लागलें. थोड्या च वेळात सर्वत्र काळोख पसरला. तेवढ्यात बाजूच्या खोपटातून एक बाई बाहेर आली. भिंतीच्या कोनाड्यात तिनें पणती ठेवली. ती काळोखासमोर मोठ्या ऐटीनें प्रकाशू लागली. खुणेने च त्या बाईनीं आम्हाला बोलाविलें. ती गोधडें आथरू लागण्यापूर्वीं च मीं खालीं स्वच्छ सारवलेल्या जमिनीवर पटकन् बैठक मारली. मोडक्यातोडक्या ओडिया भाषेत ठराविक दोन तीन प्रश्नोत्तरें झालीं. ती मला मोठ्या प्रेमाने ' भात ' खा म्हणत होती, दोन दिवस रहा म्हणत होती. सत बाबाच्या तुम्ही मुली आहात का? ह्या तिच्या प्रश्नाला मीं उत्तर दिलें, " हो! जशी तू देसील त्याची मुलगी आहेस, तशी च मी आहें." तिनें पुढें केलेल्या टोपलींतील चिंच घेतली मीं आणि निरोप घेतला. तिला नमस्कार करता करता माझ्या डोळ्यासमोर ते शब्द नाचू लागले, " अन् मग देवानें दर्शन दिलें नाहीं तर मग मला सागा." बाबाजवळ तक्रार करायची गरज च उरली नव्हती.

## : २६ :

# ' दोघांचे हि दोष माझे '

जैतापूर
११ फेब्रुवारी '५५

इथल्या स्वागतसमितीचे अध्यक्ष बाबाना भेटले. ते तादुळाच्या गिरणीचे मालक आहेत, व या गावच्या ग्रामपंचायतचे सरपच आहेत; पण इथून पाच मैल दूर राहतात हें ऐकून बाबा मिस्किलपणानें म्हणाले, "इग्रज देखील असे च सिमल्याहून राज्य करीत होते." त्या अध्यक्षमहाशयाचें म्हणणें असें होतें कीं, "गरिबाना मदत दिली पाहिजे ही गोष्ट खरी आहे, पण त्याकरिता ते लायक कुठें आहेत? लग्नसमारभ, कर्ज इत्यादींपायीं ते जमिनी विकून टाकतात. त्याच्यामध्यें आळस असतो, निरनिराळीं दुर्व्यसनें असतात." त्याचें बोलणें ऐकून बाबा गभीर झाले. त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडले, "तुम्ही ह्या गोष्टी मला कशाला सागता? आज चार वर्षांपासून मीं सतत हिंडत आहें, व गरिबाची परिस्थिति पाहतों आहें. मला तर त्याच्या सहन-शक्तीची कमाल वाटते. त्याची शाति अपार आहे. मी जर त्याच्या जागीं असतों तर मला नाहीं वाटत कीं मी त्याच्याइतकें सहन करू शकलों असतों."

सारा दिवस त्याचें ह्यावर च चिंतन चाललें असावें. सध्याकाळच्या सभेंत ते म्हणाले, "अत्यंत दारिद्य असल्यामुळें गरिबामध्ये काहीं दुर्गुण आले आहेत हें मी कबूल करतो, पण त्याचें जीवन अपेक्षेनाहेर सात्विक असतें. आपल्या पुण्यमय जीवनात ते कधीं कधीं पाप करीत हि असतील. परतु पाढऱ्या शुभ्र कपड्यावर काळे डाग दिसावे तसे ते दुर्गुण दिसतात. मात्र वरच्या वर्गाच्या लोकाचे जीवन काळ्याभोर कपड्यावरील दोन चार पाढऱ्या ठिपक्यासारखें आहे. अशी तुलना करताना मला अतिशय वेदना होत आहेत. पण मला ती करावी लागत आहे. पण त्या दोघाचे हि दोष माझे आहेत व दोघाचे हि गुण माझे आहेत, असें च मी समजतों. आणि म्हणून च स्वत:च्या चित्तशुद्धीकडे माझें जास्त लक्ष असतें." दूरवर क्षितिजाकडे दृष्टि लावून ते बोलत होते, सर्वांचे दोष ते माझे दोष, सर्वांचे गुण ते माझे गुण.

पाप, पुण्य, सुख, दु ख सारीं रूपे माझीं च आहेत. ' ईशावास्य ' म्हणतें, ' जो स्वत मध्यें सर्व भूताना पाहतो आणि सर्व भूतामध्यें स्वत.ला पाहतो त्याला च परमशाति लाभते.' दोघाचे हि गुणदोष माझे आहेत असें म्हणू शकणाऱ्याला शाति लाभणार नाहीं तर कुणाला? म्हणून तर एका कवीनें त्याना ' शातात्मा ' म्हटलें होतें.



## : २७ :

## अहिंसक क्रांतीचा झेंडा

भद्रक
१२ फेब्रुवारी '५५

आज कोरापुट जिल्ह्याचे सेवक बाबाना भेटले. आतापर्यंत त्या जिल्ह्यात ७९ गावाचें ग्रामदान झालें आहे. बाप्पा ( गोपबाबू ) शीं कार्यकर्त्यांबद्दल चर्चा करताना बाबा म्हणाले, " ज्याच्यामध्ये विशेष वैराग्य असेल आणि ज्याना विशेष दर्शन झालें असेल, असे च लोक ह्या कामाकडे आकृष्ट होतील. इग्रजाचें राज्य होतें तेव्हा सरकारी नोकरी करणारे देशद्रोही मानले जात होते. पण आज त्याना च ' देशसेवक ' मानतात. आज सरकारी नोकरींत आराम हि होतो व देशसेवा हि होते. अशी सधि मिळत असून हि कांहीं तरुण आपल्याकडे येतात, चागल्या चागल्या नोकऱ्या सोडून येतात, हे एक आश्चर्य च आहे. आता या सगळ्याचा चागला उपयोग करून घेण्याची योजना केली पाहिजे. एकेक सेवक असा मजबूत बनला पाहिजे कीं तो एक स्वतत्र स्फूर्तिस्थान होईल. त्याकरिता सेवकाना हि निरतर अध्ययन, मनन आणि चिंतन करावें लागेल. "

भद्रक जवळ येता च लोकाचे थवे येऊं लागले, त्यावरून हें मोठें शहर असावें असें लक्षात आलें. आज सालंदी नदीच्या किनाऱ्यावर एका शाळेंत आम्हीं तळ दिला होता. बापी ( नबबाबू ) भुवनेश्वरहून आले होते. रात्र

कारभार सांभाळत असतांना हि त्यांचें मन विनोबांबरोबर फिरत असतें. म्हणून ते अधूनमधून यात्रेंत येऊन राहतात.

सकाळीं कोरापुटच्या कर्मवीरांसमोर बाबांचें भाषण झालें. "कॉंग्रेसनें 'समाजवादी रचने'चा ठराव पास केला आहे आणि त्याबरोबर अहिंसेला हि जोडलें आहे. तेव्हां आतां तुमची जबाबदारी वाढली आहे आणि काम सोपें हि झालें आहे. सोपें एवढ्याकरितां कीं, आज देशांत तुमच्याविरुद्ध कुठली शक्ति राहिली नाहीं. आपल्याला गरिबांविषयीं प्रेम आहे, कळकळ आहे असें, जर दिसून आलें तर कम्युनिस्टांचे हि सर्वसाधारण कार्यकर्ते (rank and file) आपल्याला अनुकूल होतील. आपली जबाबदारी वाढली ती एवढ्याकरितां कीं, 'समाजवादी नमुना' ह्याचा अर्थ आपण पुढें न्यायचा तें आपल्यावर च अवलंबून आहे. आपण सक्रिय होऊन जनतेशीं एकरस होऊं, स्वतंत्र लोकशक्ति बनवूं, तर त्याचा परिणाम सरकारच्या नियोजनावर हि होईल. आपलें काम जितकें खोलवर जाईल तितका त्या शब्दाचा अर्थ हि सखोल होईल."

'१२ फेब्रुवारीच्या दिवशीं गांधीजींच्या स्मृतीला सर्वोदय विचाराच्या मान्यतेची खूण म्हणून प्रत्येकानें आपल्या हातानीं कातलेल्या सुताची एक गुंडी अर्पण करावी' असें बाबांनीं मागें च सांगितलें होतें. त्याला ते 'सर्वोदयाला दिलेलें मत' (vote) समजतात. आज दाट आम्रवृक्षाच्या छायेत उभें राहून शाळकरी मुलांपासून बायांपर्यंत, सर्वांनी आपली सूताञ्जली अर्पण करून सर्वोदय समाजाला मत दिलें.

बाबांचें भाषण सुरू झालें तेव्हां सात वर्षांच्या त्या पावसाळ्याचें स्मरण झालें. सूताञ्जलीबरोबर आसवांची अंजली हि वाहिली गेली. पण त्या अश्रूंमध्यें मात्र वर्षांपूर्वींची अगतिकता नव्हती, निराशा नव्हती, तर त्या जागीं प्रार्थना होती कीं, "तुझ्या मार्गावर चालणाऱ्या प्रयत्नांत जर काम अडखळलें, तर तूं आम्हांला शक्ति दे."

बाबा म्हणत होते, "चरखा अहिंसेचें शरीरश्रमाचें प्रतीक आहे म्हणून तो अहिंसक क्रांतीचा हेतू आहे. रोज कांहीं ना कांहीं उत्पादक श्रम करणें प्रत्येकास आवश्यक केलें पाहिजे. उद्योग असा असावा कीं त्यानें एकाच्या

पोषणाबरोबर दुसऱ्याचें शोषण होऊ नये. शोषणरहित अविरोधी श्रमाचे प्रतीक म्हणून आपण खादी धारू तर असे म्हणू शकू कीं आम्हीं सदा सर्वकाळ क्रांति परिधान केली आहे." नित्याप्रमाण सूतकताई झाली पण आज त्यात नवीन प्राण सचारला होता.

अमेरिकेहून आलेले एक तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर बाबाच्या भेटीला आले होते. त्यानीं आठवण करून दिली कीं वीस वर्षांपूर्वी ते बाबाना भेटले होते. पण बाबाना कुठून आठवायला? 'तो म्हणतोय् म्हणून मीं आपली मान डोलवली.' असें ते मागून म्हणाले ते प्राध्यापक म्हणत होते, "गाधीजींना जस मीठ तशी तुम्हाला जमीन आहे ( Land is to you as salt was to Gandhiji ). बाबा म्हणाले, "अगदीं बरोबर !"

कालपासून बाबाची तब्येत चागली नाहीं. आज तर त्याच्या पोटात तीव्र वेदना होत हाती. त्याच्या पोटातला 'अल्सर' असा मधून मधून त्याना त्रास देतो तरी हि त्याचें हसणें व हसवणें चालू च असतें. ते म्हणतात, "काहीं रोग अगदीं जिगरजान दोस्त बनतात व माणसाला मरेपर्यंत सोडत नाहींत. आजवर माझे पोट inactive होतें, आता active झाले आहे." आपण देहापासून भिन्न आत्मा आहोंत, म्हणून देह-मनाच्या सुखदु:खापासून हि अलग आहोत. हा देहात्मपृथक्करणाचा विचार ते समजावून सागतात एवढें च नव्हे तर त्याचें प्रत्यक्ष दर्शन हि करवितात 'चरखा बिघडला' तर रडत बसाल कीं तो दुरुस्त कराल? त्याच्या दृष्टीने देह म्हणजे चरखा च आहे. देहाच्या दु खानें त्याची शाति ढळू शकत नाहीं.

सध्याकाळच्या भाषणात भद्रकच्या नागरिकासमोर भारताच्या जबाबदारीचें भान करून देण्यात आले. "हिंदुस्थान मोठ्या अभिमानानें हे जाहीर करील कीं, आम्हीं हैड्रोजन बॉंब तयार नाहीं केला. आम्हीं आमच्या समस्या प्रेम व शातीच्या मार्गानें सोडविल्या आहेत. आज पश्चिमचीं अल्लड मुलें असें अभिमानानें सागत आहेत कीं, 'आम्हीं खूप हैड्रोजन बॉंब तयार केले आहेत.' आपल्याला एवढें समजायला पाहिजे कीं, शेवटीं तीं मुलेंच आहेत व हिंदुस्थानाजवळ दहा हजार वर्षांचा अनुभव आहे, आपण प्रौढ आहोंत, तेव्हा प्रौढ असून हि लहान मुलाच्या खेळात भाग घेतला तर अवश्य हरू. म्हणून आपल्याला प्रौढ बुद्धीनें काम केले पाहिजे."

दिवेलागणी झाली. आम्ही नित्याप्रमाणें अध्ययन संपवून बाबाजवळ जाऊन बसलों मागें एकदा ते म्हणाले होते, "मध्यंतरींच्या काळात असें मानलें गेलें होतें कीं, स्त्रियांना वेदाध्ययनाचा, गायत्री मंत्राचा जप करण्याचा अधिकार नाहीं. पण हें सर्वथा चूक आहे. वेदामध्यें तर कित्येक मंत्र स्त्रियांनी रचले आहेत सर्वांना ब्रह्मविद्येचा समान अधिकार मिळाला पाहिजे मी तुम्हाला गायत्री मंत्र शिकवीन." आज बाबाना आम्हीं ह्याची आठवण करून दिली. तर त्यांनीं लागली च पाठ सुरू केला. त्या मंत्राचें वैशिष्ट्य, छंद सांगून मग एक एक शब्दाचा गूढ अर्थ सांगितला. मंत्रजपाचा काळ म्हणजे सूर्योदय व सूर्यास्त. त्या वेळीं सवित्याला—भगवान् सूर्यनारायणाला—ही च प्रार्थना करायची कीं तू माझ्या बुद्धीला उत्तम प्रेरणा दे. या मंत्राचा जप एकत्र्यानें करावा लागतो, तरी हि त्यात 'धीमहि' शब्द आहे. त्याचा अर्थ हा आहे कीं, ऋषि साऱ्या विद्यार्थी एकरूप होऊन मंत्रोच्चारण करीत असतो.

आजच्या पवित्र दिवशीं बाबानीं गायत्रीमंत्राचा पाठ शिकवला. त्यानें आनंद तर झाला च, पण वाटलें त्यात कांहीं 'गंभीर सूचना' तर नसेल ?



## : २८ :

# देव पूजनीय, संत अनुकरणीय

गनीगंज, हाटडीही
१३–१५ फेब्रुवारी '५५

आज बाबांची तब्येत चांगली च बिघडली होती. दिवसभर ते पडून च होते. सर्वांना काळजी वाटू लागली नवगावूनी फटकरून सिव्हिल सर्जनला बोलावलें. दर दोन तीन तासाला थोडें थोडें दहीं घेतलें म्हणजे च बाबांच्या पोटातला अल्सर शांत राहतो. ते जरी फक्त दहीं व दूध च घेतात अन् ते हि फार च थोडें, तरी हि त्यांचा दोन खाण्यातील अंतर वाढविण्याचा नेहमी प्रयत्न असतो. मध्यंतरीं त्यांचा पांच सहा तासांनीं खाण्याचा प्रयोग चालला होता त्यामुळें आता पोटातलें दुखणें वाढलें आहे. डॉक्टरानीं

सुचविलें, आतां दुसरें बद होईपर्यंत एक एक तासानतर थोडें दहीं या दूध घ्या.

गनीगज बालेश्वर जिल्ह्याचा अखेरचा मुक्काम. नित्याप्रमाणे शेंवटचा दिवस म्हणून जिल्ह्याच्या कार्यकर्त्यांची बैठक झाली. बाबानीं सदेश दिला, "निरतर अध्ययन आणि काम करीत रहा." त्याच्या सोबत एक पथ्य हि सागितलें. "कुणाची हि निंदा मनात सुद्धा करू नका. जो दान देतो त्याचे उपकार मानले पाहिजेत आणि जो देत नाहीं त्याच्याबद्दल मनात ही च सद्भावना ठेवा कीं, तो आज देत नाहीं, कारण उद्या खचित देणार आहे."

हाटडीहीला जाताना वाटेंत एके ठिकाणीं बापूच्या मूर्तीचा उद्घाटन-समारभ व्हायचा होता. गावच्या लोकानीं मोठ्या श्रद्धेनें व भक्तिभावानें मदिर उभारण्याचें व त्यात बापूच्या मूर्तीची प्रतिष्ठापना करण्याचें योजलें होतें. बिचाऱ्याच्या लक्षात येत नव्हतें कीं, मूर्ति ठेवून देवाचें रूपान्तर दगडात होत होतें. म्हणून बाबानीं उद्घाटन करण्याचें नाकारलें व "मूर्ति देवाची पूजायची असते व सताच्या आचरणाचें अनुकरण करायचें असतें" असें समजावलें. त्या लोकानीं हि बाबाची सूचना सहर्ष मान्य केली.

गरीब बिचारे खेड्यापाड्यातील लोक! तथाकथित सुशिक्षितानीं त्याना आजवर उपेक्षिलें होतें. माणसाचे दगड बनले असताना दगडी देवाविषयीं पूज्य भावना च तेवढी त्याचा विरगुळा होता. आज सतानें त्याना सहानुभूतीचा शब्द दिला होता आणि खरें स्मारक म्हणजे काय हें आपल्या रसाळ वाणीनें सागितलें होतें. खेडुतामध्यें श्रद्धा आहे. त्याचें भावजीवन अधिकाधिक विकसित केलें, उचित मार्गदर्शन केलें, तर प्रत्येक भारतीयाच्या हृदयाचें देऊळ बनेल.

फळाफुलानीं लवलेल्या वृक्षामध्यें दडलेल्या झापड्या पाहून मन आनदलें, फुललें. बाबा हि नित्याप्रमाणें प्रसन्न होते. गुरुदु ग्यापगीरहील शाश्वत शातीकडे जाण्याचा मार्ग त्याना मिळाला आहे. दुपारी ते हसत हसत म्हणाले, "मला किती यातना होतात त्याची कल्पना तुम्हाला कशी येईल? मी जोरजोरानें ओरडलों असतों, रडलों असतों, तर तुम्हाला कळलें असतें माझ्या पोटात किती दुखतेय तें. एरवीं गरें कीं आजपर्यंत इतकी तीव्र वेदना

कधीं झाली नव्हती. " मग ते आपल्या वडिलांच्या आठवणी सागू लागले, " आजारात शात राहण्याची ही कला मी त्याच्यापासून शिकलों ते कधीं आजारी पडले, कुठलें दुखणें वाढू लागलें, कीं शातपणें पडून राहत. अशा वेळीं ते इतर कुणाला जवळ हि येऊ देत नसत."

बुलुभाई बाबाना सागत होते कीं, कोरापुटचे आदिवासी ओडिया हि समजू शकणार नाहींत; तेव्हा त्याच्या सौरा, कध भाषेंत अनुवाद करावा लागेल. बाबा आम्हाला ओडिया शिकण्याकरता सागत असतात. म्हणून निर्मलानें विचारलें, " मग तिथें गेल्यावर आदिवासींची भाषा शिकावी लागेल का?" बाबा हसू लागले, पण भाषणात हें सागून म्हणाले, " होय ! तुम्हाला त्याची भाषा हि शिकावी लागेल. आमच्या साथींनीं इग्रजीच्या अध्ययनात वर्षेंच्या वर्षे घालविलीं तेवढ्या अवकाशात ते हिंदुस्थानच्या साऱ्या भाषा शिकू शकत होते. मी सथाल परगण्यात (बिहार) मध्यें यात्रा करीत होतों तेव्हा सथाली भाषेचें अध्ययन सुरु केलें ती भाषा शिकून माझ्या ज्ञानात वृद्धि थोडी च होणार होती ? पण काहीं भाषा ज्ञानाकरता नव्हे तर प्रेमाकरता शिकायच्या असतात." भर सभेत त्यानी आमची अशी हजेरी घेतली त्यामुळे आम्ही जागृत झालों आणि बुलुभाईला गुरु करून ओडिया शिकण्याचें ठरवून टाकले

श्रमजीवी आणि बुद्धिजीवी या भेदावर प्रहार करताना बाबानीं सागितलेली गोष्ट मोठी रोमहर्षक वाटली. शकराचार्य आपल्या शिष्याना ब्रह्मविद्येचा पाठ शिकवीत होते त्याना भेटायला कुणी एक सद्गृहस्थ तिथे आले. त्यानीं शकराचार्यांना विचारलें, " तुमच्या ह्या शिष्यवृदात ब्रह्मविद्येंत सर्वांत अधिक पारगत कोण झाला ? " शकराचार्यांनीं उत्तर दिले, " हे सारे बसले आहेत त्याना तर ही विद्या अवगत आहे च पण जो निष्णात आहे तो बघा तिकडे पाणी भरतो आहे. " ह्यावरून हें सिद्ध होतें कीं, ज्याला पाणी भरण्याचें, लाकडें तोडून आणण्याचें काम दिलें होतें त्याला शकराचार्यांनीं पूर्वीं च विद्या देऊन टाकली होती. " प्रत्येकाला ज्ञानप्राप्तीचा अधिकार आहे व प्रत्येकानें काहीं ना काहीं शरीरपरिश्रम अवश्य केला पाहिजे माझी इच्छा तर अशी आहे कीं, विद्यार्थी व प्रोफेसरानीं देखील चार तास अध्ययन व चार तास शेतात काम करावें "



## : २९ :

## 'स्त्री' शक्तीला आवाहन

आनंदपूर, रामचंद्रपूर, ताराकोट
१६–१८ फेब्रुवारी '५५

आनदपूरला आम्ही वैतरिणी नदीकिनारीं राहिलों. तुडुंब भरलेल्या पात्रांत पोहताना 'नदी म्हणजे ईश्वराची करुणा' हे शब्द आठवत होते. माऊलीच्या अंकावर बागडल्याचा विलक्षण आनंद होत होता. वैतरिणीचें स्नान फार पवित्र मानलें आहे. भरत-भूमींत जन्म घेतलेल्या मानवांकडून कळत नकळत कधीं पाप घडलें तर तें धुवून टाकण्याकरितां परमेश्वरानें पाठवलेल्या या नद्या ठिकठिकाणीं भेटतात.

"विनोबा जें काम करीत आहेत त्यानें लोकाना फार तर भाकरी मिळेल पण खरें कार्य तर भक्तीनें च होणार आहे." अशा आशयाची टीका करणारा अग्रलेख एका बंगाली वर्तमानपत्रात आला होता. आजच्या भाषणांत बाबांचें त्यावरचें उत्तर होतें. "मी भक्त आहे. आज जें कार्य करीत आहे तें भक्तिमार्गाचें च आहे. लोकामध्यें त्याग व प्रेमाची भाषा साक्षात् लोकांच्या कृतीमध्यें दिसून येईल तेव्हा हिंदुस्थानची पारमार्थिक शक्ति वाढेल, इहलोकची शक्ति वाढेल आणि धर्म हि परिपुष्ट होईल."

वर्तमानपत्रात नुकती च एक मजेदार बातमी प्रसिद्ध झाली होती कीं, न्यूयॉर्कमध्ये ' बायबल 'ला जमिनींत पुरून ठेवलें आहे व लकेच्या बुद्धधर्मीय लोकांनी त्यांचें अनुकरण करण्याचें ठरवलें आहे अन् ते त्याचा त्रिपिटक नावाचा ग्रंथ जमिनींत पुरून ठेवणार आहेत. कारण काय तर म्हणे त्यांचें ॲटम् आणि हैड्रोजन बॉबपासून रक्षण व्हावें. ही बातमी वाचून विनोबा ताराकोटच्या भाषणात म्हणाले, " हे दोन्ही ग्रंथ जमिनींत गाडण्याऐवजीं प्रत्यक्ष जीवनात उतरवाल तर कुठल्या हि शस्त्राचें भय राहणार नाहीं, आणि त्याने साऱ्या जगाचे रक्षण होईल. " मग ते स्त्रियांच्या शक्तीला आवाहन करीत म्हणाले, " लढाया थांबविणें तुमच्या हातीं आहे. ज्यांच्या हातीं मुलांना शिक्षण देण्याचें काम आहे त्यांच्या हातीं सारें काहीं आहे. तुम्ही पुढाकार घ्या व समाजाचा कारभार हातीं घ्या. स्त्रियामध्यें ही शक्ति प्रकट झाली तर भूदान यशस्वी होईल, सर्वोदय येईल आणि लढाया थांबतील. लढायांना पूर्णविराम देणें तुमच्या हातीं आहे."

भूदान सर्वोदय शांति ! बाबा स्त्रियांची सुप्त शक्ति जागवत होते. एखाद्या वैज्ञानिकानें अगदीं असे च ' अणु ' शक्तीला जागवलें असेल. एकेक चित्र डोळ्यासमोर झळकत होतें. दीर्घ तपश्चर्येनें क्षीणकाय झालेल्या तथागताला खीर पाजणारी सुजाता, शाश्वत सुखाच्या मार्गावर ' संघ शरण गच्छामि ' म्हणत कोमल पावलांना राजप्रासादापासून दूर दूर समुद्रापलीकडे नेणारी संघमित्रा, तिच्या सुरात सूर मिळवून ' बुद्ध शरण गच्छामि ' हा मंत्र उच्चारून जिवाचा होम करायला निघालेल्या त्या हजारो भिक्षुणी,... याज्ञवल्क्यानें माझ्या प्रश्नाला उत्तरें दिलीं. तो ज्ञानी आहे, त्याला आता कुणी प्रश्न विचारूं नका, असें आत्मविश्वासानें विद्वत्सभेंत बोलणारी गार्गी, प्राचीन भारतातील तेजस्वी स्त्रियांची ही अशी अभिमानास्पद परंपरा आहे. काळाचें चक्र चालू आहे. धर्मचक्र त्याहून गतिमान झालें आहे. आता हा ' संत ' सूर्याजी बनून दोर कापायला निघाला आहे. त्याचें म्हणणें च आहे ' बापानें घर मुलीचें नसतें च. ' पुढें हि तिनें जोडलें नाहीं म्हणजे मागचें सुटलेलें व पुढचें न जोडलेलें म्हणजे ती स्त्री मुक्तपणें पराक्रम करू शकते !

सोसाट्याचा वारा सुटला. जणु तो साथ देत होता. मी गुणगुणू लागलें,

बिजली नाचेल गगनात, वादळ होईल जोषात ।
जंगल जळेल वणव्यात, मंगल होईल देशात ।।

बौद्ध साहित्यातली एक कहाणी आहे. एकदा फार मोठा दुष्काळ पडला होता. तथागतानें सान्याना बोलाविलें आणि विचारलें, "कोण उचलेल दुष्काळनिवारणाचें काम?" राजा विनम्र होऊन बोलला, "भगवन्, माझी शक्ति सीमित आहे, मला क्षमा करा" सेनापति मस्तक नमवीत म्हणू लागला, "भगवन्, मी दुर्बळ आहे." धनिक श्रेष्ठींनें चरणस्पर्श केला. "भगवन्, माझी संपत्ति अत्यल्प आहे" दूर कोपऱ्यात बसलेली दरिद्री सुप्रिया हें सारें ऐकत होती ती हळूच म्हणाली, "भगवन्! मी हें काम उचलू शकतें, कारण प्रत्येक घरात जे काहीं आहे, तें सारें माझें आहे."



## : ३० :

## शांतीचा मार्ग

सरसचिला, रसालपुर, सुजनपुर
१९–२१ फेब्रुवारी '५५

किती दाट धुकें होतें आज. जवळचा माणूस देखील दिसेनासा झाला. मनात विचार आला, "सूर्यनारायणानीं आज सुट्टी तर नाहीं घेतली?" पण हळूहळू ते जागे होऊ लागले. धुकें विरू लागलें. प्रकाशाचीं किरणें हलकें च प्रकट लागलीं. मीं अमळ दृष्टि आजूबाजूला फिरवली, तों प्रत्येकाच्या केसावर झवलले मोती विखुरलेले दिसले. जणू दवबिंदूचा अभिषेक च झाला होता.

सान्याच्या विनतीवरून बाबानीं थोडा वेळ पालखींत बसण्याचें कबूल केलें. पण या तीन दिवसात मिळून ते जेमतेम चार सहा मैल पालखींत बसले असतील. मैल दीड मैल झाला कीं ते खालीं उतरून चालू लागायचे. डॉक्टराच्या सल्ल्यानें ते आता दर तासाला म्हणजे दिवसातून अठरा वेळा दहीं, दूध घेतात. आज ते विनोदात म्हणत होते, "दिवसातून अठरा वेळ खाणारा महापुरुष कुणीं पाहिला आहे? पोटावर अभिषेक सुरू होता च सतत

महादेव शांत होऊं लागले. अठरा वेळ खाणें म्हणजे मी गीतेचे अठरा अध्याय च खातों !" जयदेवभाई त्याच्याकरिता दहीं आणतात तेव्हा नाबा विचारतात, "आता कोणता अध्याय देतोस ?" जयदेवभाईनें अध्यायाचा आकडा सांगितला कीं मग ते त्या अध्यायाचे श्लोक मनात म्हणत दहीं खाऊं लागतात.

कर्नाटकमध्यें विद्यालयात उच्च शिक्षण घेणाऱ्या 'जयसिंगा'ला त्या शिक्षणात 'राम' वाटेना. तें सोडून तो मूलोद्योग शिक्षणातला रस चाखण्या-करता बापूंच्या सेवाग्रामला पोहोंचला. तिथलें ट्रेनिंग पुरें करून पंजाबात त्या शिक्षणाचा विचार पसरविण्याचें काम तो करूं लागला. पावसाळ्याचे दोन महिने गंगेच्या काठीं घालवून विनोबानीं यात्रेला पुन: आरंभ केला. जयसिंगाचें मन पूर्वीपासून च विनोबाबरोबर भ्रमण करीत होतें. आठ पंधरा दिवस तरी विनोबा यात्रेंत राहण्याची परवानगी देतील कीं नाहीं अशी शंका बाळगून च एक दिवस तो यात्रीदलात सामील झाला. पण त्याचें भाग्य च थोर ! आठ पंधरा दिवसासाठीं यात्रेंत पोहोंचलेला 'जयसिंग' चार वर्षें झालीं आपल्या स्थानावर निमूटपणे, शांतपणें मूकसेवा करीत आहे. बाबानीं आपल्या लाडक्या शिष्याचें नाव 'जयदेव' करून टाकलें. जयदेवाचें अस्तित्व आज हि भासत नाहीं.

आज विद्यार्थ्यांनीं विनोबाना मोठे छान प्रश्न विचारले त्यापैकीं एक प्रश्न होता, "नैतिक व भौतिक उन्नति बरोबर च होऊं शकतात का ?" बाबानीं मार्मिक शब्दात उत्तर दिलें, "दोन्हींमध्यें काहीं फरक नाहीं. दोन्ही मिळून एक च वस्तु बनते. दुसऱ्याना मदत करणें हें मोठें धर्मकार्य आहे. त्यानें चित्तशुद्धि होते. ही च गोष्ट देशसेवेला हि लागू आहे. हिंदुस्थान दुसऱ्या देशावर स्वारी करून त्याला लुटून आपल्या देशाला संपन्न करण्याचें ठरवील तर भौतिक उन्नतीबरोबर आध्यात्मिक पतन हि होईल आध्यात्मिक पतन झालें म्हणजे भौतिक उन्नति जास्त काळ टिकूं शकत नाहीं. मग दोन देशामध्यें लढाई सुरू होईल आणि त्या च बरोबर भौतिक अवनति हि होईल. पण भूदान यज्ञद्वारें लोकामध्यें सद्‌भावना निर्माण होईल, म्हणजे आध्या-त्मिक उन्नति होईल. गरिबाना जमिनी वाटल्या जातील तर ते अधिक उत्पादन करतील नी भौतिक उन्नति होईल. मनुष्य आपलीं सांसारिक कर्में

परमेश्वराला अर्पण करीत जातो तेव्हा भौतिक उन्नतीबरोबर च आध्यात्मिक उन्नति होते. हें च भक्तिमार्गाचें वैशिष्टय आहे."

स्वीडनची इरिना सकाळीं च आली होती. आजचें भाषण ऐकून तर ती बेहद्द खूष झाली. तिच्या देशात हि हा च प्रश्न होता, अन् त्याचें उत्तर तिला आज मिळालें होतें. आनंदाच्या भरात तिनें माझा व निर्मलाचा हात पकडून आम्हाला ती शेजारच्या तलावावर घेऊन गेली तलावाच्या पाण्यात अस्ताला जाणाऱ्या सूर्याचें प्रतिबिंब पडलें होतें. जणू तें म्हणत होतें, 'जगाच्या एका कोपऱ्यात तुमची आणखी एक बहीण आहे. तिचा रंग पाहून जग तिला आपल्याजवळ फिरकू देखील देत नाहीं. तिचा हात हातीं घ्याल कीं नाहीं?'

भयाच्या काळोखात बुडून गेलेल्या जगातून कुणी हि मुसाफिर इथें आला कीं त्याला एखादा तरी दीप गवसतो च. शेजारच्या सिंधापूर गावचे लोक बाबांना येऊन म्हणू लागले, "आमचें गाव ग्रामदानात देण्याची आमची फार इच्छा आहे. आम्ही सलोख्यानें राहू, बंधुभावानें एकत्र नांदू, सारे मिळून विहिरी बांधू, उत्पादन वाढवू, शाळा सुरु करू"

इंग्लंडहून आलेल्या समाजवादी तरुणानें तें पाहिलें आणि 'हीं छोटीं छोटीं गावें जगाचें नेतृत्व करतील' हे बाबांचे शब्द ऐकले तरी हि त्यानें इतर परदेशी पाहुण्याप्रमाणें प्रश्न विचारला च, "युद्धें कधीं नाहींशीं होतील?" बाबा मागून म्हणाले, "जमिनीचें वाटप करायला निघालेल्या माणसाला हीं बाहेरचीं माणसें हा च प्रश्न का विचारतात? ह्याचें कारण असें आहे कीं, आमचा मार्ग प्रेम आणि शांतीचा आहे. ह्या मार्गाला जर यश मिळालें तर त्याचा परिणाम साऱ्या जगावर होईल आणि विश्वशांतीचा मार्ग सुस्पष्ट होईल.

"मूलभूत जीवन परिवर्तनाचें कार्य केवळ बाह्य विचारानें होणार नाहीं त्याकरता तत्त्वज्ञानानें अधिष्ठान हवें. देहातील निरनिराळे अवयव एकमेकावर प्रेम करतात, परस्परांच्या सुखदु:खात सहभागी होतात, कारण त्यात एक चेतनाची अनुभूति आहे. त्या च प्रमाणें मानवसमाजात देखील एकात्मतेचा, एकचेतनेचा अनुभव यायला पाहिजे मग आम्हाला सापाचि यानाची भीति वाटणार नाहीं व त्याना हि आमची भीति वाटणार नाहीं. गरिबांच्या पोटाची भूक आम्हाला लागेल आणि दु:खिताच्या दु:खानें

आम्ही द्रवित होऊं. आमच्या बालकांना, तरुणांना, असें आत्म्याच्या व्यापकतेचें दर्शन व्हावें अशी माझी तीव्र इच्छा आहे."

सुजनपूरला दाट आंब्यांच्या झाडींत दहा दहा मैलांवरून आलेले खेडूत शांतपणें ऐकत होते. आजवर त्यांच्याकडे असें कुणी आलें नव्हतें; जे आले होते ते सारे 'घेणारे' होते. कुणीं त्यांना मतें मागितलीं होतीं, कुणी फंड. आज हा 'देणारा' आला होता. ब्रह्मविद्येचा धबधबा त्यांच्या मुखावाटे पडत होता. ते तहानेले होते, घटाघटा पीत होते, तृप्त होत होते, पावन होत होते, धन्य होत होते !

झोंपण्याची वेळ होऊन गेली. 'कुसुमअप्पा, चला, झोंपा ना आतां !' एका ओडिया अप्पा(ताई)ची प्रेमळ आज्ञा ऐकूं आली. मीं कागद आवरले. जवळ झोंपलेल्या हरिनाच्या अंगावर पांघरूण घालून कदील विझवला. त्या अंधारांत बाबांचें वाक्य कानांत घोळत होतें : "मैं चाहता हू कि हमारे बच्चों को, नौजवानों को आत्मा की व्यापकता का दर्शन हो जाय।"



## : ३१ :

## आधुनिक तीर्थक्षेत्र

रामचंद्रपूर
२२ फेब्रुवारी '५५

बाबूंचें दाट वन, आंब्यांचीं हिरवीं गुबगुबीत झाडें, वड-पिंपळांचे ऋषितुल्य वृक्ष, सस्यश्यामला सृष्टि या सर्वांचा आस्वाद घेत बरी-रामचंद्रपूरला पोहोंचलों. हें गाव गोपबाबू व रमादेवींचें तपस्यास्थान आहे. इथें आश्रम, कस्तुरबा केंद्र, प्रसूतिगृह आणि नई तालीमचें केंद्र आहे. हें अहिंसक क्रांतीचें 'पॉवर हाऊस'च आहे. इथून च साऱ्या उत्कलला वीज मिळते. प्रथम बरीच्या कस्तुरबा केंद्राच्या दवाखान्यात बाबांचें स्वागत झालें. आज माता कस्तुरबांची पुण्यतिथि होती. शिवरात्रीच्या दिवशीं तुरुंगांत देहत्याग केलेल्या या वीरमातेच्या स्मरणानें सुपुत्राचे डोळे पाणावले. त्यानें आसवांनीं

भिजलेल्या शब्दफुलाची ओंजळ मातेच्या चरणावर ठेवली. "ज्यानीं आयुष्याचे सारे क्षण धर्मकार्याकरिता वेचले त्याचा मृत्युदिन म्हणजे च ईश्वर मीलना चा दिन, अतिशय पवित्र दिन, मानला जातो."

ब्राह्मणी नदीच्या काठावर वसलेल्या रामचद्रपूरच्या आश्रमात प्रवेश करता च शुभ्र खादी परिधान केलेले स्त्री-पुरुष, मुलें बाळे दिसू लागलीं.

आरती, शखनाद, सूत्राजली, स्वागतात कुठली हि कमतरता नव्हती. आंब्रे, पेरू, काजू, चिक्कू, नारळ, खजूर इ० मोसमी फळानीं लदबदलेल्या झाडाशीं हितगुज करीत आश्रमाच्या सुदर, स्वच्छ सारवलेल्या झोंपड्या उभ्या होत्या. ठिकठिकाणीं सुदर रागोळी होती. या साऱ्यावर तर मन मुग्ध होतें च, पण त्या हि पेक्षा आश्रमाच्या या मनमिळाऊ भगिनींवर मन अधिक मुग्ध झालें. त्याच्या सहज प्रेमाच्या प्रवाहात जणू आम्ही दिवसभर डुबत होतों त्याच्यापैकीं इदिरा आमच्याबरोबर यात्रेंत राहिली होती. तिचा खेळकर स्वभाव, हेमप्रभाचा कामसूपणा, सरोजचा मायाळूपणा ह्यानें आमच्यामध्यें कौटुबिक वातावरण निर्माण झाले होतें. बोऊ ( रमादेवी ) वर या साऱ्या मुलींचा भारी जीव दिसतो, व चुनीअप्पा ( अन्नपूर्णादेवी ) बद्दल त्याना फार अभिमान वाटतो. इदिरा, सरोज साऱ्या स्वागतसमारभाकरिता पूर्वी च इथें पोहोंचल्या होत्या. हिरव्या रगाच्या बारीक काठाच्या पाढऱ्या साड्या नेसलेल्या आमच्या आश्रमाच्या भगिनी चपलतेनें कामें आटोपीत होत्या. आम्हाला तर त्यानीं सुट्टी च घ्यायला भाग पाडलें. 'एक दिवस आमच्याबरोबर घालवा. कुणास ठाऊक, पुन केव्हा भेट!' इला म्हणत होती मग झाडावर चढून कैऱ्या खाव्या, दगड मारून रानबोरें वेंचावीं, तहान लागली कीं शहाळ्याचें पाणी प्यावें आणि आश्रमवऱ्याशीं गप्पा कराव्या, हा कार्यक्रम दिवसभर चाल्ला होता. त्यानीं मायेनें केलेले व प्रेमानें वाढलेले पदार्थ खाताना वाटलें, देवानीं आपल्याला उट बनवले असते तर किती बरें झाले असतें!

सायकाळच्या प्रवचनात बाबानीं सागितलें, " इथे सेवाकार्य चालू आहे, म्हणून हें एक तीर्थस्थान च झालें आहे. ' नई तालीमच्या शिक्षकाना ते

म्हणाले, "तुम्हाला समाजात नवीन मूल्याची स्थापना करायची आहे, समाजातील दुधाचें दहीं करायचें आहे." येथील शिक्षक आणि विद्यार्थी भूदानकार्याला बराच वेळ देतात. त्यापैकीं काहीं तर पूर्ण वेळ देत आहेत

सूर्यास्त होऊन गेला होता. ब्राह्मणीच्या जलप्रवाहावर रजनीची काळी छाया दिसू लागली. आश्रमकन्या 'गीता प्रवचना'वर बाबांच्या सह्या घेत होत्या. बाबा त्याना म्हणाले, "आता मूर्तिपूजेचा काळ राहिला नाहीं या काळात निरहकार सेवा, भक्तिमय जीवन आणि ज्ञानपिपासा असेल तर त्यानें च तुमचें उत्थान होईल. सर्वत्र देवाचें च दर्शन करायला शिका समोर क्रोधी असो वा कुणी निष्ठुर असो, त्याच्यामध्यें हि देव पाहायला शिका "

## : ३२ :

## पांवा नाहीं तर सुदर्शनचक्र

सैयदपूर, प्रीतिपूर, राधारमणपूर
२३ २५ फेब्रुवारी '५५

'भूमिविप्लव (भूमिक्राति) सफल हो!' प्राथमिक शाळांतील कोंवळीं मुलें कोमल आवाजात जयघोष करीत होतीं सारीं आपआपल्या शाळा समोर शिस्तीनें उभीं होतीं त्यातील काहीं मुलें मुसलमान आहेत हें त्याच्या हातातील उर्दू फलकावरून कळत होतें सा याचा उद्घोष एक च होता आजवर भूमिदानयज्ञाचा जयघोष होत होता. पण आज सय्यदपूर मध्यें भूमिक्रातीच्या जयघोषाला सुरवात झाली एकेक पाऊल पुढें पडत आहे आज सय्यदपूर, उद्या सारा उत्कल नी परवा समस्त भारत हा च उद्घोष करील "भूमिक्राति सफल हो!" लक्षावधि मुखातून एका च वेळीं निघालेला एकात्मभावाचा निनाद सर्वत्र दुमदुमू लागेल, जग जागें होईल, डोळे चोळत चोळत दृष्टिक्षेप टाकील, सा या भारतात कुणी 'भूपति' उरलेला त्याना दिसणार नाहीं, सारे च 'भूमिपुत्र' आढळतील अन् मग सारें विश्व भारताला साथ देत म्हणू लागेल, 'भूमिक्राति सफल हो!'

प्रीतिपूरला पोहोंचून शाळेंत मिळालेल्या एका खोलींत सामान लावत होतें तों च मोठया लाल लाल फुलाचा झगा घातलेल्या एका पाश्चिमात्य वृद्ध स्त्रीला घेऊन महादेवीबाई आमच्या खोलींत येताना दिसल्या. त्या बाई मिसेस चेस्टर बोल्स होत्या. "मिस्टर चेस्टर बोल्स याना एकाकी ब्रह्मदेशाच्या पतप्रधानानीं बोलाविल्यामुळे मला एकटीला च याव लागल. त्याची इथं येण्याची व एक दिवस विनोबाबरोबर घालविण्याची फार इच्छा होती. विनोबाच्या अभिनव प्रयोगाबद्दल आम्ही बरेच दिवसापासून ऐकत होतों. पण आज प्रत्यक्ष पाहण्याचा योग जुळून आला." असें त्या सागत होत्या. भारतातील अमेरिकेच्या भूतपूर्व परराष्ट्रीय वकिलाची ही पत्नी अगदीं आमच्यामध्यें मिसळून गेली. माझ्याजवळ जमिनीवर च आपला बिछाना पसरवीत त्या म्हणू लागल्या, "आज माझी'अनेक दिवसाची इच्छा पूर्ण होत आहे."

त्यानीं जेवणात मिळालेला वरण भात आवडीनें खाल्ला. जेवणानतर त्या वामकुक्षी करतील असें वाटलें. म्हणून मीं म्हटलें, "तुम्ही जरा पडा." तर चटकन् रुमालानें कपाळावरचा घाम पुसत त्या म्हणाल्या, "छे! छे! मला तर हे गाव पाहायचय्." मग भर दुपारीं धुळीनें माखलेल्या रस्त्यावर त्या मोठ्या मौजेनें चालूं लागल्या. हरिना बरोबर होती च. त्या दोघींचें उत्साहानें फोटो घेणें सुरू होतें. प्रत्येक घरातून स्त्रीपुरुष बाहेर येत, कुतूहलानें बघत आणि अगत्यानें घरात बोलावीत. "अरे वा! त्या आपल्याला घरात बोलावतात वाटत!" (Oh! do they invite us?) बोल्सबाईंना भलतें च आश्चर्य वाटत होतें. हरिना त्याना आपले अनुभव सागू लागली. "अहो, ते घरात बोलावतात एवढें च नव्हे तर प्रेमानें, आग्रहानें खाऊ-पिऊ देखील घालतात."

. रोड्यातली नागडी उघडीं पोरें इकडून तिकडे धावत होतीं, मातीच्या झोपड्या, गुराढोराचे गोठे, तादूळ भरलेल्या कणग्या, भिंतीवर थापलेल्या गोवऱ्या, सोन्याचादीचे दागिन्यानीं मढून लाजत दाराआड उभ्या राहणाऱ्या सुना, दारासमोर तुटक्या खाटेवर नातवंडाना खेळवणाऱ्या आजीबाई– एकेक गोष्ट त्या न्याहाळून पाहत होत्या व जिज्ञासेनें विचारीत होत्या. हें सारें जीवन त्याना कितीतरी अनोळखी, अपरिचित वाटत होतें. त्याचें जग किती वेगळें

होतें. डौलानें सजलेले मजल्यावर मजले, भरधाव धावणाऱ्या मोटारी, धावपळीचें जीवन, कधीं कधीं त्याचा अगदीं कटाळा येतो व अशा शांत जागीं जाऊन रहावेंसें वाटतें असें त्या म्हणत होत्या.

अलीकडे बाबाची तब्येत चांगली नाहीं तरी हि ते रोज पहाटे अडीच वाजता उठतात, दहा बारा मैल चालतात, नेहमींप्रमाणें दिवसभर सारीं कामें करतात. हें ऐकून बोल्सबाईंना आश्चर्याचा धक्का च बसला ! बाबांनीं बिछान्यावर पडल्या पडल्या च त्यांचेशीं चर्चा केली. "विश्वशांतीचीं लक्षणें तुम्हाला दिसतात का ?" ह्या त्यांच्या प्रश्नावर बाबा म्हणाले, "दिसतात तर ! *आजकाल लोक* 'One World' *'ची भाषा बोलतात आणि तिकडे* विज्ञानाची देखील इतकी प्रगति झाली आहे कीं भविष्यकाळात त्याच्या प्रयोगानें मानवसमाजाचा एक तर संहार होईल नाहीं तर मानवाला अक्कल येईल, त्याची बुद्धि प्रकट होईल व मग ज्या हातानीं हीं संहारशस्त्रें निर्माण केलीं त्या च हातानीं त्या शस्त्राचा नायनाट होईल. आज मानवासमोर दोन च मार्ग आहेत." मग नेहमींच्या मिस्किल स्वभावानुसार हसत हसत ते म्हणाले, "अन् मग जें वायरलेला साध्य झालें नाहीं तें विज्ञान करून दाखवील. दर रविवारीं चर्चमध्यें ज्या तत्त्वाचें प्रतिपादन करायचे त्या च तत्त्वांना उरलेल्या सहा दिवसात विसरण्याचा कार्यक्रम चालू आहे ना सध्या ?" बोल्सबाईंना हसता हसता पुरेवाट झाली. सध्याकाळच्या शांत जमावासमोर बाबांनीं आज हा च विषय हाताळला. ते म्हणाले, "जगात एक तर भगवान् श्रीकृष्णाचा पावा चालेल नाहीं तर त्याचें सुदर्शन चक्र चालेल."

दुपारच्या कार्यकर्त्यांच्या बैठकींत एकेक उत्साही व्यक्ति उठून उभी राहत होती व क्रांतिकार्याला संपूर्ण वेळ देण्याचा संकल्प करीत होती. भेटीला आलेल्या प्रत्येक इसमानें बाबांना दानपत्र अर्पण केलें. बोल्सबाई त्या दृश्यानें चांगल्या च प्रभावित झाल्या.

रात्रीं झोंपण्यापूर्वीं तासभर बाबाचें ओडियाचें अध्ययन चालू असतें. त्या वेळीं बोल्सबाई कितीतरी वेळ बाबांच्या खोलींत बसून त्यांना न्याहाळीत होत्या अन् मग मला येऊन म्हणाल्या, "Indeed he is a lord of energy' (खरं च, हे उत्साहाचे सम्राट् आहेत.)

राधारमणपूरच्या सभेत जमिनीचें वाटप झालें. जणु दरिद्रनारायणाचा पूजेचा सोहळा चालू होता. सतप्त दरिद्रनारायणाला शांत करण्याकरता भूमीचा अभिषेक होत होता. अहिंसेची प्रतिष्ठापना कृतिद्वारें करण्याचा समारंभ होता तो. प्रत्येक कुटुंबातील एकेक व्यक्ति सामोरी येई अन् तिला मंगल टिळा लावून, सुताचा हार घालून जमिनीचे प्रमाणपत्र दिलें जाई. कालपर्यंत ज्याच्याजवळ हवा, पाणी, आकाश व सूर्यप्रकाशाखेरीज कांहीं हि नव्हतें त्याला आज त्याचा भूमीचा अधिकार प्राप्त होत होता. सस्मित मुद्रेनें तो जेव्हा घोळक्यातून उठून सामोरा येई तेव्हा जणू तो मूकपणें म्हणे, 'पहा ! अजून माणूस मुर्दाड झाला नाहीं, काळीज गमावून बसला नाहीं. तो हि द्रवू शकतो, पाझरू शकतो. ही भरतभूमि आहे. अनेक ऋषिमुनींच्या, संतसत्पुरुषांच्या तपस्येनें पावन झालेल्या या भूमींतील कणाकणात पुण्यसंचय झाला आहे. इथे सारे 'भूमिपुत्र'च राहतील, 'भूपति' कसे टिकतील !' आणि हे पावन दृश्य पाहणारे ते असंख्य खेडूत! ते आता आपआपल्या घरीं परत जातील. कुणी आपल्या वृद्ध पित्याला, कुणी आपल्या अपंग मातुश्रीला, कुणी आपल्या रुग्णशय्येवरील पत्नीला, मोठ्या अभिमानानें ह्या घटनेचा वृत्तान्त सांगेल नी म्हणेल, "आता जमाना बदलला आहे रे का ! गांधीबाबानें जें वचन दिलें होतें ना, तें पूर्ण करायला त्याचा चेला आलाय बघा तो म्हणतो, शेजाऱ्यावर प्रेम करा, आधीं दुसऱ्याला द्या नी मग तुम्ही खा, म्हणजे तुमचें भोजन व भजन दोन्ही साधतील. अंग मोडून मेहनत करा, परिश्रम करा. श्रमाविना जीवन चोरीचें होईल."



## : ३३ :

# क्रांतीचें साक्षात् दर्शन

मानपूर
२६ फेब्रुवारी '५५

ज्याचे नाव ऐकता च भयानें लोकाच्या हृदयाचा थरकाप होई व चेहरा काळवडून जाई तो च 'चंड अशोक' जनतेचा हृदय सम्राट् झाला. ज्याच्या पराक्रमानें अशोकाच्या हृत्क्षेत्रात क्रांति झाली, त्या च कलिंग वीराचे वंशज आज पूर्वजांची उज्वल परंपरा कायम राखीत आहेत आता एक सम्राटाच्या च नव्हे तर प्रत्येक मानवहृदयातील स्वामित्वभावनेला तिलांजलि देण्याचें काम चालू होतें उत्तर प्रदेशात मंगरोठ या गावानें स्वामित्व विसर्जन करून भारतात भूमिक्रांतीचा श्रीगणेशा केला, तर मानपूरनें उत्कलमध्यें. आजवर ग्रामदानात मिळालेल्या खेड्यात बाबा कधीं गेले नव्हते तो मान मानपूरनें च पटकावला. तेथील सर्व भूमिपुत्राचें दर्शन करण्या करता बाबा आज तिथे जात होते.

चारी बाजूची सृष्टि धुक्याच्या पांघरुणात लपली होती. समुद्र जवळ असल्यामुळे वैतरणीचा प्रवाह देखील सागरासारखा विशाल बनला होता. जहाज कुठल्या दिशेनें जात आहे ते कळत च नव्हते. भूमिक्रांतीच्या जय जयकारानें आसमंत निनादू लागलें. तो आवाज ऐकता च कळलें कीं मानपूर जवळ आलें आहे. मानपुरवाले टाळ मृदंग घेऊन हर्षोत्कटतेने नाचू लागले. त्याचा आनंद हृदयात मावत नव्हता, तो त्याच्या चेहऱ्यावर ओसंडत होता. त्याचे डोळे नव्या चैतन्यानें, नव्या जाणिवेनें, चकाकू लागले. उत्साह मूर्तिमंत होऊन त्या खेड्यात अवतरला होता. खेडें आरशासारखें स्वच्छ होतें नी गावकऱ्याच्या हृदयासारखें निर्मळ.

"तुम्हीं एक महान् धर्मकार्य केलें आहे. तुमचें कल्याण होईल." बाबांनीं त्या वीरांना आशीर्वाद दिला. विजेचा संचार झाल्यागत सारे दिवसभर इकडून तिकडे धावत होते, पळत होते, पाहुण्याची व्यवस्था करीत होते. उत्कलचे मुख्य मंत्री हि मानपुरवाल्याचें कौतुक करायला आज च इथें

आले होते. आजचें साधें जेवण केवढें रुचकर वाटत होतें. जणू गावकऱ्याच्या मधुर कार्याची मधुरता त्यात उतरली होती.

विनोबाचा सदेश घेऊन काहीं सेवक मानपुरला गेले नी त्याचा सदेश सागितला, "भूमि आपली माता आहे, आपण सारीं तिचीं लेकरें आहोंत; भूमिमालक म्हणवून घेणें हा अधर्म आहे भूमिपति ईश्वर आहे. सारी, जमीन गावाची करून गावाचें कुटुब करा, सारे भाऊ भाऊ व्हा." गावकरी विचार करू लागले. म्हणणें पटत होतें, पण तें सारें अमलात आणण्याकरता काहीं अडचणी समोर होत्या. मनोभूमीमध्यें विचारबीज पेरलें गेलें. भूदानाचे कार्यकर्ते आपल्या सेवेचें पाणी घालीत होते; मग रोपटें उगवल्यावाचून कसें राहील ?

गावकऱ्यानीं ग्रामदान देण्याचे कबूल केलें. साऱ्या उत्कलमध्यें विद्युद्वेगानें ही बातमी पसरली. मानपूरचे नाव वर्तमानपत्रात झळकलें, वकिलाच्या बार रूममध्यें, क्लबमध्यें, ज्याच्या त्याच्या तोंडीं 'मानपूर'चें नाव झालें. गेल्या वैशाखीला तेथील जमिनीचें पुनर्वितरण झालें. आता मानपुरात जमिनीचा मालक कोणी उरला नाहीं. जमीन सारी देवाची झाली होती. सोयीकरता, व्यवस्थेकरता, प्रत्येक कुटुबातील सख्येप्रमाणें जमीन दिली गेली. गावात एक 'सर्वोदय-मडळ' हि स्थापन झालें. हें मडळ गावचा कारभार करतें. गावात चरखा पोहोंचला होता, त्या च बरोबर क्रातीचीं इतर अवजारें हि पोहोंचलीं होतीं.

दुपारीं सारे गाववाले बाबाना भेटायला आले. ज्याचें नाव ऐकून त्यानीं महान् कार्य केले होतें त्याला सारे डोळे भरून पाहत होते, कृतकृत्य होत होते. पण तो तर नाम, रूप मिथ्या मानून केवळ परमेश्वराला च सत्य माना, असें सागत होता. प्रेमाचें हितगुज चालू झालें. गावकऱ्यानीं आपल्या कामाची माहिती देत सागितलें, "दर पौर्णिमेला व अमावास्येला सर्वोदय-मडळाची बैठक होते." बाबानीं विनोद केला, "पौर्णिमा तर ठीक आहे, पण अमावास्येच्या दिवशीं बुद्धीमध्यें अधार तर नाहीं राहत ना ?" गावच्या निष्ठावान् सेवकानें – शिवचरणभाईनीं – लागली च उत्तर दिलें, "जगाच्या दृष्टीनें अमावास्येला अधार व पौर्णिमेला प्रकाश असतो पण आम्ही तर देवाचें नाव घेऊन कामाला लागलों आहोंत, म्हणून आम्हाला

दोन्ही दिवशीं भरपूर प्रकाश मिळतो." हें उत्तर ऐकून बाबा खूप झाले व म्हणाले, "तसें पाहिलें तर परमेश्वराचे सारे च दिवस चागले असतात. पण हे दोन दिवस विशेष चागले आहेत. भक्त जेव्हा परमेश्वरापासून अलग होऊन जगात काम करतो तेव्हा चद्राप्रमाणें त्याचा प्रकाश मिळतो व तो जेव्हा परमेश्वरामध्यें विलीन होऊन जातो तेव्हा अमावास्येच्या रात्रीप्रमाणें आकाशात अगणित तारे दिसू लागतात"

बाबानीं दुसरा प्रश्न केला, "गावात काहीं दुःख तर नाहीं ना?" शिवचरणभाई बोलू लागले, "जें काहीं दुःख होतें तें आता राहिलें नाहीं. भूदान समितीनें पुष्कळ च मदत केली. मानपुरचें नाव साऱ्या हिंदुस्थानात प्रसिद्ध झालें आहे ह्याची आम्हाला जाणीव आहे. आमच्यावरील जबाबदारीची आम्हाला जाणीव आहे. आता आम्हीं ह्या कामाचा झेंडा उचलला आहे. जिथें जाऊ तिथें ह्या कामाचा प्रचार करू. मात्र कधीं कधीं मनात अशी अभद्र शका येते कीं कुणी येऊन आम्हाला कुबुद्धि देईल, आमची मति फिरेल, तर सारें आजवर केलेले काम बिघडून जाईल. पण अशा वेळीं आम्ही तुमचें स्मरण करतों. तें स्मरण आम्हाला बळ देतें"

शिवचरणभाईचा गळा दाटून आला. अगावरच्या उपरण्यानें डोळे पुसत पुसत ते पुढे बोलू लागले, "आम्ही आमची उत्तरोत्तर प्रगति करीत जाऊ"

विशाल आकाशाखालीं मावळत्या सूर्याच्या साक्षीनें साऱ्यानीं भक्तिभावानें प्रार्थना केली. विनोबा म्हणत होते, "खेड्याच्या विकासाचें माझें जें स्वप्न आहे तें मानपूरमध्यें साकारेल अशी मला आशा वाटते."

सूर्य अस्ताला गेला व घराघरात इवलाले दीप स्निग्धपणें प्रकाशू लागले. आम्ही प्रत्येक घरात जाऊन गृहिणींशीं चार प्रेमाचे शब्द बोलत होतों. निळ्या आकाशात असंख्य तारका चमकत होत्या – जणू दिवाळी साजरी होत होती इकडे धरातलावर प्रत्येक हृदयात विचारदीप तेवत होता. प्रत्येक गृहलक्ष्मीच्या चेहऱ्यावर सुख, शाति नी समाधान विलसत होतें. घेणारे आणि देणारे सारे एकरस झाले होते. त्याच्यामध्यें सहकार निर्माण झाला होता. व्यक्ति आणि समाज हा भेद उरला नव्हता. स्वार्थ आणि परार्थ यामध्यें विरोध राहिला नव्हता आज मानपूरमध्यें एक ज्योत पेटविली

गेली. अशीं असख्य खेडीं या जाणिवेनें एकत्र येतील. चिमुकल्या ज्योतीचा प्रचड वणवा बनेल नी त्यात सर्व मानवताविरोधी जुनीं मूल्ये, जुन्या रूढी, जुन्या जाणिवा भस्म होऊन जातील. नव्या जाणिवेनें, नव्या उमेदीनें, नव्या स्वाभिमानाने उत्स्फूर्त होऊन गोरगरीब, शेतकरी, भूमिहीन उठून उभे राहतील. त्या प्रचड एकतेसमोर आजवर झालेला अन्याय विनम्र होईल. मानना मानवात नवें माणुसकीचें नातें उदयास येईल. सर्वांचा उदय होईल.

कुठल्याशा कामाकरता निर्मला कटक भुवनेश्वरला जाऊन आज परत आली होती. तिथें तिनें पाहिलेल्या धौळीगिरीचें ती वर्णन करीत होती. " धौळीगिरी म्हणजे ती च जागा बर का, जिथें अशोकाचें हृदयपरिवर्तन झालें. आज तिथें हत्तीची भव्य मूर्ति, शिलालेखाच्या रूपानें व थोडे भग्नावशेष च शिल्लक आहेत. तो शिलालेख आहे ना, त्या च जागीं अशोक उभा होता. समोरच्या विस्तीर्ण मैदानात प्रेताचा ढीग पडला होता." तिच्या शब्दानीं इतिहासाचीं पानें भर्र उडून गेलीं. मला समोर तें विशाल मैदान दिसू लागलें. त्यात शेंकडों कलिंगवीराचीं प्राणहीन शरीरें दिसू लागलीं. विजयी सम्राट् दिमाखानें सारें पाहत होता. कलिंगदेशावर त्यानें विजय मिळवला होता. पण कशाकरता ? सम्राट् पुढें सरकला. त्याचा पाय रक्ताच्या थारोळ्यात बुडला. ' हाय ! पाणी ' कुणीतरी कण्हत होतें. सम्राट् दचकला ! तें प्रेत नव्हतें. हात पाय तुटलेलें धड होतें तें ! मात्र त्या डोळ्यातून भयस्र भावज्वाला निघत होत्या. सम्राटाचें अग शहारलें. त्याच्या अगावर काटा उभा राहिला. त्याला हें दृश्य नवें नव्हतें. तरी हि तो बेचैन झाला, तळमळू लागला, अस्वस्थ झाला. ' अशोक ! कशाकरता एवढा सहार केलास तू ? ' आतून कुणीतरी विचारू लागलें. ' विजय मिळविण्याकरता. ' ' विजय ? कुणावर विजय ? प्रेतावर ? ' आत कुणीतरी भयानक उपहासानें हसू लागलें. अशोकाचे दोन्ही हात कानावर गेले.

माझें मन तिथल्या तिथें वेगानें फिरूं लागलें. निर्मलची बडबड चालू च होती. " त्या च जागीं अशोक उभा होता. " होय ! ती च ती जागा ! तिथें च चक्रवर्ति सम्राट् ' योगिनाम् चक्रवर्ती 'च्या चरणाचा दास झाला. दानशासरना भासणारा ' चड अशोक ' ' देवानाम् प्रिय ' बनला !

## : ३४ :

# कमळ आणि भुंगा

राजकनिका, औल
२७, २८ फेब्रुवारी '५५

ब्राह्ममुहूर्तावर मानपुरवासीयांचा निरोप घेतला. पुनः वैतरिणी पार करून राजकनिकाला जाण्याकरतां जहाजांत चढलों. तिमिराला दूर सारून सूर्यनारायण आकाशाच्या अंगणांत प्रवेश करीत होता, विविध रंगांचा खेळ खेळत होता. चांदी वितळावी तसें वैतरणीचें पाणी चमचमत होतें. गार वाऱ्याला साथ देत मालतीदेवी गाऊं लागल्या :

आमी तोमार यात्री दले रबो पीछे ।
स्थान दियो हे आमाय तुमी सबार नीचे ।।
...तोमार चरन धुलाय धुलाय धूसर हबे ।।

[ तुझ्या यात्रीदलात मी सर्वांत मागें राहीन. तूं मला सर्वांत खालचें स्थान दिलें आहेस. मी तुझ्या चरणधूळीनें माखला जाऊन माझ्यावर तो च रंग चढेल. ]

मधें च चाँदीबाला घाट आला. तिथें लोकांची गर्दी उसळली होती. ती पाहून बाबा तिथें खालीं उतरले व त्यांनीं छोट्याशा भाषणात जीवनाचा एक महान् सिद्धान्त सांगितला : " जगत् ही एक महान् नदी आहे आणि काल अनंत आहे. आपल्याला या जगांत चार दिवस च राहायचें आहे. म्हणून मोह सोडा, प्रेमानें नादा."

राजकनिकाला दुपारीं कार्यकर्त्यांसमोर ' सौम्य सत्याग्रह 'चें विवेचन करतांना बाबा म्हणाले, " सध्याकाळ होतां च कमळाच्या पाकळ्या हळू हळू मिटूं लागतात. मग मिटलेल्या पाकळ्यांत भ्रमर बंदिस्त होतो. एवढ्या नाजुक कमळाच्या पाकळ्या ! पण त्या देखील भ्रमराला कैद करतात. "

राजकनिका व औल पूर्वीं संस्थानें होतीं. औलच्या राणीसाहेब विधान-सभेच्या सभासद आहेत. उत्कलमध्यें संस्थानें बरीं च होतीं त्यांतील कित्येक

राजांनीं व जमीनदारांनीं मिळून ' गणतत्र परिषद ' नावाचा एक राजकीय पक्ष स्थापन केला व त्याच्या तर्फे निवडणुका लढविल्या. तेथील जनता मागासलेली होती. म्हणून राजाराणी स्वतः घरोघर हिंडून मतें मागू लागलीं. तेव्हा लोकांनीं त्यांच्या बाजूनें साहजिक च मतें दिलीं. आज उत्कल विधान सभेंत ' गणतत्र-परिषदे 'च्या सभासदांची सख्या भरपूर आहे. तो च येथील प्रमुख सरकारविरोधी पक्ष आहे.



## : ३५ :

## देवाचा पोस्टमन

पट्टामुडई, बोधगाँव
१, २ मार्च '५५

कटक जिल्ह्यात नद्या फार. त्यामुळें प्रत्येक वेळीं नावेनें नदीचें पात्र पार करायचें व मग पुनः १०-१२ मैल चालायचें असें चाललें आहे. या भागात दरवर्षी पावसाळ्यात कुठें ना कुठे पुराचा प्रकोप होतो च. आज आम्हीं जहाजानें ब्राह्मणी नदी पार केली. धुक्याआड सारी सृष्टि लपली होती. अलीकडे वाट चालताना मधें च एखादें एकान्त स्थान पाहून अध्ययनाला बसण्याचा कार्यक्रम बाबांनीं सुरू केला आहे. हल्लीं ओडिया भजनांचें अध्ययन चालू आहे. आजचें अध्ययन-स्थान फार च रमणीय होतें. चारी बाजूला घनदाट जगल व समोर च ब्राह्मणीचा विशाल प्रवाह. आजचें गाव देखील रम्य होतें. दाट बाबूचें बन, पळसाचीं लालभडक फुलें झाडावर डौलानें डुलत होतीं. गावातून च ब्राह्मणीच्या पाण्याचे पाट काढले आहेत. ब्राह्मणीच्या रसानें गुबगुबीत व प्रफुल्लित झालेलीं चाफा सदाफुली, अशोक, केळी, आंबे, ताड, नारळ, कर्दळी इ० तन्हेतन्हेचीं झाडें होतीं. त्यामुळें साऱ्या गावाला अपूर्व शोभा आली होती. महाराष्ट्राचे एक लेखक व फिल्म डायरेक्टर मागें एकदा बिहारच्या यात्रेंत काहीं दिवस राहिले होते. रोजचें निसर्गाचें नयनमनोहर रूप पाहून त्यांचें कविहृदय मुग्ध होऊन तें

म्हणायचे, ' बस् ! इथें तर सदा सर्वदा कविता लिहाव्या नाहीं तर फिल्मचें शूटिंग करावें असें च वाटते ! ' आज गणतंत्र पक्षाचे काहीं प्रतिनिधी बाबांना भेटले. त्यापैकीं एक गृहस्थ जरा आवेशात येऊन बोलत होते, " शेवटीं, तुम्ही हि मनुष्य च आहात. देव नाहीं. अशा तऱ्हेचे पन्नास विनोबा असले तर च हिंदुस्थानात काम होईल. गांधीजींनीं साऱ्या आयुष्यभर जातिभेदावर प्रहार केला. पण शेवटीं जातिवादानें च त्याचा अंत झाला. आता तुम्ही आणखी जास्त काय कराल ? " असें म्हणून ते काँग्रेसला व सरकारला लाखोली वाहू लागले.

बाबा खुदून मौजेनें बोलू लागले, " अहो, तुम्हाला माहित आहे ना ? प्रभु रामचंद्रांचें काम कुणीं केलें ? वानरसेनेनें च केलें. आणि असें पहा, दुसरे कुणी मदत करोत वा न करोत तुम्ही मात्र मला मदत कराल ना ? " बाबांच्या शांतीचा त्यांच्या मनावर काय परिणाम झाला कुणास ठाऊक ! सारे च चटकन् नम्र आवाजात म्हणू लागले, " हो, हो अवश्य मदत करू."

उत्तर प्रदेशचे एक सेवक कार्यकर्ते काहीं दिवस यात्रेंत राहून आज परत जाणार होते. ते गीताप्रवचनाच्या एक कोटी प्रति विकण्याचा संकल्प करण्याचा विचार करीत होते

" प्रत्येक घरात ' गीता-प्रवचना 'ची एक प्रत जायला हवी " असें बाबा नेहमीं म्हणत असतात.

एका विद्यार्थ्याच्या प्रश्नाला उत्तर देताना विनोबा सांगत होते, " अरे ! मी तर विज्ञानाचा उपासक आहें. मोटारीमध्यें एक यंत्र दिशा दाखविणारें असतें व दुसरें गति वाढविणारें असतें. ज्ञान व विज्ञानाचा असा संबंध आहे. विज्ञानात विनाशाची हि शक्ति आहे व विकासाची हि. म्हणून त्याला आत्मज्ञानाची जोड असायला हवी विज्ञान गति कमी जास्त करणाऱ्या यंत्राप्रमाणें आहे. त्या यंत्रात बुद्धि नाहीं, ती मूढ शक्ति आहे. आत्मज्ञान हें दिशादर्शक यंत्र आहे विज्ञानाविना आजच्या जगात काहीं काम होऊं शकणार नाहीं व आत्मज्ञानाविना विज्ञानाला योग्य ती दिशा मिळणार नाहीं."

आज रात्रीं उत्कल सरकारनें तयार केलेली 'भूदान यात्रे'ची फिल्म दाखवली गेली. आम्हीं साऱ्यानीं जवळ जवळ हट्ट च धरला म्हणून बाबा मोठ्या मुश्किलीनें थोड्या वेळाकरिता बाहेर येऊन बसले. पधरा मिनिटाची रील होती. बाबानीं अखेरचीं पाच सात मिनिटें पाहिली. शेवटीं जेव्हा 'समाप्तम्' ची फिल्म आली तेव्हा उठता उठता बाबा हसून म्हणाले, "आपल्याला तर ती 'समाप्तम्' ची फिल्म फार च आवडली बुवा!"

मला बिहारमध्यें बोधगया सर्वोदय संमेलनाच्या वेळच्या एका घटनेची आठवण झाली. रात्रीं नऊ वाजता सास्कृतिक कार्यक्रम ठेवला होता. काहीं लोक बाबाना आमंत्रण द्यायला गेले. त्यानीं हें हि सांगितलें, कार्यक्रम फक्त एक च तासाचा ठेवला आहे. तर बाबा हसत हसत म्हणाले, "तुम्हाला एक तासाच्या सास्कृतिक कार्यक्रमात काय आनंद मिळतो बुवा? माझा तर रोज सहा तास सास्कृतिक कार्यक्रम चालतो. ठीक रात्रीं साडेआठ वाजता सुरू होतो तो पहाटे अडीच वाजेपर्यंत. सर्वांत श्रेष्ठ सास्कृतिक कार्यक्रम म्हणजे झोंप!"

पोटाच्या दुखण्यानें आज रात्रीं बाबाना स्वस्थ झोंप लागली नाहीं. अलीकडे ऊन तापू लागलें आहे. वाटेंतल्या एक तासाच्या अध्ययनामुळें मुक्कामावर पोहोंचायला उशीर होतो, उन्हाचा त्रास होतो. तेव्हा तो अध्ययनाचा तास टाळावा असें आम्ही सारे म्हणत होतों. बाबाचें उत्तर तयार होतें: "सूर्याचीं किरणें आरोग्यदायी असतात." मग त्यानीं एक तेलगू म्हण सांगितली, 'ज्याची हाडें मजबूत असतात तो सूर्याचा ताप सहन करूं शकतो. ज्याना हाडें नसतात, उदा० मासळ्या, त्याना उन्हाचा ताप सहन होत नाहीं.' याचा अर्थ असा की, जे स्नेहानें परिपूर्ण भरले आहेत त्याना 'घर्मा'चा त्रास होत नाहीं, पण जे स्नेहशून्य असतात त्याना घर्म सतावतो."

बोधगयाच्या लोकल बोर्डाचे चेअरमन सच्चिदानंदबाबू यानीं आता राजीनामा देऊन भूदानाला वाहून घेतलें आहे. या भागातील जनतेच्या हृदयात त्यानीं एक मोठें स्थान मिळवलें आहे. बाबाच्या ओडिया भाषेच्या अध्ययनात त्यांना तीन 'गुरु' मदत करीत. बाबा (गोपबाबू), पुरुभाई व सचिनबाबू.

दुपारीं येथील मठाचे अधिकारी आले होते. बाबा त्याना म्हणाले, "मंदिर मठाची जी जमीन आहे ती माझी च आहे." मला एकदम बाबांच्या विचारपोथींतील एका विचारमौक्तिकाचें स्मरण झालें: "वैदिक ऋषि जेव्हां 'मला तांदूळ पाहिजे, मला गहूं पाहिजे, मला मसूर पाहिजे, मला तिळ पाहिजे' असें म्हणतो तेव्हां त्याच्या त्या 'मी'मध्यें त्रिभुवनाचा समावेश झालेला आहे."

आज वैदिक ऋषींचें स्मरण करीत प्रार्थना केली. बाबा बोलत होते· "कालपुरुष आणि धर्मपुरुष दोघांची मागणी एक होते तेव्हां त्या मागणीला कोणी नाकबूल करूं शकत नाहीं, त्या मागणीकडे कुणी दुर्लक्ष करूं शकत नाहीं. म्हणून हे लक्षांत ठेवा कीं, भूमिदान होऊन चुकलें आहे. तुम्हांला परमेश्वर दानाचा अधिकारी बनवूं पाहतो आहे. म्हणून त्यानें तुमच्याजवळ जमीन व संपत्ति ठेवली आहे. मला तर त्यानें निमित्त केलें आहे व तो च मला फिरवतो आहे. मी त्याचा संदेश तुमच्याकडे पोंहोंचविणारा त्याचा निवळ पोस्टमन आहे. त्याचा संदेशवाहक बनून तुमच्याजवळ आलों आहें."

सभा संपली. एकाग्र चित्तानें श्रवण करणारे ग्रामीण परत् लागले, संध्याराणी चोरट्या पावलानें प्रवेश करीत होती. पक्ष्यांचे थवे घरट्याकडे परतूं लागले. थोड्या वेळानें सारें शांत शांत झालें. त्या निस्तब्ध वातावरणांत दूरच्या मशिदींतून गंभीर वाणी ऐकूं येत होती:

"ला इलाह ईल्लल्लाह महंमदूर् रसूलुल् लाह"

(अल्ला एक च आहे. महमद त्याचा संदेश आणणारा, पैगाम आणणारा त्याचा सेवक मात्र आहे.)



## : ३६ :

# भूदानयज्ञामागचीं दोन तत्त्वें

मधुसागर, ठाकूरपटना
३, ४ मार्च '५५

दुपारीं साडेतीन वाजता च सूर्याला काळ्या ढगानीं झाकून टाकलें. सभेची वेळ होऊ लागली. सोसाट्याचा वारा सुटला उल्हसित करणारी हवा खेळूं लागली. झाडें डोलू लागलीं. बागेंतील फुलें नाचू लागलीं आणि परसातल्या तळ्यात तरंग उठू लागले. पावसामुळें सभा होणार नाहीं असें वाटून लोकानीं विनोबाच्या खोलीच्या दार खिडक्यावर एक च गर्दी केली. सभा न झाली तर निदान दर्शन घ्यावें असा विचार त्यानीं केला असावा. त्याना कुठें माहित होतें कीं, ह्या गंगेचा प्रवाह कधीं थांबत नाहीं. कार्यकर्त्यांना वाटू लागलें, लोक तर जमले, अन् तिकडे पावसाचीं लक्षणें हि दिसतात. शेवटीं सचिवाबूनीं हळूच विचारलें तर बाबा एकदम म्हणाले, " सभा तर निश्चित स्थानावर व निश्चित वेळेवर च होईल. " आणि थोड्या च वेळात डोक्याला फडकें तेवढें गुंडाळून बाबा सेनापतीच्या ताठ्यात बाहेर पडले. जणू ते वरुणाला म्हणत होते, " ये आता, सामना करू पाहू कोण हरतें तें. "

पाऊस कोसळत होता. बाबानीं श्रवणातुराना म्हटलें, " छत्र्या बंद करा. परमेश्वर आपल्यास सहस्र हातानीं प्रेमानें आलिंगन देत आहे. " सारे ताठ उभे होते. जमिनीवर शांतपणें प्रार्थना झाली, भाषण हि झालं. आकाशातून प्रेमवृष्टि होत होती, पृथ्वीतलावर विचारवृष्टि. सारे त्यात न्हाऊन निघत होते. पावसाला न जुमानता सभा घेण्याचा हा उत्कलचा पहिला धडा होता.

आमच्या रोजच्या ओडिया वर्गात फार च मौज येते. ' गुरुजी '-( बुलुभाई ) चा स्वभाव जरा गंभीर च आहे, पण आम्ही विद्यार्थी त्याना खूप हसवतों. ' चिड़ियाँ पेड़पर फुदक रही थी ' या वाक्याचें भाषांतर उत्तर प्रदेशाच्या मोहनभाईनें ' चिडिया माने पेढ़ ऊपरे फुदक छन्ति ' असें

केलें. त्यानीं तें सांगितलें मात्र ! अन् हसून हसून मुरकुंडी वळली आमची. मलबारच्या गोविंदन्भाईंना अनेक भाषा येतात आणि दुसरी भाषा लवकर आत्मसात् करण्याची कुशलता त्याना साधली आहे. पण ओडिया क्लासमध्यें त्याच्या हि भाषांतरात हसवणाऱ्या गोष्टी कांहीं कमी नसतात. भाषांतराकरता वाक्यें देखील गमतीचीं निवडलीं जातात. कधीं मेननभाईंच्या मलबारचा मंत्रिमंडळाचा पराजय झाला तर तें वाक्य आम्ही घेत असू. आज सकाळीं कांहीं कारणामुळें मी जीपमधून पुढच्या पडावावर जात होतें. थोड्या च वेळात जीप जवळच्या काल्व्यांत पसली, तिरपी झाली आणि आम्ही शब्दशः वाचलो. बाबांच्या कानावर ते गेले तेव्हां ते म्हणाले, "कुसुम जिथ जाईल तिथ असा कांहीं ना कांही उत्पात घडून च येईल. कांहीं तरी गडबड होईल च." आज आमच्या ओडिया वर्गात गोविंदन्भाईनें पहिलें च वाक्य म्हटलें, 'कुसुमअप्पा आजि स्वर्गकु जाऊ थान्ता' (कुसुमताई आज स्वर्गाला जाणार होत्या.)

ठाकुरपटन्याच्या मुक्कामावर आम्ही पोहोंचलों तेव्हां बाबांची खाण्याची वेळ झाली होती. म्हणून जयभाई दहीं घेऊन आले. बाबानीं हसत हसत एक श्लोक सांगितला—

शतं विहाय भोक्तव्यं सहस्रं स्नानमाचरेत् ।
लक्षं विहाय दातव्यं कोटिं त्यक्त्वा हरिं भजेत् ।।

—शंभर गोष्टी सोडून प्रथम भोजन केलें पाहिजे, हजार गोष्टी सोडून स्नान केलें पाहिजे, लाख गोष्टी सोडून दान दिलें पाहिजे, करोडों गोष्टी सोडून हरिभजन केलें पाहिजे. ह्याचा अर्थ समजावून देऊन ते म्हणाले, "कुसुमचा पोस्ट ग्रॅज्युएट कोर्स चालला आहे !" मी संस्कृत शिकलें नाहीं म्हणून इथें जें संस्कृतचें ज्ञान मिळतें त्याचें मी एखाद्या आधाशासारखें पान करीत असतें. माझ्या काकूंना संस्कृतचें फार प्रेम. त्या अनेकदा थट्टेंत म्हणतात, 'ज्याना संस्कृत येत नाहीं ते असंस्कृत असतात.'

जयभाई सामान नीट लावीत होते. त्यानीं बाबांचीं पुस्तकें पेटींतून काढून तीं एकावर एक अशीं रचून ठेवलीं. त्या गठ्ठ्याकडे पाहत बाबानीं न्यायमूर्ति रानडे यांची एक गोष्ट सांगितली. 'रानड्यानीं एकदा अशीं च पुस्तकें

ठेवलीं होतीं. सर्वात वर बायबल होतें कुणीं तरी विचारले, "तुम्ही कळस म्हणून बायबल ठेवलेलें दिसतय्." रानडे गंभीरपणें म्हणाले, "हो. आणि सर्वात खालीं 'गीता' ठेवली आहे—आधाराकरिता" मग विनोबानें बाबा म्हणाले, "ख्रिश्चन लोक असें म्हणतात कीं स्वर्गाचा दरवाजा केवळ त्याच्याकरता च मोकळा आहे. पापी ख्रिश्चनला देखील स्वर्गात प्रवेश मिळेल पण जे ख्रिश्चन नाहींत त्याना काहीं तिथें प्रवेश नाहीं. हो! आज काल दार ठोठावल्याशिवाय कुठें प्रवेश मिळतो?"

आजच्या वर्तमानपत्रात इंग्लंडचे पतप्रधान चर्चिलसाहेब याची एक बातमी होती. त्यानीं पार्लमेंटच्या सदस्यासमोर एक पेटी टेवून ते म्हणाले, "ह्या पेटीभर प्लुटोनियम ज्या देशाच्या हातात येईल तो देश साऱ्या जगावर राज्य करील."

प्रसिद्ध मुत्सद्द्याचें हें वक्तव्य ऐकून विनोबा म्हणाले, "आपल्याला दोन मतें घ्यायला पाहिजेत. एक तर आपल्या व्यक्तिगत स्वार्थाला समाजात लीन करावें लागेल दुसरी गोष्ट ही करावी लागेल कीं कोणीं आमच्या शरीराला त्रास दिला तरी त्याला वश व्हायचें, भ्यायचें, हें सारें सोडलें पाहिजे भूदानयज्ञमार्गीं हीं च दोन तत्त्वें आहेत कीं आत्मा व्यापक आहे आणि आत्मा निर्भय आहे. आपण जर एवढें केलें तर मग कुठल्या हि देशाच्या हातीं पेटीभर प्लुटोनियम येवो या दहा पेट्या प्लुटोनियम येवो, आपल्याला भिण्याचें कारण उरणार नाहीं."

शेवटीं माताना आव्हान करून ते म्हणाले, "ह्या दोन्ही गोष्टी आमच्या ब्रह्मविद्येंत आहेत. मातानीं आपल्या मुलाना दुधाबरोबर च ब्रह्मविद्या पाजावी अशी माझी इच्छा आहे."



## : ३७ :

## बुद्धदेवाची प्रेरणा

एंडरा, असुरेश्वर, नियाकुडा, कनकपूर
५–८ मार्च '५५

एंडराला खूप मोठा कालवा होता. आम्ही कालव्याचर स्नानाला गेलों, व दूर एकान्तात जागा शोधून काढली. पण कुठून कोण जाणे, थोडया च वेळात गावच्या स्त्रियानीं आम्हाला घेरलें. त्या जणू आम्हाला अजब-बगल्यातील वस्तु च समजत होत्या. आमची प्रत्येक क्रिया बारकाईनें न्याहाळत व मग एकमेकींच्या कानात कुजबुज करीत त्या तिथें अखेरपर्यंत उभ्या होत्या. मग मी त्याचेशीं मोडक्यातोडक्या ओडिया भाषेत थोडें बोललें. बाबाच्या दर्शनाला त्या फार उत्सुक होत्या. एक जण म्हणाली, ' मी आत्ता च खिडकींतून त्याचें दर्शन घेऊन आलें. ' दुसरी म्हणाली, ' मी त्याना एक केळें अर्पण केलें होतें, पण तें त्यानीं माझ्या मुलाच्या हातीं देऊन टाकलें. ' त्याचेशीं ओडिया बोलून दोस्ती करू शकल्याच्या आनंदात मी घरीं परतलें.

असुरेश्वरला उत्कलचे शिक्षणमंत्री विनोबाना भेटले ' शिक्षणा 'च्या विषयावर चर्चा करताना या जन्मसिद्ध व जीवनसिद्ध आचार्याला वेळेचें भान कुठून राहणार ? चर्चा चागली तीन तास चालली. ' ओडिया टाइप राइटर ' लवकर च तयार होणार आहे त्याबद्दल हि मंत्र्यानीं बाबाचा सल्ला विचारला. बाबाचा पहिला हल्ला होता ओडिया लिपीवर.

शिक्षणमंत्री ––ओडिया लिपीमध्यें सुधारणा करू तर पुष्कळ च विरोध होईल.

विनोबा ––(हसून) परमेश्वराच्या कृपेनें आपल्या देशात अद्याप अशिक्षित लोक पुष्कळ आहेत तेव्हा त्याना कुठली हि लिपी शिकविली तरी त्याचा विरोध राहणार नाहीं.

मंत्री ––कलेच्या द्वारें, उद्योगाद्वारें, शिक्षण देणें व्यावहारिक होईल का ?

विनोबा ––कलेला सोडणें हें च अव्यवहार्य ( impracticable ) होईल. कबीरानें विणता विणता भजनें केलीं ' झीनी झीनी बीनी चदरिया '

उद्योगाच्या द्वारें शिक्षण देणे सोपें आहे. उद्योग सगुण आहे. पुस्तकापेक्षा गुरु सगुण आहे. गुरुकडून विद्या संपादन करणे सोपें आहे. निराधार शिक्षण निर्गुण होईल. मी तर अनेक वेळा सांगतों कीं, नवी राजवट आली कीं जुना झेंडा आपण क्षणभर देखील सहन करीत नाहीं तसें च नव्या राजवटीबरोबर जुनी शिक्षणपद्धति चालू च शकत नाहीं. नव्या राज्या-बरोबर च नवें शिक्षण (नई तालीम) यायला हवी.

प्रत्येक क्षेत्रात विकेंद्रित शासन असावें यावर चर्चा करताना बाबा म्हणाले, “ सरकार गावावर नियंत्रण ठेवू शकत नाहीं, आदेश देऊ शकतें. त्याचें पालन करण्याकरता गाव बांधलेलें राहणार नाहीं. एवढा मोठा राजा वसुदेव ! त्यानें श्रीकृष्णाला सांदीपनी गुरुजवळ ठेवलें. पण वसुदेवाची सांदीपनीच्या शिकविण्यात ढवळाढवळ करण्याची हिंमत झाली नाहीं. आज कुठला हि डी.पी.आय्. एक टेक्स्ट बुक मंजूर करतो. तें प्रांतातील साऱ्या शाळांत शिकविलें जातें. विश्वामित्रानें जेव्हा यज्ञरक्षणाकरता रामलक्ष्मणाची मागणी केली तेव्हा दशरथ राजानें प्रथम नकार दिला होता. त्या वेळीं सारी पृथ्वी थरथर कापू लागली असें वर्णन आहे. मग वसिष्ठ ऋषींनीं दशरथाची समजूत घातली कीं, तुझ्या मुलांना विश्वामित्राबरोबर पाठविण्यात च त्याचें कल्याण आहे. मग दशरथानें विश्वामित्राची मागणी मान्य केली. विश्वा-मित्रानें रामलक्ष्मणाकडून यज्ञरक्षण हि करविलें व त्यांना विद्या हि दिली, अशी कथा रामायणात आहे. प्राचीन काळीं ब्राह्मण क्षत्रियाची सत्ता कबूल करीत नव्हते. राजा ऋषीला हुकूम देऊ शकत नव्हता. पण आज सारी च स्थिति बिघडली आहे. ” शेवटचें वाक्य बोलताना बाबा गंभीर झाले होते.

आज संध्याकाळचें प्रवचन ‘शिक्षणा’विषयीं झालें. “ गावात विश्व (Universe) आहे, म्हणून तिथें विश्वविद्यापीठ (University) होऊं शकतें. गाव किती हि लहान असेना, तें साऱ्या दुनियेचें प्रतिनिधी आहे. म्हणून प्रत्येक गावात मुलांना पूर्ण शिक्षण मिळेल, उच्च-शिक्षणाकरता गावाबाहेर जाण्याची जरूर राहणार नाहीं. अशी योजना केली पाहिजे. म्हणून च आपल्या पूर्वजांनी परिव्राजक संन्यासाची व्यवस्था केली होती. संन्यासी म्हणजे चालतें बोलतें विद्यापीठ

( walking university ) असें होतें प्रत्येक माणसाचें घर आणि शेती ही प्रयोगशाळा आहे प्रत्येक वानप्रस्थ शिक्षक आहे, प्रत्येक परि व्राजक सन्यासी आहे आणि प्रत्येक विद्यार्थी जिज्ञासू आहे. ''

भाषणाच्या शेवटीं बाबानीं बुलुभाईंची जाहीर प्रशसा केली व उत्तम अनुवादाबद्दल त्याचे आभार हि मानले मागून ते म्हणत होते, " तसा तो रोज च अनुवाद उत्तम करतो. पण आजचा विषय अगदीं च वेगळा होता. म्हणून जरा कठीण च काम होतें आजच त्याची कसोटी झाली " बुलु भाईंनीं अनुवाद हि साधना च मानलेली दिसते बाबानीं गीताप्रवचनात म्हटलें आहे, " प्रत्येक काम ईश्वरार्पण करण्याची वृत्ति असेल तर कुठलें हि काम करून मोक्ष मिळू शकतो "

जसुरेश्वरच्या वाटेवर नित्याप्रमाणें शेतातल्या एका शात एकान्त खळ्यात बसून अध्ययनाचा कार्यक्रम झाला. आजपासून जगन्नाथदासाच्या भागवत ग्रथाचें अध्ययन सुरु झाले तो ओडिया भाषेचा सर्वोत्तम ग्रथ मानला जातो. आज हि उत्कलमध्यें घरोघरीं त्याचें पठन होते रोज अध्ययन सपलें कीं आम्ही सारे पाच मिनिटें ध्यान करतों सारे पद्मासन घालून बसतात ' ॐ पूर्णमद पूर्णमिदम् ' या शातिमन्त्राचा उच्चार होऊन ध्यानाला आरभ होतो पाच मिनिटें आटोपलीं कीं मुण्डकोपनिषदातील खालील श्लोक म्हणून ध्यान आटोपतें व आम्ही पुढें चालू लागतों

" सत्येन लभ्यस् तपसा होष आत्मा, सम्यक् ज्ञानेन ब्रह्मचर्येण नित्यम् ।
अत शरीरे ज्योतिर्मयो हि शुभ्र , य पश्यन्ति यतय क्षीणदोषा ॥
सत्यमेव जयते नानृतम्, सत्येन पथा विततो देवयान ।
येनाऽऽक्रमन्ति ऋषयो ह्याप्तकामा , यत्र तत् सत्यस्य परम निधानम् ॥"

[ हा आत्मा सदासर्वदा सत्य, तप, सम्यक् ज्ञान आणि ब्रह्मचर्याच्या द्वारें प्राप्त होतो ज्याला दोषहीन योगीजन पाहू शकतात, तो ज्योतिर्मय शुभ्र आत्मा शरीराच्या आत राहतो सत्याला च नेहमीं जय मिळतो, असत्याला, मिथ्याला जय मिळत नाहीं सत्यानें देवयान मार्गाचा विस्तार होतो, त्याच्या द्वारें आप्तकाम ऋषिलोकाना ते पद प्राप्त होतें, जिथें सत्याचें परम निधान वर्तमान आहे ]

दुपारीं कार्यकर्त्यांशीं रसभरित चर्चा झाली. एका कार्यकर्त्याच्या मनात शंका होती, 'कार्यकर्त्यांची संख्या वाढली नाहीं तर काम कसें होईल?' बाबा म्हणाले, "आपल्या चळवळीची भिस्त संख्येवर नाहीं, चित्तशुद्धीवर आहे. आमच्या कार्यकर्त्यांची चित्तशुद्धि वाढत जाईल तर त्यांच्या सहवासात येणारे इतर लोक हि आपोआप आपल्या तत्त्वज्ञानाकडे आकर्षिले जातील. एका दिव्यानें दुसरा दिवा लागतो ना!"

अलीकडे उत्कल विधान सभेमध्यें एका जमीनविषयक बिलावर चर्चा चालू आहे. त्यामुळें जमीनवाले बरेच नाराज झाले आहेत. ते ठिकठिकाणीं आपला असंतोष प्रकट करीत असतात. बाबा त्यांना समजावतात, "तुम्ही भूदानात सहावा हिस्सा जमीन द्या. उत्कलमध्यें अशी पंचवीस हजार एकर जमीन मिळेल, तर मग त्या प्रकारचें बिल आणण्याची जरूर च राहणार नाहीं. मी तर मस्त मजेंत फिरतों आहें. मी उदासीन आहें. कुराणामध्यें म्हटलें आहे, 'मैं जगाने आया हूं, मैं डराने आया हूं।"

कनकपूरला कुणीं प्रश्न केला होता, "सरकार तुमच्या यात्रेकरता व्यवस्था करतें, त्यामुळें तुमच्या कार्याच्या प्रतिष्ठेला धक्का नाहीं पोहोंचत का?" बाबा म्हणाले, "तुमच्या प्रदेशात गौरांग महाप्रभु आले होते त्या वेळीं येथील राजानें त्यांची सेवा केली होती. पण तेवढ्यानें त्यांची किंमत शून्य झाली का? एवढें समजायला पाहिजे कीं भूदान नैतिक उत्थानाचें कार्य आहे. नैतिक उत्थान होईल तेव्हा च हा देश टिकून राहील. अशा कामात मदत देणें स्वराज्यातील सरकारचें कर्तव्य आहे. माझें काम केवळ गरिबांना मदत देण्याचें नाहीं, तर सार्‍या समाजात आमूलाग्र परिवर्तन करण्याचें आहे. त्यानें तुमच्या आमच्या राजकारणाची व अर्थशास्त्राची किंमत च शून्य होईल."

प्रश्न :– 'तुमच्या कामाचा तात्कालिक परिणाम (immediate effect) काय होईल? तो निरकाल टिकेल का?'

बाबा विनोदानें म्हणाले, "तात्कालिक परिणाम तर हा च होत आहे कीं भूदानाच्या ऑफिसमध्यें दानपत्रांना ठीग मावत आहे, आणि सारा भारत्यामुळें माझें शरीर मजबूत बनत आहे!" मग गंभीरपणें म्हणाले,

"भगवान् बुद्धाने एवढें महान् काम केलें पण त्याचा 'तात्कालिक परिणाम' तुम्हाला काय दिसतोय् ? त्याचा परिणाम सूक्ष्म असतो. तो लोकजीवनात दिसून येतो. त्याचा सखोल परिणाम आमच्या संस्कृतीवर हि झाला आहे. इथें लाखों लोकानीं मांसाहाराचा त्याग केला आहे. गायीला लोक आपल्या कुटुंबातली च एक असें मानू लागले आहेत. असें दुसऱ्या देशात घडलेलें तुम्हाला दिसतें का? पण आपण हे सारे शुभ परिणाम लक्षात घेतों कुठें ? कारण सत्कृत्याचें रेकॉर्ड कुठें ठेवलें जातें ? गावात कुठें खून झाला तर लागली च बातमी प्रेसला जाते. गावात आई मुलावर प्रेम करते, जन्मभर त्याची काळजी वाहते, त्याची बातमी कुणी छापत नाहीं. कारण तो मानवाचा स्वभाव च आहे. बुद्धाची प्रेरणा नसती तर हजारों भिक्षु-भिक्षुणी धर्म-प्रचाराकरता बाहेर पडल्या नसत्या. मला हि याला करण्याची, लोकाना दान मागण्याची, प्रेरणा बुद्धानें च दिली आहे."

साधारणपणे प्रत्येक एम्. एल्. ए. आपापल्या निर्वाचन क्षेत्रामध्यें बाबाना भेटतात. कधीं यात्रेंत हि राहतात. बाबा विनोबानें म्हणतात, "मी तर हें मानलें च आहे कीं हिंदुस्थानातल्या प्रत्येक एम्. एल्. ए.चें मला दर्शन होईल. धूमकेतूचें दर्शन विशिष्ट वेळीं च होतें ना ? माझी यात्रा त्याच्या क्षेत्रात चालते तेव्हा जर ते माझ्याबरोबर राहणार नाहींत तर मग मागून लोक विचारतील ना त्याना "Were you there, were you there ?"



## : ३८ :

# थंड आग

डीहसाही, तरतग, भिरीग्राटी
९-१२ मार्च '५५

डीहसाहीला एका शाळेंत राहायचें होतें. कटक जिल्हा सर्वांत अधिक पुढारलेला आहे म्हणतात. या प्रदेशात प्रत्येक पाच मैलावर एक हायस्कूल आहे. तें ऐकून बाबा बुलुभाईंना गमतीनें म्हणाले, " इथें महानदीप्रमाणें च ज्ञाननदी वाहूं लागली तर आपलें काम कसें होईल रे ? " डीहसाहीच्या शाळेची अभ्यासक्रमाची बाबांनीं बारकाईनें विचारपूस केली. तेव्हा लक्षांत आलें कीं आठवड्यातून एकूण चाळीस तासातून दहा तास इंग्रजीला व फक्त दोन तास संस्कृत व हिंदीकरिता दिले जातात. बाबांना त्याचें फार दुःख झालें व त्याच्या तोंडून उद्गार बाहेर पडले, " ही स्वतंत्र देशातील शाळा वाटत नाहीं. जगामधें असें एक हि राष्ट्र नसेल कीं जिथें राष्ट्रभाषेकरितां फक्त दोन च तास दिले असतील."

नंतर ते आपले तुरुंगातील अनुभव सागूं लागले, " तेथें कुणीं हि राजकीय पुस्तक मागितलें तर जेलचे अधिकारी लागली च म्हणायचे तें पुस्तक भयंकर (dangerous) आहे. म्हणून आम्ही तें देऊं शक्त नाहीं. मी मात्र गीता, उपनिषद्, सतांचीं चरित्रें इ० पुस्तकें मागत असें. तेव्हां मला तीं पुस्तकें सहज च मिळून जात. पण इंग्रजाना एवढी अक्कल नव्हती कीं त्याच्या राज्याला या च ग्रंथापासून सर्वांत जास्त धोका आहे. गीतेचा आधार नसता तर गांधी बनले नसते, टिळक टिकले नसते आणि अरविंद घोषांचें काम झालें नसतें. ज्या ग्रंथात जीवनाचें अधिष्ठान आहे, असे ग्रंथ च जुलमी सत्तेला सुरुंग लावतात.

म्हणून मला वाटतें कीं आपल्या तरुण मंडळींमध्यें या सद्ग्रंथाचा प्रचार झाला तर ते आजच्या समाजाला आग लावल्यावाचून राहणार नाहींत, आणि ती आग इतकी थंड असेल कीं ती विझवायला पाण्याची गरज राहणार नाहीं."

तरतगच्या वाटेवर पवनार आश्रमातून आलेल्या एका गृहस्थाशीं इंग्रजी भाषेवर चर्चा चालू होती. त्याचें म्हणणें होतें, अजून हि इंग्रजी भाषेला प्रतिष्ठा आहे. ज्याला इंग्रजी येत नाहीं त्याच्याकडे समाज तुच्छतेच्या भावनेनें पाहतो. बाबा म्हणाले, "ज्याना इंग्लंड अमेरिकेला जाऊन काम करायचें आहे त्यानीं शिकावी ती भाषा. खरें पाहिलें असता आपल्याला परदेशाशीं संबंध ठेवायचा असेल तर केवळ इंग्रजी च नव्हे तर फ्रेंच, जर्मन, रशियन, चिनी, जपानी, अरबी इ० अनेक भाषा शिकाव्या लागतील. पण हिंदुस्थानात राष्ट्रभाषा म्हणून हिंदी च चालेल, दुसरी चालणार नाहीं. दादाभाई नौरोजी, गोखले वगैरे त्या काळातील पुढाऱ्याना इंग्रजीचें उत्तम ज्ञान होतें. त्याच्या काळात तें योग्य हि होतें कारण त्याना इंग्रजाशीं च सामना द्यायचा होता. १८५० मध्यें इंग्रजी शिकणारे विद्वान् 'मानले गेले, *पण १९५० मध्यें त्या च प्रमाणें इंग्रजी शिकणारे मूर्ख च ठरतील.*" सारे हसत सुटले. मग पुढें बाबा म्हणाले, "या वेळीं आपल्या देशात जवळ जवळ २ टक्के इंग्रजी जाणणारे असतील. त्या सर्वानीं हें व्रत घ्यावें कीं मरण्यापूर्वी कमींत कमी एका उत्तम इंग्रजी ग्रंथाचा राष्ट्रभाषेंत किंवा मातृभाषेंत अनुवाद करू. असें झालें तर आपल्या भाषामध्यें दहा वर्षांत कमींत कमी एक लाख इंग्रजी ग्रंथाचा अनुवाद होऊन जाईल. मग इंग्रजीनी गरज च काय? त्या भाषेंत मग उरतें च काय?"

तरतगला महाराष्ट्राच्या एका विचारवंत साहित्यिकाचें बाबाना एक पत्र आलें. त्यात ते लिहितात. "तुमचें 'उपनिषदाचा अभ्यास' हें पुस्तक मीं नुकतें च वाचलें. आजवर वाचलेल्या कुठल्या हि आध्यात्मिक ग्रंथात एवढी मस्ती मला आढळली नाहीं. आणि हें पुस्तक तुम्ही वयाच्या तेविसाव्या वर्षी लिहिलें हें वाचून तर वाटलें कीं, सोमरस पिऊन च तुम्ही मातेच्या उदरात प्रवेश केला असावा."

दुपारीं बाबा कार्यकर्त्यांना म्हणत होते, "आता मला थंडपणा, ढिलेपणा बिल्कुल चालणार नाहीं. आता मला तें बाटलीचें व्याख्यान हवें आहे. बाटल्या गंपवत जा, रिकाम्या करीत जा व काम करीत जा." भागवतामध्यें भक्तीच्या मदिरेचें वर्णन आहे. बाबाना ती मस्ती हवी असते. सभा संपल्यावर निवासस्थानाकडे आम्ही परत येत होतों, तों च एक जीप

आमच्या दिशेने भरधाव येताना दिसली. जीपमधून गाठोडें काढून तें पाठीवर टाकीत एक व्यक्ति जवळ येऊ लागली. तो नारायण देसाई होता. ज्या सेवकांच्या आधारावर बाबा गुजराथच्या कामाबद्दल निश्चित होऊ शकतात, त्यात नारायण हि आहे. गुरुशिष्यांचें हितगुज किती तरी वेळ चालू होतें. दोघे हि पेले रिकामे करीत होते.

गिरीबाटीला सरकारी अधिकारी, फिल्मवाले, कॉलेजचे विद्यार्थी, विद्यार्थिनी दिसू लागलीं. उद्या कटकला जायचें आहे त्याची ही सूचना होती. जेवायच्या वेळीं बोऊ घाईघाईनें नारायणाच्या पानाशीं आल्या व कटकहून आणलेली मिठाई त्याला वाढू लागल्या. सुमित्राभाभींनें वटाट्याचे काप आणले. ओडिया भगिनी त्याला काय हवें नको तें विचारत होत्या. मीं म्हटलें, 'वा नारायण ! चागली च सेवा घेतोस कीं तू जावई म्हणून !' उत्तराचा पति व नवबाबूंचा जावई म्हणून त्याची नेहमीं थट्टा होते आणि मग ' जावई ' म्हणून आम्ही त्याची थट्टा करतों. आज तर चुनीअप्पा, मगलामावशी, उत्तरा सारे च जमले होते. गप्पा विनोदाला ऊत आला होता. चुनीअप्पा मला गणेशजी म्हणतात. का तर म्हणे मी सारा दिवस लिहीत असतें ! जनता तिकडे ' सत विनोबा की जय ' चा उद्घोष करीत होती. तें ऐकून चुनीअप्पा गभीर चेहरा करून म्हणाल्या, " हे लोक विनाकारण बाबांचा जयजयकार कशाला करतात ? तो ऐकून त्यांच्या मनावर तर यत्किंचित् हि परिणाम होत नाहीं. त्यांचा जयजयकार करणें या पदयात्रीच्या सामाचा जयजयकार करण्यासारखें च आहे ! "

येथील एक महान् संत बाबांना भेटले त्याचें नाव विश्वनाथबाबा. हे नवबाबूंचे गुरु आहेत, त्यांच्या पथात मूर्तिपूजा मानीत नाहींत, विवाहात जातिभेदाला स्थान नाहीं. रात्रीचें जेवण हि ते घेत नाहींत. 'प्रभु एक आहे, जो ब्रह्म आहे' असें ते म्हणतात. परतु ते ' अह ब्रह्मास्मि ' म्हणत नाहींत.

बाबा त्याना म्हणाले, " तुम्ही सर्वोदय विचाराच्या प्रचाराचें काम करा, म्हणजे तुम्ही व तुमचे शिष्य साक्षात् जनसेवा करू शकाल." त्यानीं तें घटकन् व आनदानें कबूल केलें.

आज एक भूदानगीतें रचणारे व उत्तम गाणारे कार्यकर्ते आले. कार्यकर्त्यांच्या सभेंत त्यांनीं एक गीत म्हटलें तें ऐकून बाबा कार्यकर्त्यांना म्हणत होते, "नारदमुनिसारखे भक्तिरस पिऊन मस्त होऊन, भजन करीत गात गात जा. असे सतत भ्रमण करणारे परिव्राजक या कामाला हवे आहेत"

शेजारच्या कालव्याचा वेगवान् प्रवाह एका पुलाखालून पलीकडे जाताना धो धो आवाज करीत होता. नारायणची ल्हानगी सुधामित्रा माझ्या पाठीस लागली म्हणून तिला कालव्यावर घेऊन गेलें पुलाखालीं जणू दुधाचे तुषार उडत होते, आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. वाटलें, तो कालवा मस्तीनें पुढें झेप घेत आहे, गात आहे—

" पेले झोकुनि क्रांतिरसाचे व्हा पुढे त्या धुंदींत । "



## : ३९ :

## ' जागे व्हा '

कटक
१३ मार्च '५५

शहराच्या भव्य इमारती. चित्रविचित्र रंगाचे पोशाख केलेले कॉलेज विद्यार्थ्यांचे घोळके आणि लोकांची अपार गर्दी ! ' भूमिविप्लव सफल हो ' चा जयनाद, फुलांचा व हारांचा वर्षाव. घराच्या छपरावर, खिडक्यांतून दर्शन करणारे असंख्य डोळे, अद्यावत् फॅशनच्या मोटारींचे भोंगे, पोलिसांच्या शिट्या, शुभ्र पोशाखांतील मन्त्रिगण—कटक शहरानें हें दृश्य ! गर्दी पाहून बाबांच्या पावलांचा वेग वाढला. मला राहून राहून परवाचें बाबांचे वाक्य आठवत होतें. " मैं जगाने आया हूँ, डराने आया हूँ । " आणि उत्कलच्या निमाईचरणनें रचलेल्या भूदानगीताच्या त्या पंक्ती—

" तुम बिछानारे काळ नाग साप,
पणा टेकि आछी उठि देख जाक । "

—अरे, तुझ्या बिछान्यावर काळा साप बसला आहे, उठ लवकर.

गादी सोडून खालीं जमिनीवर ये—शहरी जनता भूमिकातीचा उद्घोष करीत होती. शोषणावर आधारलेल्या समाजरचनेला आग लावून ती भस्म करून टाकण्याचा नी नवी समाजरचना स्थापन करण्याचा संकल्प जणू ती करीत होती. नव्या जगाच्या निर्मितीचें स्वप्न उरार्शी बाळगून वणवण हिंडणाऱ्या कलावंताचीं सुकुमार पावलें पुढें पुढें पडत होतीं. दृष्टि आत होती. त्याच्या दोन हाताना जुळण्याची च सवय जडलेली. त्याचे हात जुळले कीं जनता अत्यानंदानें जयघोष करी. असंख्य कंठातून निघालेले ते स्वर ऐकून कलावंताच्या चेहऱ्यावर किंचित् स्मिताची रेषा चमके. जणू त्याच्या नव्या जगाची चाहूल तो ऐकत होता. नवीं मूल्यें, नवा माणूस, नवें जग! नित्य नूतनता हा त्याचा प्राण होता.

हातीं पंचारती नी हृदयात भक्तिदीप घेऊन शहराच्या भगिनींनीं स्वागत केलें. करुणेच्या स्निग्ध प्रकाशानें तेवणाऱ्या नेत्रदीपानीं वातावरण उजळलें. "तुम्ही एका महान् नगरीचे नागरिक आहात. देशस्थिति व विश्वस्थितीचा परिचय करून घेणें प्रत्येक नागरिकाचें कर्तव्य आहे. साऱ्या जगात युद्धाची भाषा ऐकू येत आहे. आपला मार्ग तो नव्हे. आपली परंपरा ती नव्हे. आपल्याला आपल्या देशातील ज्वलंत प्रश्न शांतीच्या व अहिंसेच्या मार्गानें सोडवायचे आहेत. विवेकयुक्त समता, साम्ययोग स्थापायचा आहे. सर्वोदयाचा हा रस्ता आहे. सर्वोदय, साम्ययोग, विवेकयुक्त समता ह्या शब्दाचे अर्थ समजण्याकरता सर्वोदय साहित्याचे अध्ययन करा. शहरचे नागरिक विचार जाणणारे, विचार करणारे असतात. तुम्ही हा विचार समजून घ्या." जाता जाता त्याची विनोदबुद्धि जागृत झाली— "आमच्याबरोबर असलेल्या साहित्याच्या दुकानाचे दिवाळें वाजवा—सारीं पुस्तकें संपवून टाका!"

भेटीला येणाऱ्याची रीघ सुरू झाली. सर्वात आधीं उत्कलचे राज्यपाल श्री. कुमारस्वामी राजा सहकुटुंब सहपरिवार आले. त्यानीं इंग्रजींत बोलणें सुरू केलें. बाबानीं तामिळमध्यें उत्तर दिलें. भारताच्या भिन्न भिन्न प्रांताच्या लोकामधें भाषेच्या भिन्नतेमुळें जो एक पडदा निर्माण होतो तो बाबाकरता उरत नाहीं. भारतातील कुठल्या हि भाषेची व्यक्ति बाबाजवळ आपल्या मातृभाषेत हृदयींचे भाव सहज व्यक्त करू शकते!

राज्यपालांनीं बाबाचा निरोप घेतला व ते सोर्टीबाहेर पडले मात्र, उत्तरा, चुनीअप्पा, सुमित्राभाभी इत्यादींनीं त्याना घेरून टाकलें व त्या म्हणू लागल्या, " आपल्याला तर सपत्तिदान द्यायला च पाहिजे मग आज जाहीर सभेंत. " तें दृश्य पाहून आमच्या महादेवीताईंना कोण आनद झाला ! त्या म्हणू लागल्या, " इथं तर स्त्रियाचं च राज्य दिसतय."

राज्यपाल गेले. नतर शिक्षणमत्री, उत्कल विद्यापीठाचे उपकुलगुरु आणि इतर विद्वान् मडळी आली. ओडिया लिपि सुधारावर चर्चा झाली. बाबानीं लोकनागरी लिपीची वैज्ञानिकता समजावून सागितली व ओडिया टाइप-राइटरमध्यें कांहीं सुधार सुचविले.

विद्वान् मडळी गेली व भक्तमडळी आली. त्याच्यापैकीं काहींनीं बाबाना 'न्यू टेस्टामेंट'चा ओडिया अनुवाद भेट दिला. मोठ्या प्रेमानें त्याचा स्वीकार करीत बाबा म्हणाले, " शेजाऱ्यावर प्रेम करा ही येशूची शिकवण आहे, ही शिकवण म्हणजे या क्रान्तीचा पाया आहे. येशूचे अनुयायी गेले. नतर अल्लाचे सेवक आले. त्याना शका होती, सर्वोदय समाजात धर्म टिकेल कीं नाहीं ? बाबानीं त्याना सांगितलें, " धर्म न टिकण्याचीं लक्षणें तर आज च्या च समाजात दिसतात. पण सर्वोदय समाजात सर्व धर्म राहतील. मी तर मानतों कीं वेगवेगळे धर्म म्हणजे उपासनेचे भिन्न प्रकार आहेत." इस्लाम धर्मांत आपल्या सपत्तीचा एक हिस्सा धर्माकरता देण्याचा आदेश आहे असें सागून ते सपत्तिदान देण्याचें कबूल करून गेले.

दुपारीं स्त्रियाची सभा झाली. स्त्रियाना आर्थिक स्वातत्र्य नसतें म्हणून त्याची फार कुचबणा होते असे एका भगिनींचें म्हणणें होतें. विनोबा म्हणाले, " तुम्ही केवळ आर्थिक स्वात याचा च विचार का करता ? मी तर म्हणतों, सर्व तऱ्हेचे स्वातत्र्य स्त्रीला मिळालें पाहिजे. पुरुषप्रधान समाजात स्त्रियाची दशा ही च होणार. तुम्हाला पुरुषाचें व साऱ्या समाजाचें च नेतृत्व केलें पाहिजे. पण त्याकरता निरतर अध्ययन करा, ज्ञान मिळवत जा."

शहरातल्या स्त्रियाची सभा म्हणजे रंगीबेरंगी कपडे, नाना तऱ्हेची वेश-भूषा, वेषभूषा दिसेल असें वाटलें होतें. पण त्या साऱ्या अतिशय साध्या होत्या. साधेपणा हा या प्राताचा च गुण दिसतो. बाबा त्याच्याकडे पाहत म्हणाले, " ये बहनें गहनेवाली नहीं दीखतीं । जो बहनें गहने पहनतीं है वे

भीरु होती हैं।" शेवटीं बाबानीं त्याना कार्यक्रम दिला– "प्रत्येक घरात चरखा चालविण्याचें काम उचला."

मग वकील आणि डॉक्टर आले. वकिलाना बुद्धिदानाची मागणी करीत बाबा म्हणाले, "आई आपल्या मुलाच्या अपराधाकडे ज्या दृष्टीनें पाहते, पुरावा च मिळाला तर नाइलाजानें कबूल करते, पण तिच्या मनात पूर्ण विश्वास असतो कीं आपला मुलगा अपराध करणार नाहीं– तें मातृत्व, ती क्षमाशीलता, तुमच्यामध्यें यऊ द्या."

व्यापारी आले. त्याना युगधर्माची आठवण करून देत बाबा म्हणाले, "काळाचीं पावलें ओळखून वागाल तर सर्वांचें च कल्याण आहे. तहानेनें व्याकुळ झालेल्याला जो पाणी देतो त्याचा आनद तहानेलेल्याला पाणी मिळाल्याच्या आनदापेक्षा अधिक असतो. स्वत. उपाशी राहून भुकेलेल्याला खाऊ घालण्यात एक विशेष च आनद आहे. सत्तेला आणि सपत्तीला तृणवत् समजून ती फेकून देणाऱ्याची आपल्या देशाची परपरा आहे. वेळ निघून जाईल, प्रवाहाला विरोध करणारे कसे टिकतील?"

आजच्या सभेंत कॉलेज तरुणाची सख्या अधिक दिसत होती. त्याच्या प्रसिद्धीप्रमाणें ते काहींतरी खोडकरपणा करतील असें वाटलें होतें. पण नेहमींचा च अनुभव आला. विद्यार्थी सभेंत नेहमीं च शात असतात. आज हि अखेरपर्यंत शाति होती. बाबा म्हणतात, "विद्यार्थ्यांशीं माझी दोस्ती च आहे." उत्कलमध्यें प्रवेश केल्यापासून आज प्रथम च बाबाचें भाषण अनुवाद न होता झालें. भाषण सुरु करण्यापूर्वी बाबानीं जनतेला विचारलें होतें. अनुवादक कितीं हि कुशल असला तरी तो रसहानि करतो च आणि जनतेच्या हृदयाला आपले शब्द सरळ स्पर्श करीत नाहींत. बाबा नेहमीं म्हणतात कीं, "भूदानाबरोबर च मी राष्ट्रभाषेचा हि प्रचार करतो." पण बिचाऱ्या प्रेसवाल्याची मात्र आज चागली च त्रेधा उडाली. भाषण सपता च त्यानीं मला गराडा घातला व म्हणू लागले, "माफ करा बहनजी, आम्हाला हिंदी तितकेंसें येत नाहीं. ह्याची आम्हाला लाज हि वाटते. थोडी मदत कराल का?"

उत्कलमध्यें प्रवेश केल्यापासून बाबा उत्कलवासीयाना वारवार आठवण करून देतात कीं, "तुमच्या पूर्वजानीं महान् पराक्रम केला होता. त्याच्या

तपस्येचें बळ तुम्हाला आयतें च मिळालें आहे. ही वीरभूमि आहे. म्हणून च भूमातीचा जप करीत मी इथें आलों आहें. तुम्हाला हि नवा पराक्रम करण्याची, पुरुषार्थाची, सुसंधि *अनायासें चालून आली आहे.*" आजच्या विराट् सभेला ते हें च सांगत होते "बुद्धासारखा महापुरुष जगात दुसरा कोणी झाला नाहीं. सम्राट् अशोकासारखा महान् राजा हि झाला नाहीं. आता तुम्ही हें सिद्ध करू शकता कीं, उत्कलसारखा महान् प्रदेश जगात दुसरा होऊ च शकत नाहीं "



## : ४० :

## ' देवां 'ना धोक्याची सूचना

पुलनसरा, भुवनेश्वर
१४, १५ मार्च '५५

विश्व शांति आंदोलना ( World Peace Council ) चे येथील कांहीं प्रतिनिधी काल बाबाना भेटायला आले होते आज हि ते चर्चा करण्या करता आमच्याबरोबर चालत होते ते विश्वशांतीकरिता एका पत्रकावर सह्या गोळा करण्याचें काम करीत आहेत बाबाची पहिली सही घेण्याचा त्याचा विचार होता. *बाबा त्याना म्हणाले, "इकडे तुम्ही सह्या गोळा* कराल तर तिकडे ॲटम, हैड्रोजन बॉंब होणें थांबेल का ? "

त्याना एका गृहस्थानें विचारलें, ' ॲटम व हैड्रोजन बॉम्बबद्दल तुम्हाला काय वाटतें ? ' *ह्यावर चटकन् उंच आवाजात बाबा म्हणू लागले, " मी* तर म्हणतों हवे तितके बॉम्बस वाढवा मला त्याची फिकीर नाहीं. मला चिंता आहे ती ल्हान ल्हान शस्त्राची ! आईवडील मुलाना ठोकतात, गुरु शिष्याला पिटतात, ल्हानसहान कारणावरून हातात काठया घेऊन लोक एकमेकाचीं डोकीं फोडतात, ही अल्प हिंसा च भयानक आहे. तुम्ही *सारीं शस्त्रास्त्रें काढून घ्या आणि मग पहा त्याचा काय परिणाम होतो तें.* पण रशिया म्हणतो अमेरिका शस्त्रत्याग करीत नाहीं तर आम्हीच तो का

करावा? अमेरिका हि हें च म्हणते. इकडे हिंदुस्थान, पाकिस्तान हि एकमेकाना असे च भीत आहेत. मी म्हणतों प्रयत्न तर करून पहा शस्त्रास्त्रें सोडण्याचा. मग पाकिस्तान मोठमोठीं शस्त्रें कशाला बाळगील? त्याच्या खर्चाची हि बचत होईल. समजा, पाकिस्तानला हिंमत झाली च तर तो फार झालें तर लाठी घेऊन येईल हल्ला करायला. उगा च मोठमोठीं शस्त्रें कशाला आणील तो? मग आमच्या इथल्या स्त्रिया, मुलेबाळ, मोठ्या कुतूहलानें बाहेर पाहायला येतील. त्याना वाटेल हें ह्यानीं काय आणलय? कशाला आलेत हे लोक? 'पाक'वाले सागतील, 'आम्ही लाठ्यानीं तुमच्या डोक्यावर प्रहार करणार आहोत.' अन् मग आमचे सारे लोक मस्त मजेंत ऐटींत सूत कातत बसतील, ते आपला लाठीमार सुरू करतील अन् चाळीस पन्नास मुडकीं उडविल्यावर त्याना वाटेल, 'अरेच्या! हे काहीं विलक्षण च लोक दिसतात, काहीं प्रतिकार च करीत नाहींत.' आणि मार थाबवतील. सारें जग हा तमाशा पाहील. तुम्हाला काय वाटतें? ह्यावरून फार मोठी नैतिक शक्ति प्रकट नाहीं होणार?

"पण आज असा प्रयोग करण्याची हिंमत आहे कोणामधें? तुम्हाला जर विचारलें, शस्त्रत्याग करण्याचा आरंभ कुणीं करावा, तर काय उत्तर द्याल हो तुम्ही?"

ते गृहस्थ चूप होते. काहीं बोलेनात. तें पाहून बाबा च पुनः म्हणाले, "तुमच्याजवळ उत्तर कुठें आहे? तुम्हाला वाटतें अमेरिकेनें आधीं शस्त्र खालीं ठेवावें. रशियाजवळ जर जास्त ॲटम व हैड्रोजन बॉंब असते तर तुमची ही Peace Movement [शांततेची चळवळ] चालली नसती. मी तर म्हणतों, शस्त्रत्यागाचा आरंभ हिंदुस्थानापासून च व्हायला पाहिजे. प्रत्येक जण दुसऱ्याची वाट पाहू लागला तर सुरुवात च कशी होणार?"

दुसरे गृहस्थ पुढें येऊन विचारूं लागले, "तुम्ही दानपत्रावर सह्या घेता कीं नाहीं? आमच्या हि सह्याचा असा मानसिक परिणाम होणार नाहीं कशावरून?"

बाबा.—तुमच्या हि सह्याचा परिणाम होईल कीं! पण असें आहे, आज काल सर्व च म्हणतात शांति पाहिजे 'सर्वेऽपि सुखिनः सन्तु' सारे च

म्हणतात. पण त्या च बरोबर असे हि वाटतें कीं, 'हमारे पाससे कवडी न गच्छन्तु.' आम्ही केवळ सह्या च घेत नाहीं. त्याच्याबरोबर जमीन व संपत्तीचें दान हि घेतों. तुम्ही हि असा च प्रयोग कराल तर त्याचा कांहीं उपयोग होईल. तुमच्या सह्यांचा जो कार्यक्रम आहे, त्याच्या मी विरुद्ध नाहीं. पण मला एवढें च म्हणायचें आहे कीं, तो कार्यक्रम निष्फळ आहे.

प्रश्न —शस्त्राचा उपयोग न करता विश्वशांति होईल असा तुमचा विश्वास आहे का ?

बाबा —हं ! आता कसा ठीक प्रश्न विचारला तुम्हीं ! या प्रश्नाचा अर्थ च हा कीं, तुमचा विश्वास च मुळीं शस्त्रावर आहे. मग कशाला हो शांतीच्या गप्पा ? जोंवर तुमच्याजवळ तितकी शक्ति, अधिक शस्त्रास्त्रें येत नाहींत तोंवर तुम्ही शांतीच्या गोष्टी कराल. एकदा शस्त्रास्त्रें वाढलीं कीं तुमची ही 'शांतीची चळवळ' च बंद पडेल.

रस्त्याच्या कडेनें ठिकठिकाणीं उघडे व मुग्यांनीं केलेलीं लाल मातीचीं सुंदर इवलालीं घरें पाहून बाबा म्हणत होते, "भुवनेश्वर ह्याहून सुंदर आहे का ?"

पुरुलियाच्या सभेंत बाबांचें भाषण आटोपल्यानंतर दानपत्रांना सुरुवात होऊं लागली. गर्दींतून एक व्यक्ति पुढें येई व झुडुभाईजवळून दानपत्र घेऊन लिहूं लागे. त्यानीं सही करता च झुडुभाई उंच आवाजांत जयघोष करी, 'आनंद एक बार.' जनता साद घालून प्रत्युत्तर देई, 'हरि बोलो.' आपोआपच स्वर येऊं लागला, 'आनंद एक बार—हरि बोलो.' हात उंच करून बाबा साथ देऊं लागले, 'हरि बोलो !'

निरनिराळ्या पदव्या भरधाव धावणाऱ्या मोटारी स्वागत होता- उत्कलाच्या नवीन वसविलेल्या राजधानींत प्रवेश होणार आहे.

घण ! घण ! घण ! घुमत च घंटानाद ऐकू येऊं लागला. मंदिराच्या गोपुराचें दर्शन होऊं लागलें. आम्ही भुवनेश्वरच्या लिंगराजाच्या मंदिराजवळ जात होतों. नगाऱ्याचा आवाज ऐकू आला. धूप, उदबत्ती, कापूर आणि गुलाबाच्या फुलांच्या मंदमधुर परिमळानें देवाच्या दारीं पोहोंचण्याचें आमंत्रण धाडलें च. थोड्यांत मग मंदिर दिसू लागलें. दगडांत नी जग

निर्माण करणाऱ्या त्या अज्ञात कलावतांनीं एकेक मूर्ति घडविताना आपली सारी शिल्पकला, सारसर्वस्व त्यात ओतलेले आहे. मूर्ति निर्माण होईपर्यंत रात्रंदिवस त्या शिल्पकारासमोर तो च एक दगड असेल. हातीं हातोडा नी हृदयात एक गोड स्वप्न ! स्वप्न दगडात साकारलेले पाहता च कलावत जागा होई, मग त्याला वाटे, ही दिव्य वस्तु त्यानें नाहीं घडवली, कुणीं तरी त्याच्या हातून ती घडवली आहे !

काळ्या कुळकुळीत दगडाची ती दुनिया किती सजीव होती ! रम्याळ-पणें हसत बाळ गणेश एका कोपऱ्यात उभा होता. गंगेच्या किनारीं बसून तिच्याशीं अनेकदा गुलगुल गोष्टी करणारी हिमाचलसुता – देवी पार्वती – सुंदर वस्त्र नी अमूल्य अलंकार लेवून सौम्य हास्यानें वातावरणात सौम्यता विखुरीत होती. हातीं नाना तऱ्हेचीं वाद्यें घेऊन गायिका व नर्तिकांनीं तिच्याभोंवतीं फेर धरला होता. कुठे वीर समरांगणात लढत होते, तर कुठें हत्तींची रांग मोठ्या ऐटीनें डुलत डुलत पुढे जात होती. कुठे गुरु शिष्याला पाठ शिकवीत होते, तर कुठे माता लेकराना कुरवाळत होत्या, थोपटत होत्या. एका कोपऱ्यात एकान्तात कुणी रमणी प्रियकराला प्रेमपत्र लिहिण्यात मग्न दिसत होती. विशाल नंदी मोठ्या ऐटींत देवाच्या दारीं बसला होता.... आम्ही आत शिरलों. गाभाऱ्यात जाऊन उभीं राहिलों. प्रशान्त स्थान, फुलांच्या ढिगाऱ्यात झाकले गेलेलें भव्य शिवलिंग, समयांचा स्निग्ध प्रकाश, पिंडीवरच्या घागरींतून थेंब थेंब होणारा अभिषेक– सारें पाहून हृदय गाऊं लागलें—

'भुवनेश्वर हे ! मोचन कर बंधन सब मोचन कर हे !' आणि बाबांची प्रिय षट्पदी– 'आत्मलिंग शिव तू' आत्मा एक आहे, माया शून्य. एक आणि शून्यातून सारी सृष्टि निर्माण झाली आहे. त्याचें च प्रतीक म्हणजे शिवलिंग ! ... देवळातून बाहेर पडलो. बीनादीचें गोड गीत कानात घोळत होतें—

'प्रभु तव प्रसन्न मुख, सब दुःख करोक सुख।'

'भुवनेश्वर' उत्कलची नवी राजधानी आहे. कटकपासून चौदा मैल दूर वसलेली आहे. आज सध्याकाळीं उत्कल विधानसभेचे सभासद आणि मंत्रिगण बाबांना भेटणार होते. पण ती सभा दिवसाउजेडीं ठेवा असा आग्रह करीत बाबा म्हणाले, "दिवसा सर्वांच्या चेहऱ्याचें दर्शन होईल. आपल्या देशात हा एक वेडेपणा च (पागलपन) आहे. येथील लोकांना दर्शनाची जितकी अभिलाषा असते तितकी श्रवणाची नसते. ही एक सूक्ष्म वस्तु आहे. हा गूढवाद नाहीं, गूढ अनुभूति आहे."

सभा दुपारीं ठेवली. आपल्या दर्शनाभिलाषेचें विवेचन करताना बाबांनी जनतेच्या प्रतिनिधींना 'देवता' ही संज्ञा दिली. ते म्हणाले, "तुम्ही सारे जनतेनें निवडलेले, निवडक लोक आहात. तिचे विश्वस्त, तिचे लाडके सेवक आहात. जनतेनें तुम्हाला पाच वर्षांकरिता देशाचा कारभार पाहण्याचा अधिकार दिला आहे. अशा अधिकृत सेवकांना 'सुर' किंवा 'देवता' म्हणतात मुनि म्हणजे चिंतनशील, स्वतंत्र, रागद्वेषरहित विचारक आपल्या समाजशास्त्रात म्हटलें आहे कीं, देवतामध्यें अनेक तऱ्हेच्या शक्ति असतात. पण ते बहुधा भोगपरायण बनण्याची भीति असते, तेव्हा त्यानीं सावधान राहायला पाहिजे त्यामुळें त्यांना 'दमना'ची विशेष आवश्यकता आहे ऐश्वर्याबरोबर स्वाभाविक च भोग हि येतो त्यामुळें देवापुढें जनकमहाराजाचा आदर्श असावा. जनकमहाराज वैभवात राहून हि वैराग्यशील आणि अत्यंत अलिप्त होते. "मिथिलायां प्रदीप्तायां न मे दह्यति किंचन" "मिथिला नगरीला आग लागली तर मी जनतेच्या मदतीला धावून जाईन. पण त्यानें माझें काहीं बिघडायचें नाहीं." अशी त्याची वृत्ति होती.

बापू गोलमेज परिषदेकरिता इंग्लंडात गेले होते त्या वेळची गोष्ट. लंडन मधील सर्वांत खालच्या वर्गाच्या, गरीबांतील गरीबांची जिथें वसाहत आहे तिथें ते जाऊन राहिले होते. परिषदेच्या जागीं जायला सव्वा घंटा लागत असे. एवढा वेळ ते वाचवू शकले नसते का? ही घटना सांगून बाबा म्हणाले, "तुम्ही गरीब जनतेचे प्रतिनिधी आहात. जनता थर्मामीटर आहे. ती जड असली तरी तिला पारख आहे. आपल्या प्रतिनिधींच्या जीवनावरून च

ती त्याची पारख करते. तेव्हां त्यानीं तुम्हाला निवडून दिलें आहे त्याच्या हृदयाशीं तुमच्या हृदयाची तार लागू द्या."

कवीनें प्रभु रामचंद्राच्या जीवनातल्या एका प्रसंगाचें वर्णन केलें आहे. भरतावर राज्यकारभाराची जबाबदारी सोपवून प्रभू निश्चिंत मनानें वनवासाला निघून गेले. भरतानें अत्यंत नम्रपणें ती आज्ञा शिरोधार्य मानली. वर्षांमागून वर्षें लोटलीं. भरत एकाग्रतेनें आज्ञेचें पालन करीत होता. मात्र त्यानें प्रभूच्या पादुका सिंहासनावर ठेवल्या होत्या व स्वतः अयोध्येहून चार मैल दूर राहत होता. चौदा वर्षें सरलीं. प्रभु अयोध्यानगरींत परत आले. सर्वप्रथम भरताला भेटण्याची इच्छा त्यांनीं प्रकट केली. कुठल्या भावानें जंगलांत तपस्या केली अन् कोण राजधानींत राहिला तें ओळखता च येईना. रामानें जंगलाला मंगल केलें. भरतानें राजधानींत वन आणून ठेवलें, तो वैभवापासून अलिप्त राहिला.



## : ४१ :

# सहजीवन, सहभोजन, सहभजन

सागलई, टाडमुकुदपुर, साक्षीगोपाल
१६–१९ मार्च '५५

फ्रान्सच्या 'शातिदासभाई'च्या आश्रमातून फ्रान्स नावाची आमची एक भगिनी नुक्ती च यात्रेंत आली आहे. शातिदासभाई मूळचे इटलीचे. परतु फ्रान्स देशाला त्यानीं कर्मभूमि केले आहे. बापूचे ते परमभक्त. पधरा वर्षापूर्वी ते बापूना भेटायला हिंदुस्थानात आले होते. त्या च वेळीं बापूनीं त्यांचें Lanza Del Vasta हें नाव बदलून शातिदास हें नाव ठेवलें. आमच्या बिहार यात्रेत ते तीन महिने बरोबर राहिले होते. त्याचा शात, गभीर चेहरा, गौरवर्ण आणि पाढरी शुभ्र लाब दाढी, गळ्यातील क्रॉस पाहून वाटे युरोपचा कोणी ऋषि च आला आहे. ते उत्तम सगीतज्ञ व चित्रकार हि आहेत. पहाटे प्रार्थनेंत ते गिटारवर लॅटीन भजन गात असत, तेव्हा स्वतःबरोबर इतराना हि ते देवाच्या चरणाजवळ घेऊन जात. बाबा त्याच्या भजनावर मुग्ध होते.

शातिदासभाईंचा एक कार्यक्रम चित्र काढण्याचा नित्य चाले. सभेंत भाषण करताना, झपझप वाट चालताना, ध्यानस्थ बसून प्रार्थना करताना बाबाच्या सर्व च मुद्रा ते अत्यत काळजीपूर्वक न्याहाळीत. त्याची पेन्सिल कागदावर अलगद हलके हलके च फिरू लागे. त्यानीं रेखाटलेलीं चित्रें पाहून मी त्याना म्हणत असें, 'वा! तुम्हीं तर आमच्या बाबाना येशू च बनवून टाकलय!' का कुणास ठाऊक, पण त्याच्या चित्रात मला येशूचा भास होई. माझें बोलणें ऐकून' ते किंचित् हसायचे व म्हणायचे, "मग? ते दोघे भिन्न आहेत का?" शातिदासभाईंनी फ्रेंच भाषेंत बाबावर एक पुस्तक लिहिलंय. फ्रेंच भाषा जाणणारे त्या पुस्तकाची तोंड भरून प्रशसा करतात व म्हणतात कीं, त्यात कलावताची लेखणी व भक्ताचें हृदय दोन्ही उतरलीं आहेत. मला फ्रेंच येत नसल्यामुळें मी त्याच्या ह्या कलाकृतीचा आस्वाद घेऊ शकत नाहीं याचें मला मग कित्येकदा फार दुःख व्हायचें. पण मग माझ्या हृदयात घुमे तरी गिटारच्या तारांचें कपन आणि पेन्सिलीच्या

हलक्या रेषा याचें मीलन झाल्यागत भासू लागायचें नी कधीं त्या ताराच्या करणोत्स्ट कपनात येशूचें अस्पष्ट चित्र दिसू लागे तर कधीं त्या नाजूक रेखातून भजनाच्या स्वराचें गुंजन ऐकू येई आणि मग हृदयाला अतीव समाधान वाटे. मन हळू च म्हणायचे, 'मला कळतें त्या पुस्तकाची भाषा!'

सागलई गावच्या एका सद्‌गृहस्थानीं मोठा मजेदार प्रश्न विचारला, "भूदानात जमीन दिली पाहिजे ही गोष्ट हृदय कबूल करते, पण जमीन देण्याची काहीं हिंमत होत नाहीं, मग काय करावें?"

बाबा म्हणाले, "हाच प्रश्न दुर्योधनानें विचारला होता. 'जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः। जानामि अधर्मं न च मे निवृत्तिः।' धर्म काय आहे हें मी जाणतों पण त्याच्याकडे वळण्याची माझी प्रवृत्ति च होत नाहीं. आणि अधर्म म्हणजे काय आहे हें हि मी जाणतों परतु त्या-पासून माझी निवृत्ति होत नाहीं. हा प्रश्न फक्त दुर्योधनाच्या च नाहीं पण सज्जनाच्या हि मनात उभा राहतो. पण मनाला एक विचार पटला कीं मग त्या समोर युक्तिवादाची काहीं जरूर उरत नाहीं. एखादी गोष्ट युक्तिवादानें समजवावी लागते. पण एकदा ती समजली म्हणजे त्याच्यावर अमल करण्या-करिता युक्तिवादाची नव्हे तर भक्तीची जरूर असते. म्हणून माझें तुम्हाला असे सागणें आहे कीं, आता उगी च जास्त बुद्धि लढवू नका, रामाचें नाव घ्या आणि दान देऊन टाका, म्हणजे सारें ठीक होईल. या ससाररूपी महानदीला अडविण्याकरिता 'भूदानयज्ञ' हा 'हिराकुड धाध' आहे. शास्त्रकारानीं धर्माची व्याख्या करताना म्हटलें आहे कीं ज्याला हृदयाची समति मिळते तो धर्म होय. जमिनीवर कुणाची मालकी होऊ शकत नाहीं, जमीन देवाची आहे, ह्या गोष्टीला आज सर्वांच्या च हृदयाची मान्यता मिळाली आहे."

चार वर्षांपूर्वी तेलगण पेटलें होते. त्या ज्वाला शमविण्याकरिता अभिषेक हवा होता. शातीचा मंत्र जपणाऱ्या ऋषीच्या मागणीला एकाने उत्तर दिलें. त्या एका लहानशा दानात क्रातीचें बीज आहे हें क्रातदर्शीनें ताडलें आणि 'ईशावास्यमिद सर्वम्' या मंत्राची आशा पाळायला तो शिकू लागला. चरणचक्र वेगानें फिरूं लागलें. सारें जीवन परमेश्वराचें आहे, या जगात 'माझें' आणि 'तुझें' हे शब्द अर्थशून्य आहेत, असें तो सागू लागला.

' आत्मार्थे पृथिवीं त्यजेत् ' असा अभिमान उराशीं बाळगणाऱ्यांना जमिनीचा त्याग करणें कठीण नव्हतें. 'त्यक्तेन भुञ्जीथाः'ची हवा सगळीकडे खेळूं लागली व मोहाची धूळ उडवूं लागली. म्हणून च ' भूदानाचें तत्त्व पटतें पण जमीन देण्याची हिंमत होत नाहीं ' ही आशाजनक भाषा ऐकूं येऊं लागली. ' आज हिंमत होत नाहीं, ती उद्यां होईल. काल तत्त्व पटत नव्हतें, आज तें पटूं लागलें ना ? ' अमर आशा बोलूं लागली.

साक्षीगोपालाचें प्राचीन देऊळ फार प्रसिद्ध आहे. फार जुनी कहाणी आहे. दूरदूरचे लोक गोकुळ वृंदावनाच्या दर्शनास येत. दक्षिणेकडील कांचीपुरमचा एक वृद्ध ब्राह्मण असा च दर्शनाला तिथें गेला होता. तिथें तो बरा च आजारी पडला. दर्शनाला आलेल्या एका तरुणानें त्याची सेवा केली. त्या वृद्धाला आराम वाटूं लागला. तरुणाच्या सेवेवर वृद्ध खुष झाला आणि त्यानें त्या भरांत गोपालकृष्णाला साक्षी ठेवून त्या तरुणाला वचन हि देऊन टाकलें कीं ' माझ्या कन्येचा विवाह मी तुझ्याशीं करीन.' कांचीपुरमला घरीं परत आल्यानंतर त्या ब्राह्मणाला काय वाटलें कुणास ठाऊक, त्याच्या मनानें माघार घेतली. तरुणानें त्याला विनंति केली, समजावलें. पण व्यर्थ ! शेवटीं त्यानें ग्रामपंचायतीसमोर तक्रार मांडली पंचायत त्याला विचारूं लागली, साक्षी कोण होतें ? तरुणानें सांगितलें, वृंदावनाचा गोपाल साक्षी होता. पंचायतीनें त्याला साक्षीला बोलवायला सांगितलें. तरुण पुनः निघाला, वृंदावनाच्या गोपालासमोर उभा राहिला व प्रार्थना करूं लागला, " त्या ब्राह्मणानें मला वचन दिलें होतें, तुझ्यासमोर तुझ्या साक्षीनें. आतां तो ब्राह्मण वचन पाळायला तयार नाहीं. पंचायत मला साक्ष मागते आहे. तूं च एक साक्षी होतास. तेव्हां आतां चल." देवाच्या दाराशीं तो रात्र-दिवस धरणें धरून बसला. शेवटीं तिसरे दिवशीं रात्रीं देवळाच्या गाभाऱ्या-तून त्यानें गंभीर वाणी ऐकली, " मी तुझा साक्षी म्हणून येतों. उद्यां सकाळीं तूं इथून आपल्या घराकडे जाण्यास नीघ. मी तुझ्या पाठोपाठ येतों." तरुणानें हिंमत करून विचारलें, " पण समजा, तुम्ही आला नाहींत. मी कसें मानूं तुम्ही येत आहां तें ?" पुनः आवाज ऐकूं आला, " मी तुझ्या मागें पायांत वाळे घालून चालत राहीन, त्याचा आवाज तुला ऐकूं येत राहील. तूं कधीं हि मागें वळून पाहूं नकोस. मागें वळून पाहशील तर

मी जिथला तिथें च थांबेन." तरुणाला आनद झाला. प्रात काळीं उठून ठरल्याप्रमाणें तो चालू लागला आणि त्याच्या कानीं वाळ्याचा ध्वनि येऊ लागला. तो अत्यानंदानें पुढें चालत राहिला. पुढे एक मोठें वाळवट लागलें. थोड्या च वेळात वाळ्याचा ध्वनि ऐकू येईनासा झाला. त्याला वाटलें, 'देवाने आपल्याला फसविलें तर नाहीं ना? तो निघून तर गेला नसेल ना?' म्हणून त्याने मागें वळून पाहिले. गोपाल चालत येत होते, पण वाळू असल्यामुळें वाळ्याचा आवाज ऐकू येत नव्हता. पण तरुणानें मागें पाहिल्यामुळें गोपालाची तिथें दगडाची मूर्ति झाली. तो धावत मागें गेला, ओक्साबोक्सीं रडू लागला. त्यानें देवाला प्रार्थना करून पाहिल पण व्यर्थ. शेवटीं तो तसा च काचीपुरमला गेला व तेथाल पचाना त्याने ही कहाणी सागितली. ती ऐकून कुतूहलानें ते सारे ती मूर्ति पाहायला आले. मूर्ति पाहून त्याचा तरुणावर विश्वास बसला. वृद्ध ब्राह्मणानें हि मग त्याला आपली मुलगी देण्याचें कबूल केलें. त्या मूर्तीभोंवतीं मदिर उभारले गेलें. ते च हें 'साक्षीगोपाळा चें देऊळ. पुरीच्या जगन्नाथाचें दर्शन घेणारे साक्षी गोपाळाचे दर्शन घेतल्यावाचून परत जात नाहींत

बाबानीं प्रवचनात जरा नवीन तऱ्हेनें ग्रामपरिवाराचा विषय माडला. "गावात सर्वांमध्ये आत्मीयता, प्रेमभाव, सहयोग निर्माण होईल तेव्हा गावाचें एक कुटुंब होईल, सहजीवन होईल. सहजीवन, सहभोजन, सहभजन हा च तर भूदान यज्ञाचा कार्यक्रम आहे."

जगन्नाथपुरीला पोहोंचायला अवघे तीन दिवस उरले आहेत २५ मार्च ते २७ मार्चला तिथें सर्वोदय समेल्न व्हायचें आहे यात्रेत समेलनाकरिता येणाऱ्या पाहुण्याची वर्दळ सुरू झाली होती. आजकाल बाबा लोकाना सागतात, "गाधीविचारप्रेमी, सर्वोदयाचें तत्त्व जीवनात उतरवू पाहणाऱ्या भक्त लोकाचा मेळावा पुरीला भरणार आहे. गरीबाचे उत्थान कसें होईल ह्यावर ते सारे विचार करणार आहेत. हिंदुस्थानाच्या कानाकोपऱ्यातून माणसें येतील. त्यानीं ओरिसाची कीर्ति ऐकली आहे. आता तुम्हाला त्या लायक काम करून दाखवलें पाहिजे. ऐकलेल्या प्रशसेंत सत्य होतें हें त्याना कळू द्या."



: ४२ :

## ' दानपत्र म्हणजे विश्वशांतीकरितां मतदान '

जगन्नाथपुरी
२०–३० मार्च '५५

अंधार लपत होता, चांदण्या लोपत होत्या आणि विविध रंग उधळीत भानु उदयाचलाची चढण चढत होता. त्याने उजळवलेली समोरची वाट आम्हाला पुरीच्या पावनक्षेत्राकडे नेत होती. क्षेत्र जवळ येऊं लागले आणि त्याबरोबर च जनतेची गर्दी उसळली. प्रचंड पूर आला म्हणजे पाना देखील आपला नेहमींचा मार्ग विसरून जातात. असंख्याच्या त्या गर्दीत व्यवस्था राहू शकली नाहीं. इकडे गर्दी टाळण्याकरता बाबा रस्त्याच्या अगदीं कडेकडेनें चालू लागले, तिकडे दर्शनोत्सुक जनता त्यांना शोधू लागली. मधून च बाबा पळू लागायचे तर मधून च गमतीनें कुणाच्या पाठीवर हात ठेवून खुणावून ' मी च तो विनोबा बर का ! ' असें सांगून नमस्कार ठोकू लागायचे, ही आगळी रीत पाहून लोक चमकून जायचे. गर्दी आवरतां आवरतां आमच्या नाकीं नव आले व चांगला च व्यायाम झाला. तेवढ्यात शीतल वायूचा सुखकर स्पर्श होऊं लागला. सागर जवळ आल्याची ती सूचना होती. त्याच्या दर्शनाकरिता अत्यंत आतुर होऊन आम्ही वेग वाढवला. थोड्या च वेळात विशाल निळा निळा जलधि दिसूं लागला. अनेक दिवसांची मनीषा पूर्ण झाल्यागत समाधान वाटू लागलें.

सागराच्या किनाऱ्यावर च 'सर्किट हाऊस' मध्यें चार पांच दिवस राहायचे होतें. नंतर इथून दोन मैलावर असलेल्या सर्वोदय संमेलनाच्या स्थानावर जायचें होतें. ह्या च सर्किट हाऊसमध्यें, ज्या खोलींत रवींद्रनाथ टागोर राहिले होते त्या च खोलींत, बाबांचा निवास होता. दिवसभर सागराचें भव्य दर्शन व्हायचें. त्याची ॐकाराची गर्जना कानांशीं खेळायची. सागराच्या काठीं बसून त्याच्या लाटांचें नयनमनोहर नृत्य पाहतांना वाटे जणू वेदान्ताचे प्रायोगिक पाठ तो शिकवत आहे. एक एक लाट उसळायची आणि निनाद करून पुनः सागरात लीन व्हायची. चैतन्यसागरात हि

अशी च मानवरूपी लाट उसळते आणि मोठमोठीं कामें करून पुनः त्यात च विलीन होऊन जाते. सागर सत्य आहे, लाटा मिथ्या आहेत. परंतु त्या सागराहून भिन्न नाहींत. कुठली हि लाट उठो वा नाहींशी होवो, त्या 'आपूर्यमाण अचलप्रतिष्ठम्'मध्यें काहीं च बदल होत नाहीं.

आत्मज्ञानाचें विद्यापीठ असलेल्या या क्षेत्रात सागराकाठीं रोजची प्रार्थनासभा व्हायची. सागराच्या कल्लोळात बापाचा आवाज जणू पलीकडच्या तीरावरून येत आहे असा भास होत होता. एक काळ होता, पूर्वेकडे ज्ञानाचा उदय झाला होता व त्याच किरण साऱ्या जगतात पोहोचले होते. रवि ठाकुरानीं म्हटलें आहे 'प्रथम सामरस तव तपोवने.' तुझ्या तपोवनामध्ये प्रथम साम ध्वनीचें गुंजन झालें होतें. बायबलमध्यें हि वर्णन आलें आहे कीं येशूच्या जन्मदिवशीं पूर्व देशाचे ज्ञानी मुनि आले होते. Wise Men of the East या प्राच्य देशातून साऱ्या जगात बौद्ध भिक्षु गेले होते. पण दंडशक्ति किंवा राजशक्ति घेऊन नव्हे तर ज्ञानशक्ति व बौद्धिक शक्ति घेऊन गेले होते. ख्रिस्ती लोक इथे आले, त्याच्या मागें पुढें अस्त्र, शस्त्र, सैन्य, व्यापार आला. जगन्नाथपुरीसारख्या अखिल भारताच्या स्थानच्या लोकाना 'हिंदी' समजत नाहीं तर ते एक दूषण होतें 'मातृभाषा' व 'राष्ट्रभाषा' हे दोन डोळे आहेत. ज्याला एका च भाषेचें ज्ञान आहे तो 'एकाक्ष' आहे. 'संस्कृत' तिसरा नेत्र आहे. जनसेवेकरिता मातृभाषेचें ज्ञान, देशाभिमानाकरिता हिंदी भाषेचें ज्ञान, धर्मतत्त्वज्ञानाकरिता संस्कृत भाषेचें ज्ञान आवश्यक आहे.

पुरीचें माहात्म्य वर्णन करताना बाबा सागत होते– शंकराचार्य, भगवान् बुद्ध, महात्मा कबीर, रामानुज, महावीर, चैतन्य महाप्रभु या सर्वांनीं सागराच्या तीरावर येऊन धर्माची पताका फडकावणें आपलें जीवितकार्य मानलें होतें गुरु नानक हि इथें आले होते परंतु त्याना जगन्नाथाच्या मंदिरात प्रवेश मिळाला नाहीं. मुक्त आकाशाखालीं उभे राहून परमेश्वराची आरती गाण्यास त्यानीं आरंभ केला 'गगन मे थाल रविचंद्र दीपक बने' 'मी त्या परमेश्वराचा दास आहें, जो जगाचा नाथ आहे. चंद्र, सूर्य हे दीपक आहेत. आकाश हें ताट आहे. पृथ्वी परमेश्वराचे आसन आहे.' बापू इथें येऊन गेले

होते. इथून च त्यानीं हरिजन पद यात्रेला आरंभ केला होता. नैतिक शक्ति वाढवून देशाच्या प्राचीन गौरवाचें पुनरुत्थान करण्याचा संदेश देऊन भाषण संपलें.

दुसरे दिवशीं सुप्रभातीं जगन्नाथाच्या दर्शनाकरिता बाबा बाहेर पडले. आमच्या टोळींत ' फ्रान्स ' होती. मनाच्या परावर बसून मी इतकेच भूत काळात गेलें. बिहारच्या प्रसिद्ध वैद्यनाथधामाच्या मंदिरात आम्ही असेंच दर्शनाला जात होतों. हरिजनाना प्रवेश नाहीं त्या देवळात बाबा जात नाहींत. ' ज्या देवळात हरिजनाना मज्जाव आहे त्या देवळातील मूर्ति प्राणहीन होते.' परंतु त्या दिवशीं तेथील पंड्याच्या प्रमुखाने निमंत्रण दिले. त्यात लिहिले होतें, ' आमच्या मंदिरात हरिजनाना प्रवेश आहे. आपण अवश्य यावें.' त्याप्रमाणें हरिजनाना घेऊन सायंकाळच्या गंभीर प्रहरीं वेदांतील महादेव सूक्ताचें मनोमन उच्चारण करीत बाबा महादेवाच्या दर्शनास निघाले. मंदिराच्या बाहेर व आत आवारात असंख्य लोक खचाखच उभे होते. मंदिराच्या मुख्य द्वाराजवळ बाबा पोहोंचले. ' धर्म की जय हो ', ' अधर्मका नाश हो ' च्या घोषणा सुरू झाल्या. बाबानीं मंदिराच्या प्रांगणात प्रवेश केला. दोनचार पावलें पुढे होतात न होतात तों च ' अधर्म का नाश हो ' च्या बरोबरच ' अंदर मत जाइये, स्वामीजी ! अंदर मत जाइये ' च्या आरोळ्या ऐकूं आल्या. 'धर्म की जय हो' चा अर्थ तत्क्षणीं उलगडला. तेवढ्यात गडबड झाली. कंदिलाच्या मिणमिणत्या उजेडात स्पष्ट कांहीं दिसलें नाहीं. बाबा एका उच्चवस्थावर चढले आणि लोकाना शांत करण्याचा प्रयत्न करूं लागले. मी आत जात नाहीं असें हि ते सांगू लागले पण त्या कल्लोळात कुणाला त्याचे शब्द ऐकूं येईनात. सेवकानीं बाबाना घेरलें. बुक्क्याचा व लाठ्याचा हि मार सुरू झाला. तो मार शांतपणे स्वतः झेलत यात्रीदलातील मंडळींनीं बाबाना मंदिराच्या बाहेर आणले. मग सारें शांत झालें. अगदीं आकस्मिक घडली सारी घटना. पण रामदेवबाबू म्हणत होते, " आज तर भीमाला बकासुर मारीत आहे असें वाटत होतें. " इतर सारे सेवक म्हणत होते, ' आश्चर्याची गोष्ट म्हणजे आम्हाला त्या पंड्याचा यत्-किंचित् हि राग आला नाहीं.' बाबाच्या उजव्या कानावर थोडा मार बसला होता. बाबानीं म्हटलें, 'मला हि थोडा प्रसाद मिळाला.' गुजराथच्या

राजेंद्रला जबरदस्त मुका मार बसला होता पण तो हसत इतराच्या सेवेंत मग्न होऊन गेला होता बिहारच्या नदकिशोरभाईंना बराच मिळाला होता. चद्रसेनभाई तर तीन दिवस बेशुद्ध होते.

स्वागत करण्याकरिता प्रवेशद्वाराजवळ आलेल्या पुजाऱ्याना बाबा म्हणत होते, "आमच्याबरोबर एक परदेशी महिला देखील आहे. माझी अशी पूर्ण श्रद्धा व विश्वास आहे कीं ती आमच्यासारखी च शुद्ध व निर्मळ हृदयाची आहे. तिला जर आत प्रवेश नसेल तर मला हि दर्शन केल्यावाचून परत जावें लागेल" पड्यानीं हात जोडले. म्हणाले, "परधर्मी स्त्रीला मदिरात प्रवेश मिळू शकत नाहीं" बाबानीं भक्तिभावानें पड्याना नमस्कार केला व त परतले. सारा दिवस त्याच चितन सुरू होतें

सध्याकाळीं धर्माच्या मूलतत्त्वाच विवेचन करताना बाबा म्हणाले, "मीं ल्हानपणापासून हिंदु धर्माचें सतत अध्ययन केले आहे. माझे नम्र निवेदन आहे कीं, हिंदु धर्माला मी ज्या अर्थानें समजतों आहें, त्यानुसार आचरण करण्याचा मीं नित्य प्रयत्न केला आहे. त्या फ्रेंच भगिनीला बाहेर ठेवून मी मदिरात गेलो असतों तर तो एक मोठा अधर्म च झाला असता त्यानीं आम्हाला प्रवेश दिला नाहीं त्याच्याबद्दल माझ्या मनात कुठल्या हि प्रकारचा न्यूनभाव नाहीं त्याना दु ख झालें असेल याची मला कल्पना आहे. पण ते सरकारवश होते त्यामुळे त्याचा नाइलाज होता. मला एवढें च म्हणायचें आहे कीं आपल्या धर्माच्या दृष्टीनें ही एक अतिशय दु खदायक घटना आहे.

"भागवतधर्मात तर असें सांगितलें आहे कीं, ज्याच्या हृदयात ईश्वराची भक्ति आहे तो ईश्वराचा लाडका आहे. मग तो कुठल्या हि जातीचा, धर्माचा का असेना! हें हि लक्षात घेतलें पाहिजे कीं ह्या काळात प्रत्येक धर्माची कसोटी होणार आहे आपल्या धर्माला जेलसारखें करण्यानें धर्माची फार हानि होईल. नित्य बदलणाऱ्या काळाबरोबर धर्माचें बाह्य स्वरूप हि बदललें पाहिजे उदारता म्हणजे हिंदुधर्माचा प्राण आहे. सनातन्यानीं सनातन धर्माचें जितकें नुकसान केलें आहे तितकें क्वचित् च कुणीं केलें असेल मी तर असें म्हणतों कीं, हिंदुधर्माची प्रतिष्ठा आणि बचाव गाधीजींनीं जितका केला तितका गेल्या एक हजार वर्षांत दुसऱ्या कोणीं

केला नसेल. पण सनातनी हिंदु त्याना धर्मविरोधी व स्वत ला धर्मरक्षक समजत.

"ज्या हिंदु धर्मांत परस्परविरोधी सहा सहा दर्शनें आहेत, ज्यात द्वैत-अद्वैताला आपल्या पोटात सामावून घेतले आहे, ज्यात भिन्न भिन्न प्रकारच्या देवताच्या पूजला स्थान दिलें गेलें आहे आणि कुठल्या हि आचाराचा आग्रह नाहीं, त्यापेक्षा उदार दुसरा कुठला धर्म असू शकेल? अशा हिंदु धर्माला आपण सकुचित केलें तर त्यात देशाचे नुकसान आहे. ह्यावर तुम्ही सारे वारकाइनें चिंतन करा. मला आज फार मोठा लाभ, सौभाग्य, मिळालें होतें मीं मदिरात प्रवेश करण्याच नाकारुन मी मला मिळालेल्या एका फार मोठ्या भाग्याला मुकलों आहें हा मोठा च त्याग आहे. एका श्रद्धाळू माणसाला मदिरात प्रवेश करू दिला नाहीं ही घटना मी देवाच्या दरबारात निवेदन करू इच्छितों."

या विषयावर अधिक विवेचन करताना पुढील दोन दिवसाच्या प्रवचनात ते म्हणाले, "खरी धर्मदृष्टि कोणची आहे ह्याचा आम्हाला विचार केला पाहिजे आरभींच्या काळात धर्माच्या सगोपनाकरता कांहीं विशिष्ट मर्यादा ठेवल्या गेल्या असतील तर ती गोष्ट स्वाभाविक च आहे. परतु हिंदुस्थानाचा भक्तिमार्ग बरा च विकसित होऊन गेल्यानतर आज आपल्या उपासना स्थानावर कुणाला अडवणें हा धर्मावर एक प्रहार च होय. उपासनेचे भिन्न भिन्न प्रकार असतात. म्हणून आपली दृष्टि समन्वयाची असली पाहिजे"

रोज समुद्रात स्नान करणें, समुद्रातून वर येणाऱ्या सूर्याच्या पिवट पिवळ्या किरणाचा समुद्राच्या लाटाशीं चालणारा खेळ पाहणें, हा आमचा नित्यक्रम च होऊन बसला होता. एक दिवस बाबा सागराच्या दर्शनाकरिता काठावर उभे होते उसळणाऱ्या लाटा त्याच्याजवळ पोहोंचण्याचा प्रयत्न करीत पण बाबा दूर असल्यामुळें त्याचे मनोरथ अपूर्ण च राहत. ह्या च सागरानें भगवान् बुद्धाचा अहिंसेचा सदेश ऐकला होता. जलमार्गानें स्केला जाणाऱ्या सघमित्रेच्या नौकेला आपल्या लाटावर झेललें होतें. शकराचार्याच्या अद्वैताचें गुह्यगुजन ऐकलें होतें कबीराच्या दोह्याना साथ दिली होती. नानकाच्या भजनाला ताल दिला होता. आणि अगदीं अलीकडे गाधीजींच्या चरणचिह्नावर आपली श्रद्धाजलि अर्पण केली होती. मग विनोबाना च

तेवढा तो दूर का ठेवील ? शेवटीं एक भली मोठी लाट धावत धावत आली आणि त्याच्याजवळ पोहोचली. विनोबा बरे च मागें हटले. पुनः दुसरी लाट आली आणि दूर सरणाऱ्या विनोबाचे पाय भिजवून ती हसत हसत परत गेली.

समेलनाकरिता देशाच्या कानाकोपऱ्यातून सेवक येऊं लागले होते. सर्व-सेवासंघाचे सभासद, इतर पुढारी व भूदानकार्यकर्ते हजर झाले. सर्किट हाउसपासून दोन मैल दूर वाळूच्या मैदानात गवताच्या ल्हान ल्हान झोंपड्यांची छोटीशी वसाहत वसविली होती. मध्यभागीं एक मोठा मंडप होता. समेलनाची कारवाई, प्रार्थना, कताई इथें होत असत. नानाच्या झोंपडींत उत्कलच्या सौम्य कलेचें दर्शन होत होतें मातीचीं ल्हान ल्हान नोळरीं टांगलीं होतीं. त्यावर चित्रविचित्र रंगाचे हात फिरले होते. भिंतींवर हस्तकलेचा नमुना दाखविणाऱ्या ल्हान ल्हान वस्तु होत्या. समेलनात परिचित, नव परिचिताना नमस्कार ठोकावे, बाबाच्या शब्दाच्या गती-बरोबर 'पेन 'ला पळवावें, तासन् तास टाइपरायटरच्या डोक्याशीं बसावें असा कार्यक्रम सुरु होता. तमीळनाडचे जगन्नाथजी व कृष्णम्मा म्हणत होतीं, "आता तर वळले बाबा दक्षिणेकडे ! तुम्हाला हि आता तमीळ-नाडमध्यें यावें च लागेल." उत्तर बिहारमध्यें बाबानीं हिमाल्याला शेवटचा नमस्कार केला व उत्तर दिशेकडे पाठ फिरविली याचा उत्कट आनंद तमीळनाडच्या या उत्साही जोडप्याला झाला होता. मलबारमधली बाबाची लाडकी व कर्तबगार शिष्या राजम्मा आणि परदेशाहून उच्च शिक्षण घेऊन आलेले पण त्यात रमू न शकणारे चेरिअनभाई पुढची योजना आखीत म्हणाले, 'मग कन्याकुमारीचें दर्शन घडेल.' नारायण, प्रबोध, राजेंद्र, बापूच्या गुजराथमध्यें कातींचीं मुळें कशीं खोलवर रुजत आहेत तें सांगत होते, तर मध्यप्रदेशाचे पराक्रमी चंदुभाई व गोविंदराव 'घरातल्या काती'चीं बातमी देत होते. एखाद्या धबधब्याचा प्रवाह पाठीवर यावा तसा धक्का बाबूजी ( करणभाई ) कडून मिळाला तर चाचाजी ( ध्वजाबाबू ) कडून 'रसगुल्ला'. चारुबाबू विचारत होते, 'बंगला गीत आटचताय ना ?' महाराष्ट्राचे एक बंधु विचारत होते, " हिंदुस्थानातल्या निरनिराळ्या प्रातान हिंडतेस, मराठी तर विसरली नाहींस ना ? " गुरुजनाचे आशीर्वाद मिळून,

सज्जनसंगतीचा लाभ घेत, प्रिय साथींशीं हास्यविनोद करीत संमेलनाचे दहा दिवस दहा क्षणासारखे कसे उडून गेले कळलें देखील नाहीं.

२५ तारखेला सकाळीं संमेलनाचा आरंभ झाला. भूत, वर्तमान आणि भविष्य यामध्यें विहार करीत, कधीं अहिंसेच्या तत्त्वाच्या सखोल चिंतनाकडे दृष्टि वळवीत, कधीं आपल्या अंतरंगाचें निरीक्षण करीत तर कधीं देशाच्या वर्तमान स्थितीचें विवेचन करीत बाबांनीं प्रकट चिंतन केलें. 'अंतिम आदर्शाच्या दृष्टीनें समाजांत दंडाचें स्थान काय राहील?' या-विषयीं समाजांत भिन्न भिन्न विचार आहेत. आजच्या परिस्थितींत अहिंसक समाजरचनेंत हि दंडशक्ति राहील, पण त्यांत सर्वांत मोठी संस्था सेवासंस्था राहील. सत्तेचें स्थान गौण राहील. या दृष्टीनें पाहू जाता मनांत एक असा विचार येतो कीं, अहिंसक समाजरचनेकरता या देशांत सर्वांत अधिक बाधक आजची कॉंग्रेस तर होणार नाहीं ना? देशांत आज ती च सर्वांत मोठी संस्था आहे व ती च आज निवडणूकप्रधान संस्था झाली आहे. निवडणुकी लढवायच्या, त्याद्वारें सत्ता मिळवायची, सत्तेच्या द्वारें सेवा करायची, हा तिचा कार्यक्रम आहे. बापूच्या कल्पनेनुसार स्वराज्यानंतर कॉंग्रेसचें 'लोकसेवकसंघा'त रूपांतर झालें असतें तर समाजांत सेवा सार्वभौम झाली असती आणि सत्ता सेविका झाली असती.

अतिशय मंद गतीनें, समाजरचनेंत एकदम फारसा फरक न करतां, काम करायचें अशी अहिंसेची व्याख्या करणें हें अहिंसेच्या दृष्टीनें धोक्याचें ठरेल आणि ती च व्याख्या हिंसेच्या दृष्टीनें उपयुक्त ठरेल. बुद्ध भगवानानें अतिशय स्पष्ट शब्दांत हा विचार मांडला आहे. ते म्हणतात,

'तंद्रित कुर्वत पुण्यं पापे हि रमते मनः।'

'आळशी होऊन मंद गतीनें पुण्य आचरण केलें तर पाप शीघ्र गतीनें वाढतें.' अहिंसेंत तीव्र वेग असायला पाहिजे.

लोकशाहींत सत्याग्रहाला स्थान नाहीं असें म्हणणें हें देखील अहिंसेच्या दृष्टीनें धोक्याचें आहे. सत्याग्रहाचीं दोन रूपें आहेत. अभावात्मक व विधायक. आज आपली सर्व शक्ति पणाला लावून भूदानाचें तंत्र अजमावून पाहायची वेळ आली आहे. आपल्या स्वामीजवळ, म्हणजे च जनतेजवळ, जाऊन हें तत्त्वज्ञान समजावून सांगायचें आहे.

समेलनाचें अध्यक्षस्थान गुजराथचे महान् तपस्वी रविशंकर महाराज यानीं ग्रहण केले होतें. भूदानयज्ञाच्या होमकुंडात जीवनाची आहुति अर्पण केल्यापासून महाराजाच्या पायाना विसावा माहीत नाहीं बहात्तर वर्षांच्या ह्या वृद्धाला क्रातीने चिरतरुण केले आहे. ते म्हणतात, "भूदानाचें काम हातीं घेतल्यापासून मी तरुण झालो." महाराजाना गुजराथीशिवाय दुसरी कुठली च भाषा चागली येत नाहीं. ते आपल्या भाषणात म्हणाले, "मला हें स्थान ग्रहण करण्याची आज्ञा झाली तेव्हा मला वाटले कीं ह्या स्थानावर बसण्याची माझी लायकी आहे का? मी तर आपला अडाणी खेडवळ माणूस. पण थोडा विचार करता च माझ्या ध्यानात आलें कीं, नाहीं! मी लायक आहे. कारण हें 'सर्वोदयसमेलन' आहे. जे निरक्षर, दरिद्री, मागासलेले आहेत अशाना सर्वोदयसमाजात पुढें आणलें जातें."

समेलनाची कारवाई तीन दिवस चालू होती. राष्ट्रपति राजेंद्रबाबूंनीं सर्वोदयाच्या सदेशवाहकाना आशीर्वाद दिला. जयप्रकाशजी व शंकरराव देव इ० नेत्यानीं तरुणाना उत्स्फूर्त केलें. श्री देवरभाईनीं थोडें सहचिंतन केलें. शिवाय इतर अनेक ल्हानथोर सेवकानीं आपआपल्या अनुभवाचीं शब्दचित्रें उभीं केलीं. उगवत्या सूर्याच्या देशातून जपानमधून आलेल्या बौद्ध भिक्षूची आध्यात्मिक भूक या क्रातीच्या दर्शनानें शमली होती. शेवटच्या दिवशीं केलेल्या छोट्याशा भाषणात ते म्हणाले, "तुम्हीं अहिंसेनें स्वराज्य मिळविलें ही घटना साऱ्या जगाला मार्गदर्शन करणारी आहे. आता भारताला विनोबाशारख्या साधूचें नेतृत्व मिळालें आहे. त्यानीं भूमिदानाची राष्ट्रव्यापी चळवळ सुरू केली आहे. बुद्धत्व प्राप्त करण्याकरिता बुद्ध भगवानानें दानाचा च मार्ग स्वीकारला होता. विनोबाच्या या भूमिदानात दान देणारा व दान घेणारा दोघाना हि एक प्रकारचें आध्यात्मिक समाधान मिळतें. कायद्यानें जमिनीचें वाटप केलें तर ह्या आध्यात्मिक आनदाला आपण पारखे होऊ."

समेलनाच्या अतिम प्रवचनात बाबाच्या मुखातून भविष्यसूचक उद्गार निघाले. नवचैतन्य अगीं खेळणारे ते शब्द युद्धल्या मत्रानीं अभिभूत झाले होते कोण जाणे! 'रक्ताचा शेवटचा बिंदु सांडेपर्यंत लढू, सर्वस्व पणाला लावून शत्रूला हटवू.' या शब्दात हिंसक सेनेचा सेनापति आपल्या सैन्याला

आदेश देतो असें ऐकलें होतें. त्यानें शिपायाचे बाहु स्फुरण पावू लागतात हें हि माहीत होतें. पण हें अहिंसक युद्ध होतें. अन्याय, विषमतेविरुद्ध रण शिंग फुंकलें गेलें होतें. या लढाईत रक्ताचे पाट वाहणार नव्हते. काळोखात क्षणभर चमकून जाणाऱ्या विद्युल्लतेचें हे काम नव्हतें. अखंड तेवत राहणाऱ्या पणतीचे हें काम होतें त्याकरता पराक्रम हवा होता, पुरुषार्थाची गरज होती, धाडस हव होतें, अखंड जळायचें होतें. त्याग च करावयाचा होता — तो हि हसत हसत च

बाबा म्हणत होते, "मानव स्वैर हिंसेतून व्यवस्थित हिंसा अर्थात् दंडशक्ती पर्यंत येऊन पोहोचला होता. आता तो अतिहिंसेपर्यंत पोहोंचला आहे. सामूहिक–मानव–मानसयंत्र असें नाहीं कीं कोणी व्यक्ति त्याला थोपवू शकेल अथवा मागें ढकलू शकेल. म्हणून आता त्याला पुढें च गेलें पाहिजे अर्थात् च त्याला आता आपलें रूप एक तर अहिंसेत विसर्जित करावें लागेल किंवा त्याहिपेक्षा अधिक विकराळ स्वरूप धारण करून मनुष्यसमाजाची समाप्ति करून कृतकार्य व्हावें लागेल. तेव्हा आता अशी वेळ आली आह कीं, आपल्याला शासनमुक्त समाज निर्माण करण्याकरिता अतिशय उत्साहानें कबर कसली पाहिजे. आपण साऱ्यानीं हिंमत बाधली तर १९५७ पर्यंत साऱ्या जगात शासनमुक्त समाजाची स्थापना का होऊ शकणार नाहीं ?

"जगात आज एक फार मोठी प्रेरणा काम करीत आहे. त्याकरिता आपण निमित्त बनलों आहोंत. ॲटम बॉम्बनें हें सिद्ध केलें आहे कीं, अणूमध्यें भयंकर संहारक शक्ति आहे. एका क्षुल्लक भौतिक परमाणूमध्यें जर एवढी शक्ति आहे तर चैतन्य परमाणूमध्यें, ज्ञानपरमाणूमध्यें, केवढी शक्ति असेल ! भूदानयज्ञाकडे तुम्ही संकुचित दृष्टीनें पाहू नका, व्यापक दृष्टीनें पहा मग तुमच्या ध्यानात येईल कीं, जगात एक फार मोठा खेळ सुरू आहे त्या खेळाचा मध्यबिंदु पुन एकवार भारत होऊ पाहत आहे

"सत्याग्रहात सौम्यातून तीव्र ह्या परिभाषेंत विचार करावयाचा नाहीं. ती तर हिंसेची प्रक्रिया आहे आपल्याला असा विचार केला पाहिजे कीं सौम्य सत्याग्रहानें काम झालें नाहीं तर सौम्यतर उपाय शोधला पाहिजे त्यानें सत्याग्रहाची शक्ति वाढेल. त्यानें हि काम झालें नाहीं तर सौम्य-

तमाचा शोध केला पाहिजे. भावनेनें भावित होत, सूक्ष्माहून सूक्ष्म होत, तो अधिकाधिक परिणामकारी होत जातो."

"तुम्ही गावागावात जा लोकाना समजावून सागा कीं, तुमचें दानपत्र म्हणजे विश्वशातीकरता मत (vote) आहे. हें जें काम आम्ही करीत आहोंत, तें केवळ येथील भूमिसमस्या सोडविण्याकरिता नसून जगातील सारीं 'राज्ये' नाहींशीं करण्याकरिता करीत आहों कारण हिंसेला मर्यादा घालण्याच्या कामात राज्यसस्था यशस्वी होऊ शकली नाहीं. थोडक्यात, हें कार्य जगात अहिंसेची प्रतिष्ठापना करणारें, विश्वशाति स्थापन करणारें, असें आहे. विश्वशातीकरिता तुम्ही जमीन व सपत्तीचा सहावा भाग देऊ शकणार नाहीं का? म्हणून ह्या वेळीं तुम्हीं आपलीं सर्व लहानमोठीं कामें सोडून या कामात आपली पूर्ण शक्ति लावा."

समेलनाच्या दिवसात सतत सभा आणि चर्चा चालू होत्या. निरनिराळ्या प्राताच्या कार्यकर्त्यांच्या बैठकी, सर्वसेवासघ, तालिमी सघ, खादी बोर्ड, दारूबदी कमिटी इत्यादींच्या सभा बैठकी बाबाच्या उपस्थितींत झाल्या. खादी बोर्डाच्या सभेंत बाबानीं 'अबर चरख्या'ला प्रोत्साहन देण्यास सागितलें. दारूबदी समितीला ते म्हणाले, "भारतात दोन किंवा पाच वर्षांत पूर्ण दारूबदी व्हायला पाहिजे."

एका सभेंत बगालच्या कामाचा उल्लेख करून ते म्हणाले, "बगालचें स्वागत, सगीत, लोकाचा अपार उत्साह इत्यादि पाहून आमच्या या मुली मुग्ध झाल्या होत्या पण आता कुठे त्याच्या ध्यानीं आलय कीं तिथें सारें काम शब्दाचें च होतें.

'बोलाची च कढी, बोलाचा चि भात, जेवूनिया तृप्त कोण झाला?'

तेथील जनता हें तत्त्वज्ञान ग्रहण करण्यास अतिशय उत्सुक आहे. वातावरण अनुकूल आहे. तरी हि जास्त काम होऊ शकलें नाहीं, कारण कार्यकर्ते कुणी च हिंडले नाहींत. एकटे चारुबाबू तेवढे सतत यात्रा करीत आहेत.

"या यात्रेंत माझें पोट फार दुरुस्त असे. यात्रा कांहीं दिवस बंद करण्याचा प्रश्न निघाला. मीं विनोदांत म्हटलें, 'पोट दुरुस्त असलें तरी पाय तर चालू शकतात ना?' आतून मला वाटत होतें कीं पाय तुटून पडत नाहींत तोंवर यात्रा खंडित होणार नाहीं मनात विचार आला, प्रथम मरावें आणि मग खालीं पडावें." ...बाबाच्या ह्या तीव्रतेचा स्पर्श अनेक हृदयांना झाला.

रविशंकर महाराजन व उत्तर प्रदेशाचे बाबा राघवदासजी यांनीं दोन वर्षे अखंड पदयात्रा करण्याचा संकल्प केला.

संमेलनात ज्याच्या त्याच्या तोंडीं एक च भाषा ऐकू येई: 'यदा संमेलनाची व्यवस्था फार च चांगली आहे बुवा!' सुमारें सहा हजारांची व्यवस्था उत्तम राहावी म्हणून आमच्या चुनीअप्पा, बोऊ, नुमा सान्यांना च रात्रंदिवस अंग मोडून मेहनत करावी लागली होती. पहाटे तीनपासून पदर बांधून त्या तयार असत तर शब्दशः क्षणाची हि उसंत त्यांना मिळत नसे. कुणी स्वयंपाकात, कुणी सफाईत, कुणी नास्तापाणी देण्यात, मग्न असत. जेवणाचा मंडप रोज स्वच्छ राखलेला राही. कस्तुरबा केंद्राच्या सेविका व इतर स्वयंसेविका बोऊच्या मार्गदर्शनाखालीं दिवसभर खपत होत्या. मोठ्या प्रेमानें व आग्रहानें त्या साधें च पण रुचकर जेवण वाढीत. नुमा, बोऊ प्रत्येक पंगतींत हिंडून आगत्यानें कुणाला हवें नको विचारीत. तें दृश्य पाहून प्रत्येकाला वाटे कीं आपण घरीं च जेवीत आहोंत. आई आग्रह करते आहे, भावजय हळू च पानात एखादा पदार्थ वाढून जाते आहे तर मावशी म्हणते कीं, 'खूप काम करायचंय तुम्हाला. कमी खाऊन कस चालेल!' एवढें सारें आटोपून चुनीअप्पा कपाळाचा घाम पुसत रात्रीं आठ साडे आठला आमच्या झोपडींत येत नी म्हणत, 'अग! जरा बाबाच्या अमुक भाषणाची रेकॉर्ड ऐकवतेस? मला तें 'ग्रामसेवक'ला पाठवायचंय.' अन् मग तितक्या च तन्मयतेनें त्या लेखणी चालवीत. त्यांच्या चेहऱ्यावरचें हास्य मावळलें नव्हतें, विनोद पळाला नव्हता. नुमा स्वयंपाकघरात भाजी कशी करायची तें सांगून रात्रीं सांस्कृतिक कार्यक्रम कोणता ठरवायचा ती योजना हि आखत. बोऊ तर तहानभूक विसरल्या च होत्या मंगलामावशी, सुमित्राभाभी ह्या सान्यांचें दुरून दर्शन तेवढें होई इतक्या त्या कामात दंग

होत्या. तिकडे बाप्पा, भाई, बापी आलेल्या प्रत्येक लहान थोर पाहुण्याचे स्वागत करीत, झाडू टोपली घेउन सफाईच्या टोळींत सामील होत. बुलुभाई सारें ऑफिस हि सभाळीत. ते सारे अखड, अविरत कामाला जुपले होते. पण थकवा वा कटाळा कुणाच्या चेहऱ्यावर दिसत नव्हता. कुठले हि काम करताना ते हलक्या दर्जाचे, कमी किमतीचे त्याना वाटत नव्हते. नबबाबू इथून तीस मैल असलेल्या भुवनेश्वरला जाऊन असेंब्लीचे काम आटोपून परत येत नी इथे येता च हातीं झाडू घेत. समानतेचीं तत्वे इतरत्र ऐकावींत नी उत्कलमध्ये प्रत्यक्ष पहावींत!

बाबा तर म्हणाले, "ओरिसाचे लोक च बहादूर! नाहीं तर आपली यात्रा ज्या प्रातात सुरु आहे त्या च प्रातात एवढें मोठे समेलन घ्यायचें व तें हि इतकें सुव्यवस्थित! फार मोठी शक्ति लागते त्याला."

समेलनातली एक फार महत्त्वाची गोष्ट म्हणजे साहित्यिकाची सभा. बिहारमध्यें एका सभेत बाबा साहित्यिकाना म्हणाले होते, "मी कुणाला कधीं बोलावीत नाहीं जिथें 'मधु' असेल तिथें भ्रमर सहज च आकृष्ट होतात." बिहारचे प्रसिद्ध साहित्यिक श्री. रामवृक्ष बेनीपुरीजी हे त्या भ्रमरावैकीं एक आहेत त्यांनीं 'मधुरस' चाखला आहे. २६ तारखेची गोष्ट. पहाटे तीन पासून अखड सभा, चर्चामडळें, भेटीगाठी चालल्या होत्या. रात्रीचे नऊ वाजून गेले पण साहित्यिकाच्या मेळाव्यात बाबाचा सारा थकवा दूर झाला. श्रमपरिहार झाल्यागत ते दीड तास बोलत होते बाबाचें हें भाषण ऐकून साहित्यिक म्हणाले, 'हा च एक असा माणूस आहे कीं, जो आम्हाला समजू शकतो. आमची किमत करतो.'

भाषणाच्या आरभीं च त्यानीं तुकोबाचें स्मरण केलें. 'तुकाराम म्हणतात, देवा! तुझ्या नामाचा महिमा तुला ठाऊक नाहीं, आम्ही तो जाणतों.' त्या च प्रमाणें साहित्यिकाचा महिमा ते स्वत. जाणत नाहींत. साहित्याची व्याख्या करताना ते म्हणाले, 'साहित्य म्हणजे अहिंसा. उत्तम साहित्याचे लक्षण हें च आहे कीं त्यापासून विविध बोध मिळतो. साहित्यात अशी विलक्षण शक्ति आहे कीं त्याने 'श्रमा'चा 'शम' होऊन जातो. मी तुम्हाला सहयोग मागतों याचा अर्थ हा नाहीं कीं भूदानयज्ञावर तुम्ही काहीं

लिहावें. तर तुम्हीं माझ्याबरोबर सहचिंतन करावें असें मला वाटतें. जो स्वत च्या रसात इतराना भागीदार करतो तो च रसिक. म्हणून मी जेव्हा साहित्यिकाना आमंत्रण देतों तेव्हा हें च म्हणतों कीं, मी एकटा च रस चाखतों आहें हें बरें नव्हे. तुम्ही सारे रसिक आहात, तेव्हा तुम्ही देखील त्यात भाग घ्या. एकदा तुम्हीं ह्यात भाग घेतल्यानंतर मग तुम्ही काव्य लिहा अथवा नका लिहू, तुमच्या भाग घेण्यानें च मला फार मदत होईल. सहज भावानें हृदयाशीं हृदय जोडलें जावें, हे च मला हवें आहे. "



## : ४३ :

## वानरसेनेचा पराक्रम

बेलदळ, चर्डीब्रह्मपूर, मलाग्राम
१–३ एप्रिल '५५

आज रामनवमी ! चार वर्षांपूर्वी ह्या च दिवशीं बाबानीं आपल्या लाडक्या भूमीची, तेलंगणाची, यात्रा सुरु केली होती. पुरीच्या सर्वोदय-समेलनात त्यानीं सागराच्या ॐकाराच्या गर्जनेहून किती तरी पटींनीं उच्च स्वरात विश्वशातीचा उद्‌घोष केला होता. आज पहाटेच्या काळोखात यात्रा सुरु करण्यापूर्वीं त्यानीं दिलेल्या लहानशा भाषणाद्वारे जागतिक शातीच्या चाहत्याना, स्वतंत्र लोकशक्तीच्या उपासकाना व शासनमुक्तीच्या शोधार्थ प्रयत्न करणाऱ्याना एक आदेश मिळाला "आता दोन वर्षें तेवढीं उरलीं आहेत. क्रातिकार्यात एकाग्रतेनें शक्ति लावण्याकरिता तुम्ही हातातील सारीं लहानसहान कामें सोडून या. साऱ्या जगाला मी हें आवाहन करीत आहें. तुम्ही गावोगाव जा. जनतेला समजावून सागा कीं, "मित्रानो, तुमचे दानपत्र म्हणजे जागतिक शातीकरता मतदान होय."

'कबीरा खडा बाजारमें लिये लुकाटी हाथ,
जो घर फुंके अपना चले हमारे साथ '।

'पेटलेलें लाकूड घेऊन मी जगाच्या बाजारात एकटा उभा आहें. स्वत:चें घर पुढून टाकण्याची ज्यांची तयारी असेल त्यानें माझ्या मागोमाग यावें' असेंच जणू बाबाना सुचवायचें होतें. तें ज्वलंत आव्हान करून त्यांनीं पुरीच्या पावन क्षेत्राला अखेरचे प्रणाम केले अन् त्यांची यात्रा पुनः सूर्यनारायणाच्या अविरततेनुसार सुरू झाली.

दरवर्षीं संमेलन संपले म्हणजे यात्रेत पाहुण्यांची गर्दी होते च. आज तर त्यांची संख्या जवळ जवळ पंचाहत्तर होती. बाबाना कोणार्कचें सूर्यमंदिर पाहण्याची इच्छा होती म्हणून त्या दिशेनें जाणाऱ्या जवळच्या मार्गानें आम्ही जात होतों. हा सारा प्रदेश रेताड असल्यामुळे सर्व च तऱ्हेची व्यवस्था करणें कठिण झाले होतें. बेलदळला पाहुण्याकरता तंबू ठोकून बाप्पा आणि बुलुभाईंनी स्वत:च्या वळकट्या झाडाखालीं अंथरल्या. रणरणतें ऊन होतें, तें त्यांच्या गावीं च नव्हतें. आपली तमा न बाळगणाऱ्या तपोवृद्धाची प्रसन्नता व शांति पाहून सूर्यनारायणाला ईर्षा वाटली असावी. तो अधिक च प्रखरतेनें तळपू लागला. आज प्रत्येक जण दुसऱ्याला म्हणत होता, 'तुम्ही रहा हो तंबूमध्यें !' आणि स्वत: मात्र 'तरतल 'वास पत्करत होता.

समुद्रालगतचा प्रदेश असल्यामुळें 'झाऊ'चें वन चोहोंकडे होतें. त्याच्या पानांची सळसळ ऐकून वाटे समुद्र च गरजतो आहे. झाडाच्या छायेंत बसून जवळच्या काजूच्या झाडाकडे दृष्टि टाकीत आमचे काम सुरु होतें. संमेलनात बाबा तासन्‌तास बोलतात. ते सारें टाइप करताना एक च विचार राहून राहून मनात येतो– देवाने दिवस फक्त चोवीस तासांचा च का बरें करावा ?

मुक्कामीं पोहोंचता च गावचीं पोरें कधीं कधीं बाबाना गराडा घालतात. मग बाबांचा व त्यांचा मौजेचा संवाद चालतो. लहान मुलें भूदानाचा विचार चटकन् ग्रहण करतात असा नेहमीं अनुभव येतो. चंडीब्रह्मपूरला असें च झालें. बाबांनीं त्या मुलाना प्रश्न केला, "कशाकरता आलेंय् रे तुमच्या गावात ?" एकानें उत्तर दिलें, "आम्हाला माहीत आहे. तुम्ही जमीन मागण्याकरिता आला आहात." बाबांनीं पुन: विचारलें, "जमीन घेऊन मी काय करणार आहें ?" बरींच मुलें ओरडून सांगू लागलीं, "गरिबाना द्याल. ज्यांच्याजवळ जमीन नाहीं त्याना द्याल."

बाबा : तुम्हाला आवडतें का हें काम ?

सारीं मुलें एकदम म्हणू लागलीं, "हो हो तर !"

बाबा : मग तुम्ही असें करा. आपआपल्या घरीं जा आता आणि आपल्या आई-वडिलाना सागा, बाबा गरिबाकरता जमीन मागायला आपल्या गावात आला आहे, त्याला जमीन अवश्य दिली पाहिजे. पण हो ! एक गोष्ट लक्षात असू द्या. तुमचे आई-वडील तुम्हाला म्हणतील, 'बाळानो, आम्ही तुमच्याकरता च तर जमीन बाळगतों.' तर त्याना सागा, 'आमची काळजी करू नका. आम्ही सान्याच्या बरोबर काम करू व बरोबर च खाऊ.'

तें ऐकून मुलें चारी दिशाकडे पळत सुटलीं. *आणि काय आश्चर्य ! सध्या*-काळच्या सभेंत त्या बालवीरानीं आपआपल्या वडिलाचा हात धरून आणलें व त्याच्याकडून दान देवविलें. बाळ ध्रुवाच्या हट्टापुढें प्रत्यक्ष परमेश्वराला नमावें लागलें होतें आणि बाळकृष्णाच्या हट्टापुढें तर यशोदामाईचें काहीं च चालत नसे. बाबानीं या घटनेचा उल्लेख भाषणात केला. ते म्हणाले, "हीं लहान लहान मुलें आमचे स्वयसेवक बनले. त्यानीं आमची मागणी आपल्या वडिलाजवळ पोहोंचवली व जमीन मागण्याची हिंमत केली, ही मामुली घटना नव्हे. बालकाच्या मुखानें तर परमेश्वर बोलतो !"

पुरीला कार्यकर्त्याना व सेवकाना बाबानीं म्हटलें होतें, 'तुम्हीं विश्व शातीचे दूत आहात.' आता ते गावकन्याच्या हातीं जागतिक शातीची किल्ली देत होते. आज हृदय सकुचित झालें आहे. एका गावात *राहणाऱ्या शेजाऱ्यापाजाऱ्याचा एकमेकावर विश्वास राहिला नाहीं. एवढें च* नव्हे तर त्यामुळे एका देशाला दुसऱ्याची भीति वाटू लागली आहे. यावर इलाज एक च आहे. आपलें एक गाव म्हणजे एक कुटुब आहे असें गाव कऱ्याना वाटलें पाहिजे. देशोदेशींच्या सर्व लोकाना ही जाणीव व्हायला पाहिजे कीं हा आपला मानवपरिवार आहे. दोन्हींचा उपाय एक च. 'भूदान'. ग्रामशातीच्या पायावर विश्वकल्याणाचें मदिर उभें राहील. त्याचा कळस म्हणजे विश्वशाति."

नुकते च अमेरिकेहून परतलेले एक मद्रासी गृहस्थ विचारत होते, "विज्ञानात objective tests (वस्तुनिष्ठ कसोटी) असतात, तशा

आत्मज्ञानात असतात का?" बाबांनीं हंसत हंसत एक साधी कसोटी सांगितली. "एक थप्पड मारून पहा. राग आला तर समजा कीं हा आत्मज्ञानी नाहीं."

महाराष्ट्राचे तपोवृद्ध बाळूभाई मेहता आले होते. बाळूभाई बाबांच्या जुन्या मित्रांपैकीं एक आहेत. त्याच्याशीं चर्चा चालू होती. बाबा किंचित् उद्वेगानें म्हणाले, "हिंदुस्थानात गोळी चालायला च नको. आजकाल खुशाल गोळीबार करतात आणि त्याचा बचाव हि करतात. म्हणतात, राज्य चालविण्याकरता हें करावें च लागतें. ब्रिटिश सरकार देखील हें च म्हणत असे. एवढ्यासाठीं च का स्वराज्य घेतलें?"

मलाग्रामला दिवेलागणीला खूप जोराचें वादळ झालें. आकाशाच्या छत्राखालीं आम्ही जेवायला बसलों होतों. देवानें प्रेमानें पाठवलेले पावसाचे थेंब वरणभातात मिसळत होते. रात्रीं तर त्याचें प्रेम चांगलें च कोसळू लागलें. सारा दिवस मोठ्या ऐटींत झाडाखालीं राहणाऱ्यांना हि तंबूचा आसरा घ्यावा लागला. भगिनीवर्गाकरता दिलेला तंबू अतिशय लहान होता. मोठ्या प्रयासानें आम्ही साऱ्या हातपाय पोटाशीं घेऊन कशाबशा झोंपलों. पुण्याहून आलेल्या गुलबेन मेहताच्या पायाशीं माझें डोकें होतें तर दिल्लीच्या एका भगिनीच्या डोक्याशीं माझे पाय होते. यात्रेचे दिवस असावे आणि तिसऱ्या वर्गाच्या वेटिंग रूममध्ये उतारू झोंपले असावे असें वाटत होतें.



## : ४४ :

# सूर्योपासना

कोणार्क
४ एप्रिल '५५

कोणार्कचें सुप्रसिद्ध सूर्यमंदिर दुरून च दिसू लागलें. बाबा म्हणत होते कीं, हें मंदिर भारतातल्या सर्वश्रेष्ठ दहा बारा उत्तम कलाकृतींपैकीं एक आहे.

चौदाव्या शतकांत ह्या सूर्यमंदिराची स्थापना झाली. तें उभारण्याकरता बारा हजार शिल्पकार बारा वर्षें सतत काम करीत होते 'काला पहाड' नावाच्या एका धर्मांतर केलेल्या मुसल्मान राजानें मंदिराला उद्ध्वस्त करण्याचा प्रयत्न केला होता. त्यांत मंदिराचा वरचा भाग ढासळलेला आढळतो. आतली सूर्यनारायणाची मूर्ति आज अस्तित्वात नाहीं. पूर्वीं मंदिर समुद्रकाठीं होतें, आता समुद्र दोन मैल दूर मागे सरकला आहे. मंदिराच्या वरच्या भागातून समुद्राचें दर्शन होतें.

सूर्यमंदिराची रचना अद्भुत च आहे. एक भव्य रथ आहे, त्याचीं चोवीस मोठमोठीं चाकें आहेत रथाला समोर सात घोडे आहेत. आत सूर्यनारायणाचें स्थान आहे. रथाच्या चाकांत उतरलेली कला पहाणाऱ्याला मुग्ध करून टाकते घोड्याची ऐट नी थाट पाहून वाटलें, जणू दिव्य लोकांतून च ते अवतरले आहेत मंदिरावर मानवजीवनातल्या सर्व च घटना खोदल्या आहेत नर्तकींच्या भावपूर्ण मुद्रा, निरनिराळीं वाद्यें हातीं घेतलेले गायक गायिका सारे म्हणत होते कीं, आम्ही दगड नाहीं हं! तुझ्यापेक्षा अधिक सजीव आहोंत. तिथे काहीं अश्लील मूर्ति हि दिसतात त्यावर बरीच उलटसुलट टीका ऐकू येते नवग्रहाच्या नऊ मूर्ति अप्रतिम आहेत.

सकाळीं बाबा किती तरी वेळ मंदिर पाहत होते सारें सौंदर्य साकारलें होतें तिथ सायंकाळीं भव्य मंदिराच्या छत्रछायेंत सभा झाली. बाबांनीं आजच्या युगाच्या सूर्योपासनेचें शब्दचित्र उभें केलें. "मध्ययुगात सगुण ध्यानाची परंपरा चालली, त्यात सुंदर मंदिराची स्थापना झाली. पण आजची परिस्थिति फार च भिन्न आहे. त्या काळीं कदाचित् इतकें दुःख नसेल हि.

पण आज चोहोंकडे दुःख दिसत असताना अशीं सुंदर मंदिरें बांधून काय उपयोग होईल? आज दुःखितांचें दुःख दूर करण्यात च धर्म आहे त्यात तुमची कुशलता, कला प्रकट व्हा. गावात सुंदर मंदिर बांधण्याऐवजीं एखादा तलाव खोदला तर आसपासच्या लोकाना सक्रिय सहानुभूति दाखविल्या सारखें होईल. लोकांच्या जीवनात कला उतरू द्या, त्यांचें जीवन सुंदर होऊ द्या.

"सूर्यनारायणाची उपासना करा. पण ती सेवेच्या मार्गानें. देहरूपी सुंदर रथ आहे, त्याला इंद्रियरूपी सुंदर घोडे जोडले आहेत आणि त्या घोड्याना बुद्धिरूपी लगाम खेचत आहे. अंतर्यामीं सूर्यनारायण विराजमान आहे. या सूर्यनारायणाचीं अनेक किरणें अनेक प्रकारानीं प्रकट होतात. त्याद्वारें मनुष्यानें ज्ञानाच्या अनेक शाखा प्रकट केल्या आहेत. जीवनाच्या सर्व च क्षेत्रात तीं किरणें पोहोंचू द्या. शेतीमध्यें सुधारणा करायची आहे, ग्रामोद्योग उभे करायचे आहेत, गावागावात स्वच्छतेची काळजी घ्यायची आहे, ज्ञानदानाचें सत्र सुरू करायचें आहे, अशीं एक ना दोन, अनेक कामें करायचीं आहेत. सूर्यनारायण सर्वभूतान्तरात्मा आहे. तो साऱ्यांशीं सारखा वागतो, भेद करीत नाहीं."

यात्रेंत बऱ्या च ओडिया भगिनी आहेत. आमच्या महादेवीताई म्हणजे स्त्रियांच्या कैवारी! 'राष्ट्राचा विकास करायचा म्हणजे मूळ सुधारलें पाहिजे. मूळ आहे मातृस्थान—स्त्रिया. त्याचा विकास झाला पाहिजे' असें त्या वारंवार म्हणत असतात. उत्कलमध्यें लहान पोरींपासून तों वृद्ध स्त्रियांपर्यंत साऱ्या कशा धाडशी आहेत, किती कष्टाळू आहेत, ह्याचें त्याना फार कौतुक. त्यानीं बाबाजवळ एक दिवस शिफारस केली होती— "बाबा, ह्या मुलींना तुमच्या सहवासाचा लाभ मिळाला तर क्रांतिपथावर भ्रमण करण्या करता फार मोठें पाठबळ लाभेल त्याना" त्या वेळीं बाबानीं 'ह पारू' एवढें च उत्तर दिलें होतें. मागें पलामू (बिहार)च्या जंगलात यात्रा सुरू होती. रखरखणारा उन्हाळा होता. एका सप्याकाळीं बाबाना आम्हीं सहज च म्हटलें होतें, 'जंगलाचा प्रवास आहे, 'उपनिषदां'च्या जंगलात हि फेर-

पटका मारून यायची इच्छा होते. शिकवाल का ?" भोंवतालच्या शांत हिरव्या झाडावर नजर टाकीत बाबा म्हणाले होते, " हीं झाडें, हीं पानें, हे दगड, त्या टेकड्या, हे सारे तुम्हाला काहीं कमी शिकवतात का ? "

दुपारीं घड्याळान दोनाचा ठोला दिला. त्याच्या मागोमाग गुहेच्या आतून निघणारा गभीर ध्वनि कानीं आला –

**एको वशी सर्वभूतान्तरात्मा । एकं रूपं बहुधा य करोति ।**
**तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीरा । तेषां सुखं शाश्वत नेतरेषाम् ॥**

ओडिया भगिनी निमित्त झाल्या होत्या. आमच्या उपनिषदाच्या वर्गाचा तो आरभ होता. बाबा पद्मासन घालून ध्यानस्थ बसले होते त्या श्लोकाचा आम्हीं पुनरुच्चार केला. आमच्या उच्चारणानें त्यांचें समाधान होईपर्यंत आम्ही पुन पुन तो श्लोक जोरजोराने म्हणू लागलों. बाबा म्हणाले, " संस्कृत श्लोक म्हणत असताना व्यायाम व्हायला पाहिजे. शास्त्रीय संगीत गाताना कसा व्यायाम होतो ? अन् मग श्लोक म्हणून झाले की तुम्हास खूप भूक लागली पाहिजे "

तो ध्वनि हिमाल्यातील तपोवनात घेऊन गेला तिथें च हे मंत्र निर्माण झाले ह्या मंत्राचा जप त्या गुहेंत च झाला आणि त्याचें आचरण हि तिथें च झालें बाबाची वाक् गंगा खळखळ निनाद करीत हिमाल्याच्या जंगलातून बाहेर पडत होती ' एको वशी–तो परमात्मा कसा आहे ? तो एक आहे, सार्‍याना वश करणारा आहे तो राहतो कुठें ? सर्व भूताच्या आत्म्यात् त्या परमात्म्याला जे आपल्या आत्म्यात सतत पाहतात– अनुपश्यन्ति त्याचें दर्शन एकदा नव्हे तर निरतर जे करितात, त्या धीर पुरुषाना शाश्वत सुख प्राप्त होत नेतरेषाम्, तें सुख इतर लोक प्राप्त करू शकत नाहींत '.

: ४५ :

## दान प्रक्रियेचें समाजशास्त्रीय विवेचन

बेगुनिया, निमापारा, रेंसला, हरिपूर
५–८ एप्रिल '५५

दक्षिण हिंदुस्थानातून आलेल्या एका गृहस्थाशीं बाबांची चर्चा सुरू होती. बाबा म्हणाले, ' आपली चार आश्रमांची जी योजना आहे, ती सर्वोत्तम शिक्षणयोजना आहे. आयुष्यभर, जीवनभर शिक्षण त्यात दिलें जातें. त्यात जी दीक्षा आहे, ती च त्या पद्धतीची विशेषता आहे. पाश्चिमात्य देशांतील शिक्षणात 'दीक्षे'ला स्थान च नाहीं. पाश्चात्य देशांतून आपल्याला यंत्रें च शिकण्यासारखें जें काहीं आहे, तें विज्ञान आहे. परंतु मानसशास्त्र आणि समाजशास्त्र ह्या दोन्ही विषयांत तर तीं अगदीं अल्लड मुलें आहेत. भारतामध्यें हीं दोन्ही शास्त्रें पुष्कळ च विकसित झालीं आहेत.

सायंकाळीं भाषणात बाबांनीं हा च विषय पुढें चालू केला. " भूदानयज्ञ हें भारतीय समाजशास्त्राचें एक अंग च होय. त्या शास्त्राचे जे काहीं मूलभूत सिद्धान्त आहेत त्यात एक सिद्धान्त हा आहे कीं, आपल्याजवळ जें काहीं असेल त्याचा एक हिस्सा समाजाला सतत देत राहिलें पाहिजे. अशा नित्य दानामुळें समाजात विषमता राहत नाहीं, समानता राहते. हें पाश्चात्य समाजात तुम्हांला आढळणार नाहीं. तिथें जें दान चालतें त्याला ' charity ' म्हणतात. ही ' चॅरिटी ' चर्चच्या कामात किंवा दुःखी आणि रोग्यांच्या सेवेच्या कामात आढळते. ह्या दोन्ही गोष्टी हिंदुधर्मात हि आहेत. भूदानयज्ञात चित्तशुद्धि आणि पारलौकिक कल्याण दोन्ही आहेत. परंतु त्याचा मुख्य उद्देश आहे समाजपरिवर्तन, समाजात नवीन मूल्यांची प्रतिष्ठापना. व्यक्तीनें आपलें जीवन समाजाकरिता समर्पण करणें हा जी समाजशास्त्राची कल्पना आहे ती बहुतेकांच्या ध्यानात येत नाहीं. समाजवादी व साम्यवादी असा आग्रह धरतात कीं, समाजाचा उद्धार आणि जमिनीचा प्रश्न सोडवणें दोन्ही गोष्टी कठीण च आहेत. त्याकरता सरकारवर प्रभाव पाडायला पाहिजे. पण, दान आणि दानानें व्यक्तीची शक्ति समाजाला

समर्पित करणें व समाजात स्थिर मूल्याची प्रतिष्ठापना करणें हें त्याना समजत च नाहीं. भूदानयज्ञानें जमिनीचा प्रश्न सुटला नाहीं, हा यज्ञ पूर्ण सफल झाला नाहीं, तरी ह्याचा परिणाम असा होईल कीं, सरकारवर दाब पडेल च आणि गरिबाच्या हिताचा कायदा होईल. त्याला आम्ही ' अपुरें यज्ञ ' म्हणतों व त्याला च ती मडळी ' पूर्ण यज्ञ ' मानतात, आणि ज्याला आम्ही ' पूर्ण यज्ञ ' म्हणतों त्यावर ह्याचा विश्वास च नाहीं. "

भारतीय समाजशास्त्राच्या त्या च सनातन प्रक्रियेनें—यज्ञ, दान व तपानें—आधुनिक युगाची समस्या सोडविण्याचा एक अपूर्व, आगळा च प्रयत्न गुरुदेवानीं गायला आहे. ' अयि भुवन मनमोहिनी '— प्राचीन सस्कृतीच्या गौरवाचें गीत आपण गातों. पण तें जीवनात उतरायला नको का? ' गीता-प्रवचना 'त म्हटलें आहे, ' जी सस्कृति तुझ्या हृदयात, तुझ्या जीवनात, नाहीं ती साऱ्या जगभर तू कशी पसरवणार?' बाबा म्हणतात, " भारतात पुन. एक वार धर्माचा उदय व्हावा अशी ईश्वराची इच्छा आहे. त्याला जर प्रलय च हवा असेल तर तसे हि होईल. परतु तो मला यात्रा करायला लावतो आहे ती लोकाना दान देण्याची प्रेरणा देत आहे. तेव्हा त्याला प्रलय नको हें उघड च आहे."

निमापाराला जाताना बाबा म्हणत होते, " अनेकदा लोक विचारतात तुम्ही का हिंडता? मोटर किंवा विमानानें देशाचा तुफानी दौरा का नाहीं करीत? मी त्याना उत्तर देतों, " शातीकरता तुफानी दौरा करावा लागतो का? शातीकरता तर चिंतन करीत करीत शातपणें यात्रा करायला पाहिजे." असा च तऱ्हेच्या दुसऱ्या एका प्रश्नाला उत्तर देताना ते म्हणाले होते, " मी जमिनीवर फिरतों म्हणून मला जमीन मिळते. हवेंत हिंडलों असतों तर हवा च मिळाली असती कीं !"

भुवनेश्वरच्या एका सभेंत कुणीं तरी बाबाना सुचवलें, " एका जागीं राहून तुम्ही आपल्या कार्याचा एखादा नमुना का नाहीं करून दाखवत?" बाबा म्हणाले होते, " मी तर विचार देत फिरणार आहे. तुम्हाला हवा असेल तर तुम्ही त्याचा स्वीकार करा व त्यानुसार आचरण ठेवा. अथवा पसत नसेल तर सोडून द्या. ' साइनपोस्ट ' कुणाचा हात धरून त्या दिशेनें घेऊन

जात नाहीं. तो फक्त दिशा दाखवतो– हे इकडे भुवनेश्वर आहे नी इकडे पुरी आहे, तिकडे कटक आहे."

आज एका गृहस्थानीं बाबाना म्हटलें, "तुम्ही ज्याला क्रांति म्हणता त्याकरता एखादें नमुनेदार कार्य तुम्ही करून दाखवा ना ?" मीं पटकन् म्हटलें, "बाबा तर साइनपोस्ट आहेत." त्यावर बाबा हसू लागले व म्हणाले, "मंडनमिश्राच्या घरचे पोपट असे च वेदान्त बोलत होते ह्या मुली रोज माझीं भाषणे ऐकतात, तीं टाइप करतात, त्याचा रिपोर्ट तयार करतात, म्हणून ह्याना सारे तोंडपाठ होऊन जातें." मग काय ! सारा दिवस 'मंडनमिश्राचे पोपट' म्हणून चिडवायला आमच्या यात्रीदलातल्या मंडळींना एक कारण मिळाले.

शंकराचार्य दिग्विजय करीत भारत भ्रमण करीत होते तेव्हांची गोष्ट आहे ही. त्या काळचा सर्वश्रेष्ठ पंडित मंडनमिश्र होता. त्याच्याशीं वाद करण्याकरता शंकराचार्य त्याच्या गावीं गेले. गावांत शिरता च त्यानीं तेथील लोकाना विचारलें, 'मंडनमिश्राचे घर कुठें आहे ?' लोक म्हणाले, 'अहो, ज्या घरासमोरील अंगणात पिंजऱ्यातील पोपट मैना देखील 'स्वत प्रामाण्यम्, परत प्रामाण्यम्' असें बोलताना आढळतील ते मंडनमिश्राचे घर समजा !'

निमापाराच्या सभेंत शांति नव्हती बाबानीं थोडा वेळ समजावून सांगितलें. लोक थोडे शांत झाले हि पण बाबाना हवी तशी परिपूर्ण शांति नव्हती. म्हणून प्रार्थना आटोपून दोन शब्द हि न बोलता ते निवासस्थानीं परतले. गावकऱ्याना साहजिक च फार दु:ख झालें ते सारे बाबाजवळ विनंति करायला आले. "चार शब्द तरी बोला, आता सारे लोक शांत झाले आहेत." "मी आपले विचार लोकावर लादू इच्छीत नाहीं. लोक जर एकाग्रतेनें व शांतीनें ऐकायला तयार असतील तर च मी ऐकवीन. आज मीं भाषण दिलें नाहीं ते एवढ्या च करता कीं, लोकाना जरा धडा मिळावा." एवढें म्हणून बाबा पुन हातातल्या जाड्या प्रथाशीं नोंदू लागले.

रात्र झाली होती. स्वच्छ, शीतल चांदण्यात सृष्टि न्हाऊन निघत होती. नीरव शांति पसरली होती. अशा वेळीं चार भिंतींआड बाबाना बरें कसें वाटणार ? ते बाहेर पडले व जवळच्या विस्तीर्ण मैदानात पद्मासन घालून बसले. आम्र्याच्या मोहराचा वास सर्वत्र दरवळला होता. थोड्या च

वेळात काहीं कम्युनिस्ट भेटीस आले. त्याच रम्य वातावरणात चर्चा सुरू झाली.

प्रश्न : तुम्ही तुमच्या पद्धतीने काम करता, मग तसा कायदा कां होऊ देता ?

बाबा : अहिंसेचा कायद्याशीं काहीं विरोध नाहीं. अहिंसक चळवळीनें लोक मानस तयार होतें. मग त्यानुसार जो कायदा होतो तो अहिंसेच्या मर्यादेंत राहतो. या चळवळीचा परिणाम होऊन उद्या असा कायदा झाला कीं, गावच्या सान्या जमिनीवर गावाची मालकी राहील तर अशा कायद्याचें आम्ही स्वागत च करूं.

थोडी अधिक चर्चा झाल्यावर बाबांनीं त्यांना विचारलें, "मग तुमचा ह्या चळवळीला विरोध तर दिसत नाहीं. मग तुमची मदत आम्हाला मिळेल ना ?"

कम्युनिस्ट बंधु : हो हो, अवश्य ! पण मग तुम्हाला हि आमच्या कामात मदत द्यावी लागेल.

बाबा हसून म्हणाले, "अहो, हा तर सौदा झाला. भूदानाचें काम असें आहे कीं, ह्यात कुणाचा मतभेद होऊ च शकत नाहीं. म्हणून ह्यात सारे मदत करू शकतात परंतु तुमच्या राजकीय पक्षाच्या कामात आम्ही कशी मदत करणार ?"

शेवटीं 'भूदान आणि आमचें कार्य ह्यात काहीं फरक नाहीं, आम्ही भूदानाचें हि काम करू' असें कबूल करून ती मंडळी उठली.

एके काळीं कम्युनिस्ट बाबांना भांडवलदार आणि जमीनदाराचे 'एजंट' मानीत होते. चार वर्षांपूर्वी बाबा तेलंगणाची यात्रा करीत होते तेव्हां तेथील कम्युनिस्टांनीं पत्रक काढून जनतेला पराङ्मुख करण्याचा निष्फळ प्रयत्न केला होता. त्यात लिहिलें होतें कीं, 'संताच्या वेषात फिरणान्या या भांडवलदाराच्या एजंटाला मदत करू नका.' आज ते च कम्युनिस्ट भूदानांत मदत करायला तयार होत आहेत. बाबांना तर असा विश्वास पूर्वीपासून च होता. कम्युनिस्टांचें हृदयपरिवर्तन झाल्याशिवाय राहणार नाहीं. 'माझ्या नेत्रात जर निर्मलता आहे तर आरशाची काय अशी बिशाद लागून गेली आहे कीं त्यात मलीनता आढळेल ? हें जग म्हणजे माझें च प्रतिबिंब आहे.'

मानाच्या अंतःकरणात भूतमात्रावर प्रेम आणि विश्वास आहे. त्याचें प्रतिबिंब दुसऱ्याच्या हृदयात दिसणार नाहीं असें कसें होईल?

देशाच्या वाटेवर चर्चा सुरू होती पुरी संमेलनात साऱ्या सर्वोदयप्रेमी लोकांना भूदानावर एकाग्रचित्त होण्याचें जें आवाहन केलें होतें त्यावर काहींचें म्हणणें असें होतें कीं, 'त्या कामात आम्ही मग्न आहोंत तें देखील महत्त्वाचें आहे.' काहीं म्हणाले, 'सरकारात जाऊन देखील सेवाकार्य होऊ शकते.' त्याचा उल्लेख करून बाबा गंभीर होऊन म्हणाले, "जे लोक चांगल्या चांगल्या कामात अडकले आहेत त्यांना तीं कामें सोडून येणें कठीण च आहे. लोखंडी बेडी, शृंखला लवकर तोडली जाऊ शकते, पण माणूस सोन्याची शृंखला लवकर तोडू शकत नाहीं. कारण तो तिला शृंखला न समजता अलंकार च समजू लागतो."

जीवनाचें माती करणारें हें सोनें! तें भिन्न भिन्न स्वरूप धारण करून मनुष्याला आकर्षित करण्याकरता येतें प्रभु रामाजवळ हि तें च कांचन मृगाच्या रूपात आलें होतें. म्हणून च तर उपनिषदाचा ऋषि प्रार्थना करतो,

'हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ।
तत् त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये ॥'

'भूदान हा भक्तिमार्ग आहे. जनताजनार्दनातील नारायणाचें दर्शन घ्यायचें असेल तर गावोगावीं, शेतोपाडीं, हिंडावें लागेल व तपस्या करावी लागेल.' हृदयगुहेंत झोंपी गेलेल्या अन्तरतरात्म्याला ही हाक ऐकू येते आणि तो जागा होतो. त्या मार्गावर चालण्याला तो प्रयत्न करू लागता च त्याला कधीं ममतेची मृदु बंधनें, कधीं कीर्तीचा कोमल पाश, कधीं मत्सराची शीतल मागळी तर कधीं 'चित्तमणी तुरा' (मानरी वेणी) अडवू लागते. या सुवर्णमृगजळाच्या क्षणिक निनादाने त्याला भ्रम होऊ लागतो. या साऱ्या सुकोमल बंधनांना तोडून तो सारखी विपुल होऊन जेव्हां विहार करू लागतो तेव्हां त्याला ज्ञानदेवांची वाणी ऐकू येऊं लागते.—

'अमोलिक रत्न जोडिलें हें तुज
परी रे भ्रमबीज नोळखिसी।'



## : ४६ :

# क्रांतीचे पाईक

बतलसिंग डेलाग
९-११ एप्रिल '५५

उत्कलच्या भूमीवर बापूचीं चरणचिन्हें अंकित झालीं आहेत. वाट चुकलेल्याला किंवा चुकू पाहणाऱ्याला मार्ग दाखविण्याचें सामर्थ्य त्या उमटलेल्या पावलात आहे. बापूच्या उत्कल पदयात्रेंत राहिलेले बरे च यात्री या भूदानाच्या पदयात्रेंत हि आहेत. ते नेहमीं आठवणी सांगत असतात. मग बापू असें म्हणाले, बापू एक दिवस इतके मैल चालले. असें वाटतें किती भाग्यवान् ही मंडळी! महात्म्याचा सहवास लाभणें ही देवाची फार मोठी देणगी. मग बाबाचें वाक्य आठवतें. 'बापू जेव्हां देहधारी होते तेव्हां ते कधीं दूर असत तर कधीं जवळ. परंतु आता नित्य जवळ च असतात.' आता विरह नव्हता कीं मीलन नव्हतें. देहामुळें निर्माण होणारें अंतर नाहींसें होता च तें अंतरींच्या अंतरतराशीं एकरूप होऊन गेलें.

डेलागला एका तळ्याकाठीं वृक्षाच्या शांत छायेंत एका कुटींत बाबाचा निवास होता. बापू ह्या च कुटींत राहिले होते. 'पत्रं पुष्पं फलं तोयम्' सारें पाहून वाटलें, स्वागत परिपूर्ण आहे. तिकडे मंद वाऱ्याच्या झोक्यानें डोलणारे नारळ, ताडवृक्ष, केळी सारीं मंद स्मित करीत होतीं.

दुपारीं उत्कलच्या प्रमुख कार्यकर्त्यांची सभा होती. त्याकरता नबबाबू भुवनेश्वरहून आले. त्यानीं दारात पाय ठेवता च उत्सुकतेनें पहिला च प्रश्न केला, 'आज तुमचा उपनिषदाचा वर्ग केव्हा आहे?' त्यान्नी धाकटी मुलगी 'तिनु' हल्लीं आमच्याबरोबर आहे तिला कठोपनिषदातील श्लोक पाठ करताना पाहून त्याना फार आनंद झाला. तेवढ्यात वैदेही अप्पानीं सूचना दिली कीं आज वर्ग होणार नाहीं. भर दुपारीं तहानेल्याला पाणी मिळू नये, तसें वाटलें आम्हा सार्‍याना. घड्याळाचे काटे पुढे पुढे सरकत होते. दोनचा ठोका पडला आणि आम्हीं आमच्या खोलींत बसून च जोरजोरानें मंत्रोच्चारण सुरू केलें. बाबा म्हणतात, "उपनिषद् हें असें आहे कीं त्यात विद्वानाला आणि अडाण्याला सारखी च गोडी वाटते."

आज जाहीर सभेत आमच्या वर्गाचा उल्लेख करून बाबा म्हणाले, "या मुलींमधून तेजस्विनी स्त्रिया निघतील, त्या घरोघर जाऊन उपनिषदाचा संदेश सांगतील आणि साऱ्या देशाचें परिवर्तन करतील. शेवटीं क्रांति कोण करतो? क्रांति विद्वान् करीत नाहींत, वानरें आणि गवळ्यांचीं पोरें क्रांति करतात, सामान्य लहान लहान शेतकरी आणि स्त्रिया क्रांति करतात. 'स्त्रियो वैश्याः शूद्रा' हे सारे क्रांति करून टाकनात तेव्हा मग तिची तात्त्विक मीमांसा करण्याकरता, इतिहास लिहिण्याकरता आणि त्यानुसार कायदे बनविण्याकरता विद्वान् पुढें येतात.

येशू ख्रिस्ताची एक कहाणी आहे. ते धर्मप्रचाराकरता फिरत असताना त्यांच्या दृष्टीस एक कोळी पडला. तो नदींतले मासे पकडण्यात गर्क झाला होता. येशूनें त्याच्याजवळ जाऊन त्याच्या खांद्यावर हलकें च हात ठेवीत म्हटलें, "तू हें काम कशाला करतोस बाबा? माझ्याबरोबर चल मी तुला शिकवीन– मासे पकडण्याचें काम नव्हे तर माणसांना कसें पकडायचें तें शिकवीन" कोळ्यानें जाळें फेंकून दिलें व तो येशूच्या मागोमाग निघून गेला. येशूनें अभिमंत्रित केलेलें जाळें त्यानें हातीं घेतलं व धर्माचा खूप प्रचार केला.

डेलागरा दोन दिवस मुक्काम केला होता. नेहमींप्रमाणें पहाटे चार वाजता प्रार्थना आटोपली व बाबांचीं पावलें दुतर्फा हिरवीं झाडें असलेल्या रस्त्यावर पडू लागलीं. फिकट पिवळसर चंद्रबिंबावर पडणाऱ्या ढगांमुळें पट्टे दिसत होते. त्याचें रूप क्षणाक्षणाला पालटत होतें. पक्ष्यांची किलबिल सुरू झाला आणि बाबांचें चिंतन सुरू झालें— कधीं प्रकट कधीं अप्रकट. बाबांचा उत्कलमध्यें प्रवेश होण्यापूर्वी इथें सव्वा लाख एकर जमीन मिळाली होती पण आता बाबांचा प्रवेश झाल्यानंतर फक्त चार हजार एकर च वाढले होते. बापी, नाप्पा सारे च विचार करीत होते. "देशात जे जबाबदार व प्रमुख कार्यकर्ते आहेत त्यांनीं एकेका जिल्ह्याची जबाबदारी घ्यावी असें मला वाटतें. त्यानें काम लवकर होईल. शंभर कार्यकर्ते जर तीनशेंपैकीं शंभर जिल्ह्यांचा एक एक लाखाचा कोटा पूर्ण करण्याचें काम हातीं घेतील तर कांहीं तरी साक्षात् काम केल्यासारखें होईल." बाबांचा दिग्घोष सुरू होता.

आज सध्याकाळीं पुरीच्या गवयाचा सगीताचा कार्यक्रम झाला. 'मैं तो गिरिधर आगे नाचूगी.' गायक गात होता. महादेवीताईच्या हरिजन मानसकन्येची – शाताताईची – चिमुरडी 'हरिकृपा' खरोखर च नाचू लागली. सारे विसरून तिच्याबरोबर नाचावेसें वाटलें. भक्तिरस पिऊन व 'पग घुगरु बाधून' बेभानपणें नाचणाऱ्या मीरेचा आदर्श लहानपणीं माझ्यासमोर होता, त्याची आठवण झाली.

कार्यकर्त्यांना आध्यात्मिक अमृत पाजीत बाबा म्हणाले, "गावागावात जा, नाचत गात जा. वैष्णवभक्ताची मस्ती तुमच्यामधें येऊ द्या. हें महान् क्रातींचें कार्य आहे. वेदान्त वगैरे घेऊन सुस्त बसणाऱ्याचें हें काम नव्हे, ससारानें त्रस्त होणाऱ्याचें हें काम नव्हे, सार्वजनिक कामात ग्रस्त होणाऱ्याचें देखील हें काम नव्हे. हें काम तर भक्तिरस पिऊन मस्त *होणाऱ्याचें च आहे. तुम्ही घरदार सोडा, बाहेर पडा, थोडा त्याग करा.* त्याच्या मोबदल्यात मी तुम्हाला वैकुठ देईन. सुखी समाज म्हणजे च वैकुंठ. दोन वर्षे अखड जोमानें हें च काम करा. मग आपण सारे मिळून देवाच्या दरबाराल जाऊ आणि त्याला विचारू– 'आम्हीं एवढी भक्ति केली त्याबद्दल आम्हाला काहीं च का मिळणार नाहीं ?' "

कार्यकर्त्यांची सख्या कमी आहे त्यावर ते म्हणाले, "आमच्यासमोर मुख्य प्रश्न हा आहे कीं आमचे कार्यकर्ते शुद्ध हृदयाचे, ज्ञानमय आणि प्रेममय कसे होतील ? प्रत्येकानें स्वत ला 'हरिदास' समजावें व त्या च नात्यानें दुसऱ्याकडे पहावें. धर्माचीं तत्त्वें गुप्त रूपानें ज्यात वास करतात तो हिमालय आमच्या हृदयगुहेंत च आहे. तेव्हा आमच्या कार्यकर्त्यांनीं *हृदयाच्या खोल गुहेंत जाऊन व्यापक आत्म्याचें ध्यान करायला शिकावें.* रात्रीं झोंपीं जाताना हिमालयाच्या गुहेंत प्रवेश करू आणि त्यात जीं रत्नें मिळतील तीं सकाळीं उठून दिवसभर वाटत राहू. जनसेवा करीत करीत च आम्ही पारमार्थिक सेवा करू. दोन्हीमध्यें आम्ही द्वैत मानीत नाहीं."



: ४७ :

## भूदानाचे तीन आधार

वेगुनियापार, तारनोई, खुर्दा
१२–१४ एप्रिल '५५

चारी बाजूला हिरवीगार वनश्री, कैऱ्यांनी लदबदलेली आंब्याचीं झाडें आणि टेंडयाच्या रांगा म्हणत होत्या, ' आम्हाला सोडून तू पुढें कशी जातेस ? ' भागवत वर्गाची वेळ झाली आणि बाबा थांबले. समोरच्या उंच पहाडावर देऊळ दिसत होतें बाबा मस्तींत गाऊं लागले, ' गगनमें थाल, रवि चंद्र दीपक बने ! ' बस ! आता हें च आमचें मंदिर आहे, गगनाचें विशाल ताट आहे आणि रविचंद्र हे दीप त्यात आहेत ' भागवताचें अध्ययन आटोपून ध्यान केलें आणि आम्ही पुढें चालूं लागलों.

कठोपनिषदाचे पांच मंत्र संपले आमच्या वर्गात 'ईशावास्या'चा प्रारंभ झाला. बाबांनीं सांगितलें, ' सारें जग ईश्वराचें आवासस्थान आहे. ईश्वराशिवाय एक हि वस्तु नाहीं. चोहोंकडे तो च व्यापला आहे. ' ग्रामराजाच्या रूपानें होणारें स्वामित्वविसर्जन म्हणजे ह्या मंत्राचें साकार रूप च होय असें वाटलें. कुठें जायचें कसें जायचें तें बाबा सतत सांगत असतात. शंकराचार्यांनीं वर्णन केलेल्या तीन भाग्यापैकीं ' मनुष्यत्वम् ' व ' महापुरुषसंश्रय ' ( महापुरुषाचा आश्रय ) हे दोन्ही तर आम्हाला प्राप्त झाले आहेत. पण मधले ' मुमुक्षुत्वम् ' ( मुक्तीची इच्छा ) ? अस्ताला जाणाऱ्या सूर्याच्या आरक्त तेजाची मनातल्या मनात प्रार्थना केली–' माझ्या बुद्धीला तू सत्प्रेरणा दे. '

या वर्षीं १३ ते १८ एप्रिलचा सप्ताह साऱ्या देशात ' भूमिक्रांतीचा सप्ताह म्हणून साजरा करण्यात येणार आहे. १३ एप्रिल जालियनवाला बागेचा स्मृतिदिन आणि १८ एप्रिल भूमिक्रांतिदिन ! साऱ्या देशात शेंकडों लोक भूदानाकरता या आठवड्यात पदयात्रा करणार होते. आज पडावावर ' पोहोंचताच आम्हीं सारे आजूबाजूच्या खेड्यात जाऊन साहित्यप्रचार व भूमिप्राप्तीच्या कार्यक्रमाचा प्रारंभ केला. ज्या तिपाईवर भूदानाच्या पूर्ण कुंभाची प्रतिष्ठापना झाली आहे तिचें वर्णन आज बाबांनीं केलें.

'आमचा पहिला आधार आहे सत्य! जमिनीवर माणसाची मालकी होऊ शकत नाहीं. जमीन सर्वांची, सान्याची आहे ही एक सत्य वस्तु आहे. म्हणून जो शेती करू इच्छितो त्याला जमीन मिळाली च पाहिजे. हे केवळ मानवीय सत्य नव्हे तर ईश्वरीय सत्य आहे. ईश्वरानें मानवाला जी संपत्ति दिली आहे तिच्यावर त्याच्या सर्व च पुत्राचा समान हक्क आहे. आमचा दुसरा आधार आहे भूमिहीनाची तपस्या. ते बिचारे रात्रदिवस शेतात खपत असतात, तरी हि त्याना त्याच्या मेहनतीचें पुरें फळ मिळत नाहीं. तप कधीं निष्फळ जात नाहीं. आमचा तिसरा आधार आहे भूमिवानाच्या, श्रीमानाच्या, भारतवासीयाच्या हृदयातील प्रेम आणि उदार भावना. आमची मागणी ओळखून ते वागतील असा आम्हाला विश्वास आहे. ते आज प्रवाहपतित झाले असतील पण त्याचें आतलें हृदय आज हि स्वच्छ आहे. भारतात तर दानाची महान् परंपरा च आहे."

दुपारीं एक जमीनदार दानपत्र घेऊन आले बाबानीं त्याना भूदान-साहित्याचा एक पूर्ण सेट भेट देताना म्हटलें, "तुमच्या दानानें माझें समाधान होणार नाहीं मला तर तुमचें हृदय हवें आहे. तुम्ही भूदानाचे सेवक व्हा." तें ऐकता च जमीनदार सद्‌गदित झाले. पुस्तकें त्यानी प्रसाद समजून घेतलीं. तीं पुस्तकें वाचून त्याच्या हृदयात हि ती च आग निर्माण होईल, जी आज बाबाच्या पायाना स्वस्थ बसू देत नाहीं.

पुरीच्या बाबाच्या एका भाषणात 'रुक्नेदीन' हा शब्द आला होता. त्याचा अर्थ ध्यानात येईना म्हणून मी बाबाना विचारायला गेलें. बाबानीं समजावून सागितलें, "रुक्न हा अरबी शब्द आहे. त्याचा अर्थ स्तंभ. दीन म्हणजे धर्म. रुक्नेदीन म्हणजे धर्माचा स्तंभ. कुराणात असें सागितलें आहे कीं धर्माचे पाच स्तंभ आहेत : (१) पदयात्रा, (२) उपवास, (३) दान, (४) नमाज, आणि (५) अल्ला एक आहे ह्यावर श्रद्धा. रुक्नचें बहु-वचन आहे 'अर्कान'. मराठीचा 'रकाना' शब्द त्यावरून च बनला आहे." माझ्या पोस्ट ग्रॅज्युएट कोर्समध्यें आज अरबीचा धडा झाला.

पुर्‍यांला जाणारा रस्ता फार च रमणीय होता. पर्वताच्या रागा, धुक्याचें पाघरूण घेऊन पहुडलेली वनराजी हे आम्हाला वाटेंत दोस्त मिळाले होते. रगीबेरंगी जगली फुलें मद स्मित करीत होतीं व अमलताशाचे पिवळे लोलक

सृष्टीचे अलंकार बनले होते. आकाशात पांढऱ्या ढगाची खूप गर्दी झाली होती. त्यामुळे हा सूर्य कीं चंद्र असा प्रश्न पडला बाबा तर भर बाजारातल्या गजबजपुरींत हि शांतपणें ध्यान करू शकतात, पण आम्हाला मात्र ध्यानाला असली रमणीयता व शांतता हवीशी वाटते. ह्या भागातील लोक पराक्रमी म्हणून प्रसिद्ध आहेत. १९१७ मध्ये इथें मोठें बंड झालें होतें. त्यात जयसिंग नावाच्या वीराला ब्रिटिशांनीं ज्या झाडावर लटकवून फाशीं दिलें होतें तो वटवृक्ष आमच्या वाटेत उभा होता त्याला वंदन करून मी पुढे सरकले.

स्नान करण्याकरता आम्ही दोन मैल दूर असलेल्या कुंडावर गेलों उंच उंच पहाडाच्या कुशींत दाट जंगल होतें. मध्यभागीं एकान्तात शांत मंदिर आणि निर्मळ पाण्याचें कुंड होतें. आमची नवीन मैत्रीण 'मेहेर' हें स्थान पाहून खूप च आनंदली. ती लाहोरच्या एका पारशी खानदानी घराण्यातली आहे. तिच्या वडिलांच्या मृत्यूनंतर तिची आई आपल्या दोन अपत्यांना घेऊन इंग्लंडला गेली व आता सतरा वर्षांनंतर भारतात परत आली आहे. तिची आई बापूची भक्त त्यामुळें गांधीजींच्या सिद्धान्तांचें बाळकडू त्यांनीं आपल्या अपत्यांना पाजलें होतें. त्यामुळे लंडनसारख्या परदेशी मोहमयी नगरींत ल्हानाची मोठी झालेली मेहेर आपल्या हृदयात एक स्वप्न बाळगून होती भारताच्या एखाद्या खेड्यात स्थायी होऊन सेवाकार्याला जीवन वाहायचें. ते स्वप्न साकार करण्याकरता ती इथे आली आहे. लंडनच्या विद्यालयात तिनें अर्थशास्त्राचा अभ्यास केला होता आणि इंग्लंडच्या लेबर पार्टीचें काम हि ती करीत होती कुंडाजवळ कपडे धुता धुता तिच्या व निर्मलाच्या गप्पा सुरू झाल्या प्रोफेसर लास्कीचें संस्थान, ॲटली आणि बेव्हनचे मतभेद इत्यादींवर जोरजोरात गप्पा चालल्या होत्या. मंदिरातल्या शिवलिंगाकडे दृष्टि रोवीत मी त्यांचे शब्द ऐकण्याचे काम करीत होतें.

जमीन ही ईश्वराची देणगी आहे. तिच्यावर मानवाचा च नव्हे तर पशु पक्ष्यांचा हि अधिकार आहे हें तत्त्व भारतातला गरीब शेतकरी हि जाणतो. एक गरीब विधवा बाई मागें एकदा बाबांना भेटायला आली होती. आपली करुण कहाणी ती पदरानें डोळे पुसत पुसत बाबांना सांगत होती तिचे

एकुलतें एक लाडकें पोर देवानें हिरावून नेलें होतें. आपल्या छोट्याशा शेतात निढळाचा घाम गाळून तिनें मेहनत केली होती. थोडेंबहुत पीक हि काढलें होतें. पण पिकाचें रक्षण ती करू शकत नव्हती. पाखरें येऊन पीक खाऊन टाकत होतीं. आपली ही कहाणी सांगताना पाखराचें नाव निघताना ती च पुनः म्हणाली, "पण त्याचा तरी काय अपराध? त्याना हि देवानें च निर्माण केलें आहे ना? त्याचा हि पिकावर तेवढा च अधिकार नाहीं का?"

दुसरी एक अशी च घटना घडली. बाबा सकाळीं फिरावयास जात होते. एक शेतकरी पिकाच्या रक्षणाकरता पाखरें उडवायला मचाणावर बसला होता. सूर्योदयाची वेळ होती. पण चिमण्या निर्भततेनें दाणे खात होत्या आणि शेतकरी मात्र शांत व अचल दृष्टीनें तें दृश्य बघत होता. बाबांनीं त्याला विचारलें, "अरे, तू असा बघत काय राहिलास? त्याना उडवण्याकरता ना तिथें बसला आहेस?" त्या शेतकऱ्यानें नम्रतेनें उत्तर दिलें, "आता च सूर्य उगवत आहे, थोडा वेळ खाऊं द्या त्याना. मग उडवीन मी. रामप्रहर आहे ना?"

भूतमात्राकडे समानतेनें पाहायला शिकवणारी ही भारतीय संस्कृति किती खोलवर पाहायला लावते ह्याची जाणीव ह्या दोन उत्तरांत होती. ह्या गोष्टी सांगत असताना बाबांचे डोळे पाणावले होते.



: ४८ :

## सामूहिक इच्छाशक्ति

सरुआ, चकादा, राजमुनासला
१५-१८ एप्रिल '५५

आज बाबाना एका गृहस्थाचें पत्र आले होतें. त्यात लिहिलें होतें, "मी घरमालक आहे. आजपर्यंत मी माझीं घरें भाड्यानें देत असें. भूदानाचा संदेश ऐकून माझ्या मनावर अतिशय परिणाम झाला आणि मीं तीं घरें भाडेकरूना दान देऊन टाकलीं."

एक जीवनविचार एका स्वरूपात प्रकट झाला म्हणजे तो प्रत्येक क्षेत्रात, जीवनाच्या प्रत्येक अंगात असा सूर्यकिरणासारखा सरळ प्रवेश मिळवतो. किती तरी लोकांनीं हा संदेश ऐकून सत्कार्यें केलीं असतील, किती तरी जीवनाचा रंग पालटला असेल ! हा परिणाम अतिसूक्ष्म आहे. परंतु तो स्थूल आणि व्यापक झाला म्हणजे च चर्मचक्षूंच्या पथात येणार.

"भूदानयज्ञामुळें दूरवर सद्भावना निर्माण होत आहे याचें कारण विश्वास ठेवण्यावर आम्हीं विश्वास ठेवला आहे. भूदानाची ही चळवळ जसजशी विकसित होत जाईल तसतसा त्याचा परिणाम सर्वांच्या जीवनावर होईल आणि मानव जीवनाची उन्नति व्हायला त्यानें मदत होईल भूदान-यज्ञाचा जो मथन दंड आम्हीं हातीं घेतला आहे त्यानें जीवनाचें मथन होईल आणि त्यातून जें नवनीत निघेल तें परमामृत होईल."

खुद्द येथें काहीं कम्युनिस्टांनीं बाबाना विचारलें, "लोक तुम्हाला इकडे दान देतात आणि तिकडे गरीब शेतकऱ्याना बेदखल करतात ह्याला तुम्हीं चूक मानत नाहीं का ?" यावर सरुआच्या प्रवचनात बाबा म्हणाले, "हो. मी तें चूक च समजतों. पण माझें म्हणणें असें आहे कीं, माणूस एका प्रवाहात अडकून असली दुष्कृत्यें करीत असतो. बिहारमध्यें बेदखली बंद होण्याकरता आम्हीं एक समिति नेमली आहे. तिची एक योजना हि तयार झाली आहे. जे लोक कुळाना बेदखल करतात त्याना आम्ही समजावून सांगतों कीं 'तुमचें हें कृत्य अयोग्य आहे. तुम्हीं धर्मात यमी

एवढें तरी करा कीं ज्याना तुम्ही बेदखल करता ते जर भूमिहीन होत असतील, तर त्याना पुरेशी अशी जमीन आम्हाला दान करा. मग ती जमीन आम्ही त्याना च देऊ. तें तुमच्या अपराधाचें एक प्रायश्चित्त होईल.' असें समजावल्यामुळें कांहीं मालकानीं आपल्या जमिनी दान दिल्या आहेत."

बाबा नेहमीं च म्हणतात कीं भूदान ही हृदयशुद्धीची चळवळ आहे. एका चर्चेत ते म्हणाले, "हृदयशुद्धीनें समाजात परिवर्तन करायचें हें ह्या चळवळीच मुख्य ध्येय आहे. स्वत:ची हृदयशुद्धि करणे म्हणजे उत्तम बीज निर्माण करणें, स्वत:च्या जीवनाची शुद्धि करणें म्हणजे बीज पेरणें व समाजाचें परिवर्तन म्हणजे पिकाची कापणी. परंतु काहीं लोक असे अजब असतात कीं ते उत्तम बीज तयार करून घरात च ठेवतात आणि काहीं असे असतात कीं ते बीज पेरण्यांपूर्वीं च पिकाची कापणी करू इच्छितात."

आज उपनिषदाच्या वर्गात 'न कर्म लिप्यते नरे' वर विवेचन सुरू होतें. बाबा म्हणाले, मनुष्याला कर्म चिकटत नाहीं, फलवासना चिकटते. ऋषींनीं कर्म सोडण्याचे अनेक प्रयोग केले व मग आपला अनुभव जगाला सागताना त्यांनीं बोध दिला कीं मुक्तीकरता कर्म सोडण्याची गरज नाहीं. देहाबरोबर कर्म येतें च. परंतु फलवासना माणसाला नेहमीं छळत असते. म्हणून फलवासनेला कापून टाकून अनासक्त होऊन कर्म करीत राहिलें पाहिजे. 'कुर्वन्नेवेह कर्माणि' हेहवताला हा च एक मार्ग आहे 'एवं त्वयि' इथें 'त्व' म्हटलें गेलें आहे. माता जशी पुत्राला बोध देते तशी च श्रुति आपणा पोराना सागत आहे कीं, तुझ्याकरता दुसरा मार्ग नाहीं. 'न अन्यथा इतः अस्ति।'... मीं बघितलें आदिवासी उर्वशी, मध्यम वर्गाची अल्पशिक्षित वैदेही, इंग्लंडहून आलेली मेहेर साऱ्या वेगळ एकाग्रतेनें ऐकत च नव्हत्या तर ग्रहण हि करत होत्या. स्त्रिया शेंकडों वर्षां-पासून या 'रत्नभाडारा'ला पारख्या झाल्या होत्या. आता त्याच्या हातीं तें भाडवल येत होतें. त्याच्या आधारावर त्या निर्भयतेनें साऱ्या जगासमोर एकट्या उभ्या राहूं शकतील.

राजमुंद्रीला येथें नई तालीमच्या प्रशिक्षण विद्यालयात दोन दिवस राहायचें होतें. पळापुराच्या बागेंत विद्यालयाची साधी इमारत होती. गादीच्या

गजबजाटापासून दूर असल्यामुळे स्थान रम्य व शांत होतें. तेथील शिक्षक आणि विद्यार्थी अतिथिसेवा झटून करीत होते. नास्ता घेऊन आम्ही गावात साहित्यप्रचाराकरता हिंडू लागलों. मोडक्यातोडक्या उडिया भाषेंत विचार समजाविण्याची आमची धडपड सुरू होती. बाजारात एका भेंडी विकणाऱ्या-जवळ जाऊन मीं त्याला विचारलें, " विनोबाजी तुमच्या गावात कशाला आले आहेत, माहीत आहे का ? ते तुम्हा सर्वांच्या कल्याणाकरता काम करीत आहेत. हें छोटेंस ' ग्रामसेवक ' ( उडिया साप्ताहिक ) घेशील तर कळेल तुला." प्रथम तर तो माझ्या तोंडाकडे टकमका बघत च राहिला. त्याच्याजवळ आजवर असें कुणी पोहोंचलें नव्हतें. त्याने उल्हासाने तें पुस्तक उलटमुलट चाळून आर्जवून म्हटलें, " मी जरूर घेईन हें. माझा मुलगा शाळेंत जातो. त्याच्याकडून वाचून घेईन मी. पण हें बघा, माझी अजून बोहणी काहीं च झाली नाहीं. जरा दोन चार शेर भेंड्या विकूं तर दे. तुम्ही थोड्या वेळाने पुन नाहीं का येऊं शकणार ?"... गावात दोन तास हिंडून मी त्याच्याजवळ पुन पोहोंचलें तेव्हा त्याने लहान लहान सहा आण्याचीं पुस्तकें घेतलीं.

जवळ च पानाचा एक ठेला होता. एक सद्गृहस्थ तिथें विडा चघळत उभे होते. मीं त्याना एक रुपयाचें ' गीता प्रवचनें ' दाखवलें. पाच सात मिनिटें चाळून त्यानीं त माझ्या हातीं परत दिलें. खिशातून सिगरेटची डबी काढीत ते म्हणाले, " पाहू, विचार करू." तेवढ्यात पान विकणाऱ्यानें म्हटल, " अप्पा, जरा दाखवाल का तें पुस्तक ? विनोबाजी त्यावर सही देतात ना ? " त्यान एक रुपया काढून तें पुस्तक घेतलें. कदाचित् त्याची ती साऱ्या एका दिवसाची कमाई असेल.

एका घरात दागिन्यांनीं मढलेल्या स्त्रिया म्हणत होत्या, " आम्हाला वाचायला कुठें यतें ? " मीं म्हटलें, " कुणाकडून तरी वाचवून घ्या " तर उत्तर मिळालें, " पण आमच्याजवळ दोन आणे सुद्धा नाहींत." दोन आण्याचीं पुस्तक विकत घेण्याचा हि अधिकार नव्हता त्याना. त्यांच्या त्या मूल्यवान् दागिन्याकडे पाहताना माझ्या मनात विचार आला, ह्या सुवर्णमय बेड्या तोडल्याशिवाय आपण मुक्त होऊं शकणार नाहीं हें ह्यांच्या कधीं लक्षात येईल !

दुपारीं नई तालीमच्या शिक्षकांची सभा झाली. बाबांनीं त्यांच्या हातीं कातीचा झेंडा दिला. "आज जी समाजरचना आहे ती व नई तालीम याच्यामधें पूर्ण विरोध आहे. कुणी असें समजत असेल कीं नई तालीम हा शिक्षणाचा एक प्रकार आहे, उद्योगाच्या द्वारा शिक्षण देण्याची पद्धति आहे, तर तो समज साफ चुकीचा आहे. नई तालीम नवा समाज निर्माण करील. त्याशिवाय ती जिवत राहू च शकत नाहीं. आज समाजात दर्जे निर्माण झाले आहेत. योग्यतेनुसार कमी जास्त पगार दिला जातो. नई तालीम ह्याला तिलांजलि देईल. पगाराचा सबंध भुकेशीं आहे. ज्याला जेवढी भूक असेल तेवढें खाणें त्याला मिळालें च पाहिजे. प्रत्येक जण आपआपल्या योग्यतेनुसार आपली सेवा समाजाला अर्पण करील. सेवा ही नैतिक वस्तु आहे. त्याचें मूल्य पैशात मापलें जाऊ शकत नाहीं. नई तालीम-मध्यें शरीरपरिश्रम व मानसिक परिश्रम दोहोंची योग्यता समान मानली जाईल. शरीरपरिश्रम केल्यावाचून खाण्याचा कुणाला हि अधिकार राहणार नाहीं. प्रत्येकाला शरीर व बुद्धि याच्या विकासाची संधि मिळाली पाहिजे."

रात्रीची प्रशान्त वेळ होती. शेजारच्या तलावाची व पहाडाची सुंदरता न्याहाळत गच्चीवर आमची पंगत बसली होती. व्यासजी आणि मंगला-मावशी प्रत्येकाला प्रेमानें खाऊ घालीत होत्या. चंद्र नव्हता पण त्याची उणीव चमकणाऱ्या चांदण्या भरून काढीत होत्या. एकीकडे वडील मंडळींचें वात्सल्य मिळत होतें व दुसरीकडे गौतम, तिनु ह्या लहान मुलांशीं सुखद हास्यविनोद सुरु होता. गौतमाला वाटतें आम्हीं देखील त्याच्याबरोबर पोर बनावें. कुसुमताई व निमाताईच्या लेखणीवर तो अतिशय रुसलेला. त्याला वाटतें, ही लेखणी नसती तर ह्या दोघी आपल्याबरोबर खेळतील, उड्या मारतील, भटकतील.

अठरा एप्रिलचा दिवस उजाडला. पहाटेची प्रार्थना व अध्ययन आटोपून आम्ही साडेपाचच्या सुमारास गावात प्रभातफेरीला निघालों. 'सब भूमि अरे भाई गोपाळकर । भूमिदान देइ, हुअ दानवीर ' हें भूदान-गीत म्हणत आम्ही चालू लागलो. निवासरभाई टोळीचा प्रमुख बनला होता. आपल्या पक्ष्यासारख्या सुरेल आवाजानें तो गावाला जागें करीत होता. गावाचा मुख्य चौक येता च जयघोष झाला ' महात्मा गांधी की

जय ! ' ह्या जयघोषाचें महत्त्व आज विशेष च प्रतीत झालें. कारण आज च दलित व पीडिताना सजीवनी देणारे बापूचें स्वप्न साकार करण्याकरता देशात सेवकाच्या टोळ्या फिरत होत्या. म्हणून च आम्ही भारतवासी आज मुक्त मनानें महात्म्याचा जयघोष करू शकत होतों. त्याचें काम न करता त्याचे नाव घेण्याचा अधिकार प्राप्त च होत नाहीं.

कार्यकर्त्यांच्या सभेत बाबा म्हणत होते, "तुम्हाला ही हिंमत बाळगली पाहिजे कीं, *आम्ही साम्ययोगी समाजाची स्थापना करू. मग सारें जग* ह्याच्या विरुद्ध का असेना ! हा एक सत्य विचार आहे आणि ह्याच्याकरता आम्ही आमचें जीवन अर्पण करू. अहिंसेत ही शक्ति आहे कीं सारें जग बुडत असलें तरी एकटा अहिंसक मनुष्य पोहू शकतो व वाचू शकतो. हिंदुस्थानच्या लोकामध्ये ही श्रद्धा आहे. अहिंसेंत जी शक्ति त्याना वाटते ती हिंसेंत त्याना वाटत नाहीं. हिंदुस्थानचे लोक राक्षसी शक्तीमध्ये शरीरानें मजबूत बनतील अशी आम्ही मुळीं च आशा करीत नाहीं. मात्र ते आत्मिक शक्तीमध्यें चागले च मजबूत होऊ शकतात."

कार्यकर्त्यांच्या सभेतून मी बाहेर पडलें. बागेतल्या एका झाडावर घरट्यात पक्षीण पिल्लाना चारा घालीत होती. तो चारा खाऊन तीं पिल्लें धष्टपुष्ट होतील व गगनात स्वैर सचार करतील. तिकडे बाबा आमच्या आत्म्याला ज्ञानाचा आहार घालीत आम्हाला शक्तिशाली करीत होते. मग हे मानव पक्षी साऱ्या दृश्य जगतात च नव्हे तर अदृश्य जगात हि विहार करू शकतील !

' उपनिषदा 'च्या वर्गात बाबा जोरजोरानें हात आपटून म्हणत होते–

' तवैव वाहास्तव नृत्यगीते । '

सहा वर्षांचा कोवळा नचिकेत यमराजाला निर्भयतेनें हें वाक्य बोलत होता. यमराजानें त्याच्यासमोर सारीं प्रलोभनें ठेवलीं होतीं — जगताचें आधिपत्य, अपार सपत्ति, मर्त्यलोकातील दुर्लभ उपभोग, पण नचिकेत म्हणत होता, ' तुझे ते घोडे, नृत्यगीत आपल्याजवळ च असू दे. मला तर फक्त ज्ञान पाहिजे.' हे सारे उपभोग आजच्याकरता भाव आहेत, उद्याचे ते अभाव होतील, ते उद्या राहणार नाहांत. ' श्वो भावा ' ह्या

शब्दावर आमची गाडी अडली. आमच्यांतील कांहींना त्याचें उच्चारण नीट जमेना. बाबानीं तासभर तो च शब्द म्हणायला लावला.

क्रांतिदिवसाच्या सभेंत देशभर गंभीर प्रतिज्ञा करण्याचा कार्यक्रम होता. इकडे हि आज बाबाच्याबरोबर सारी सभा उभी होती. बुबुभाई प्रतिज्ञा-पत्रातील एक एक वाक्य उच्चारत होते व आम्ही सारे त्याचा पुनरुच्चार करीत होतों.

बाबानीं प्रथम लहानसें भाषण केलें, "फलदाता परमेश्वर आहे. पण तो बघतो कीं भक्त प्रामाणिकतेने काम करतो कीं नाही." आज ह्या च मुहूर्तावर सेवाग्राम आश्रम बंद झाला. त्याचा उल्लेख करताना ते म्हणाले, "ही काहीं साधारण, मामुली घटना नाहीं. गांधीजी जिथे राहत होते ते देशाचे एक श्रद्धास्थान आहे. तेथील मंडळी भूदानाकरता बाहेर पडतात तेव्हा तें देशाकरता एक आवाहन च होतें. आज आमच्या अहिंसेची कसोटी होत आहे." भूदानाच्या कार्यकर्त्यांना बेदखलीचा प्रश्न हातीं घेण्याचा आदेश देऊन ते शेवटीं म्हणाले, "आत्म्यात सत्यसंकल्पाची शक्ति असते. त्या शक्तीनें च जगातला सारा कारभार चालू आहे. महान् कार्याकरता आम्ही नेहमीं सामूहिक प्रतिज्ञा करतो. आजच्या भाषेंत त्याला च सामूहिक इच्छा शक्ति म्हणतात. ती शक्ति जिथें प्रकट होते तिथे शुभ कार्य सफल होते."

वाटलें, जणु बापू साक्षात् त्या जागीं उभे होते. ते पाहत आहेत, ऐकत आहेत नी आम्हाला आशीर्वाद देत आहेत. त्या एकाकी पथिकाच्या अविराम तपस्येमुळें आज सहस्र कंठातून भूमिक्रान्तीच्या प्रतिज्ञेचें उच्चारण होत आहे. उद्या सहस्राचे लाख होतील व लाखाचे कोटि होतील. मानवमात्र ह्या सत्य धर्माची दीक्षा ग्रहण करील. मग अति वेगानें फिरणारें धर्मचक्र त्या अति प्रचंड गतीमुळें स्थिर असल्यासारखें भासेल. नित्य प्रकाशणाऱ्या सूर्याची, नित्य वाहणाऱ्या गंगामाईची नित्यता जितकी स्वाभाविक वाटते तितकी च क्रांति देखील स्वाभाविक नी सहज भासेल.

## : ४९ :

## ' यंत्र बंद पण यंत्री शाबूत '

टागासाही, नयागड
१९-२१ एप्रिल '५५

गाव जवळ येऊं लागले आहे हे दुरून ऐकूं येणारे ढोलक सांगत होते. बाबा म्हणाले, " हे तर रणवाद्य दिसतय् ! " कुणी तरी म्हणाले, " दारिद्र्य आणि विषमतेविरुद्ध अहिंसक युद्ध सुरू झालय् ना ? " बाबा हसून म्हणाले, " युद्ध आहे खर, पण ह्या युद्धात रक्ताचे पाट वाहणार नाहींत." ह्या युद्धात प्रत्येक हृदयात वास करणाऱ्या रावणाचा वध होणार आहे, तो जळून भस्म होणार आहे. अर्धनग्न खेडूत जोरजोरानें ढोलक बडवत गावच्या वेशीवर पोहोंचले आणि उच्च स्वरात जयघोष करूं लागले, " आमगारे भूमिहीन रहिने नहीं, रहिने नहीं, "—सामूहिक इच्छाशक्ति प्रकट होत होती.

एका वृक्षहीन पहाडाच्या पायथ्याशीं असलेल्या झोपड्यात आजचा निवास होता. भोंवतालीं आंब्याचीं झाडें असलेला स्वच्छ तलाव होता. त्यात स्नान करण्याचा आनंद लुटला. जवळ च टेकड्यांच्या रांगा असतांना गौतमला कसे स्वस्थ बसवणार ? सभा संपतां च तो धांवत आला नी म्हणाला, ' आतां मी तुमचें मुळीं सुद्धां ऐकणार नाहीं. तुम्हाला टेकडीवर यावें च लागेल. ' नी तो जो पळत सुटला तो शिखरावर जाऊन च त्यानें श्वास घेतला.

चोहोंकडे वीस पंचवीस लहान लहान तळीं होतीं. गोरज मुहूर्त झाला होता. गायीबैलांच्या गळ्यातील घंटानाद ऐकूं येत होता. उंच टेकडीच्या माथ्यावर उभे राहिल्याने लहानशा गावच्या विरळ विरळ झोपड्या, लाल मातीचे नागमोडी वळणाचे रस्ते, गाय, बैल सारें कसे खेळासारखें भासत होतें. सारे जग हा हि एक खेळ च तर आहे. सूत्रधार परमेश्वराचा खेळ चालू आहे. आम्ही सारीं त्याचीं खेळणीं आहोंत.

सूर्य बुडूं लागला होता. महाराष्ट्र सेवादलाच्या एका सैनिकानें गायला आरंभ केला— " सब भूमि गोपालकी, गर्जत जन चालले." सारे त्याला

चहा देऊं लागले 'पडता एकाकी पाऊलें.' चहा देणाऱ्यांत मुंबईचा ध्येयनिष्ठ तरुण श्रीरंग देशपांडे होता, ज्ञानाच्या शोधार्थ घरदार सोडून बाबाजवळ आलेला मध्यप्रदेशचा सुविज्ञ बाळ टेंभेकर होता, गौतम होता आणि संगमनेरची लीला व मेहेर या नवविचारांनी अभिमंत्रित झालेल्या तरुणी होत्या. नव्या जोमाच्या, नव्या दमाच्या ह्या उत्साही तरुणांना अखेरच्या किरणांनी आशीर्वाद देऊन सूर्यनारायणानें जगाचा निरोप घेतला. बाळला बाबांचा बिछाना तयार करायचा होता. श्रीरंगाला दिवस-भराच्या साहित्यनिर्मितीचा हिशोब करायचा होता, मला हि एक लेख लिहायचा होता, म्हणून आम्ही सारे गात गात खाली उतरलो.

ते अधिक महान् असतात. मानवाच्या डोळ्याना सूर्यकिरणांतील सात रंग दिसतात परंतु त्या हि पेक्षां अधिक परिणामकारी अल्ट्रा-व्हायोलेट सारखे जे रंग असतात, ते मानवाच्या डोळ्याना दिसत नाहींत."

उपनिषदाच्या वर्गाची वेळ होत आली होती. कुणी श्लोक पाठ करीत होते तर कुणी त्याचा अर्थ वाचीत होती. तेवढ्यात बुलुभाई हातीं वर्तमान-पत्र घेऊन आले. महान् शास्त्रज्ञ आइन्स्टीनवर काळानें झडप घातली होती. १८ एप्रिलच्या दिवशीं आम्हाला अव्यक्त शक्तीचें अस्तित्व भास-मान होत होतें, त्या च दिवशीं ते त्या शक्तीमध्यें लीन झाले होते. ही बातमी ऐकून मन उदास झालें. आजच्या भयाच्या व अविश्वासाच्या वातावरणात मानवाचा विवेक-दीप मालवू पाहत असताना, आइन्स्टीनसारख्या प्रज्ञावान् ऋषीची, मानवाला अचूक मार्गदर्शन करू शकणाऱ्याची, अत्यंत आवश्यकता होती. ते कधीं भारतात आले नव्हते किंवा बापूना भेटले हि नव्हते. पण सतत आपल्या प्रयोगशाळेंत निमग्न राहणाऱ्या या द्रष्ट्याच्या डोळ्यांना हें दर्शन झालें होतें कीं, 'पुढें येणाऱ्या पिढ्याचा ह्यावर विश्वास बसणार नाहीं कीं महात्मा गांधींसारखा महान् मानव मानवदेह धारण करून पृथ्वीवर चालत होता.'

उदास मनानें आम्ही वर्गाकरतां बाबांच्या खोलींत जाऊन बसलों. बाबा सत्यदर्शन करवीत होते.

'तस्मिन् अपः मातरिश्वा दधाति।'

प्रकृतिमातेच्या अंकावर खेळणारा प्राण त्याच्या न सत्तेवर चळवळ करीत असतो. आम्ही मूर्ख लोक समजतों कीं, प्राणवायूची हालचाल बंद झाली म्हणजे मनुष्य मरतो. आज हे लोक म्हणतात, आइन्स्टीन मेला. पण त्याना एवढें कळत नाहीं कीं, एक यंत्र बंद झालें, तो मेला नाहीं. यंत्र बंद होता च इंद्रियाची शक्ति, ज्ञानशक्ति काम करू शकत नाहीं. परंतु आत्मा तर सदा जिवंत च असतो. तो निराकार रूपात रूप काम करतो, पण आपण त्याला पाहू शकत नाहीं. सारें जग चालवणारी शक्ति अव्यक्त असते. आमची हि ओळखण्याची एक शक्ति आहे. एखादी वस्तु त्या शक्तीच्या पलीकडे गेली म्हणजे आपण म्हणतों कीं सारें संपलें. बीज

मातींत मिसळलें तर लहान मुलाला वाटतें बीज मरून गेलें. पण तें बीज जमिनीच्या आत काम करीत असतें. त्याला अंकुर फुटला म्हणजे च आपण समजतों कीं तें प्रकट झालें. पण ते तर आधींपासून च तिथें होतें. आत काम करीत असताना तें इतकें विकसित झालें कीं, आमचे डोळे त्याला आता पाहू शकतात. म्हणून हें लक्षात ठेवलें पाहिजे कीं, यंत्र बंद पडलें तरी यंत्रीचें काम चालू असतें.

---

## : ५० :

## चतुर्भुज

गोदीशाही, नदीघर, ओडगा
२२–२४ एप्रिल '५५

जंगली प्रदेश आणि लहानसें गांव. नेत्रसुख भरपूर मिळत होतें. त्याच्या च जोडीला लाल मुंग्या, डास, उधई हें सारें मित्रमंडळ होतें च. त्याने हें सहन करावें लागत. तबूत बसून लिहिणें कठीण होऊन बसलें. मुंग्याना वाटलें असेल कीं, चार-पाच झाडें जास्त निर्माण झालीं असतील.

मुक्कामावर पोहोंचता च बाबा स्वागतार्थ जमलेल्याना 'समस्तु प्रणाम' (सर्वांना नमस्कार) म्हणतात. आज हि त्यांनीं असा नमस्कार करून गर्दीतील एका माणसाच्या खांद्यावर हात ठेवला व त्याला म्हणूं लागले, 'जमी देवाकु हबे' (जमीन द्यावी लागेल हं!) तो नटवर् म्हणाला, "हो तर! माझ्याजवळ २२ डेसीमल जमीन होती त्यातली ११ डेसीमल मीं पूर्वी च दिली आहे." या जगन्नात हि लोक पोहोंचे आहे असें दिसतें. त्या माणसाचें कौतुक करीत बाबा म्हणत होते, 'भारतीय हृदय धर्माची मागणी नटवर् कबूल करतें.'

आजच्या सभेंत भूमिदानाची संख्या जास्त होती. त्याना आशीर्वाद देऊन बाबा म्हणाले, "मला असें वाटतें कीं, भूमिदानांनीं मिरवणुका काढाव्या, गांवोगांवीं जावें आणि भूमिहीनाना माझा संदेश प्रेमपूर्वक सांगावा व

जमिनीची मागणी करावी. आपआपल्या गावी जाऊन तुम्ही हे काम करा.'' सभा सपता सपता पावसाची जोरदार सर आली. अरण्यवासी शांतपणे त्या धारेखालीं उभे होते. अवतीभवतींचीं झाडें व पहाड हि निश्चल उभे होते.

नदीघरच्या प्रवचनात अभेदनीति समजावून सागताना बाबा म्हणाले, "माझी अशी इच्छा आहे कीं, गावच्या भूमिहीनानी उठून उभें राहावें आणि निर्भयतेने आपली मागणी माडावी तसें च मला असें हि वाटते कीं भूमिमालकानीं आता त्याची वाट न पाहता आपणहून पुढें यावें व म्हणाव कीं आम्ही आमच्या मालकीचा त्याग करतों. कृपा करून आमच्या जमिनीचा हिस्सा घ्या आणि आमच्यावर उपकार करा. तुम्हाला बीबियाणें हवें असेल तर आम्ही देऊ. बैल देऊ. दोन्ही हात जुळले म्हणजे नमस्कार होतो, माझी हि तशी च इच्छा आहे कीं एकीकडून भूमिहीनानीं यावें व दुसरीकडून भूमिवानानीं यावें आणि परमेश्वराला नमस्कार करावा. आज दोघाचे हि हात जुळत नाहीत. एक आपली मालकी त्यागील व दुसरा आपली गुलामी सोडील तर च दोघाचे हि हात एकमेकाच्या जवळ येतील, परमेश्वराला प्रणाम केला जाईल आणि भक्तिमार्गाची स्थापना होईल.''

बाडुग परिषदेच्या बातम्या रोज येत आहेत. त्या परिषदेंत भारताचे प्रथम सेवक प. नेहरू यानीं दोन महत्त्वपूर्ण मुद्दे आपल्या भाषणात माडले होते. "जगात युद्ध झालें तरी हिंदुस्थान त्यात भाग घेणार नाहीं, परन्तु आपल्या देशाचें रक्षण तो अवश्य करील. मी हें जे बोलतों आहे तें कुठल्या हि बाँबच्या बळावर बोलत नाहीं. भारतीय जनतेवर माझी जी श्रद्धा आहे, विश्वास आहे, त्या च बळावर मी हें बोलत आहें.''

ओडग्याला ह्याचा उल्लेख करून बाबानी मूलग्राही विचार माडले. "भारताच्या इतिहासात ही घटना कुठें आढळत नाहीं कीं भारतानें दुसऱ्या कुठल्या देशावर आक्रमण केलें आहे चक्रवर्ती सम्राट् समुद्रगुप्त असो कीं श्रीहर्ष असो, कुणीं हि कधीं हि बाहेरच्या देशावर आक्रमण केलें नाहीं. परन्तु आम्ही हिंसक युद्धात भाग घेणार नाहीं एवढें बोलून अहिंसेचें बळ वाढत नाहीं. कारण ती अभावात्मक ( negative ) गोष्ट झाली. अहिंसेकरता काहीं तरी

भावात्मक ( positive ) काम केलें पाहिजे त्याकरता आपल्या देशात जी आर्थिक व सामाजिक विषमता आहे तिचें निराकरण अहिंसेच्या मार्गानें करावें लागेल. आमचे प्रधानमंत्री साऱ्या जगभर हिंडून शांति व अहिंसचा संदेश देत आहेत. त्याबरोबर च ते हें सांगूं शकतील कीं माझ्या देशातील आर्थिक व सामाजिक समस्या आम्हीं शांतीच्या व अहिंसेच्या मार्गानें सोडविल्या आहेत तर त्याच्या वाणीचें बळ किती वाढेल ?"

दुपारीं कार्यकर्त्यांची सभा पार च रंगली. एकेक जण उत्साहानें उठून उभा राही व नम्रपणें प्रतिज्ञा करी, 'भूदानाचें कार्य सफल होईपर्यंत आम्ही ह्या च कार्यांत रत राहूं, मग्न राहूं ह्यात जर आम्ही चुकूं तर देवा-समोर गुन्हेगार ठरूं.' सिंदकीवाटे दिसणाऱ्या अचल पहाडाना कार्यकर्त्यांच्या उत्साहाचें श्रेय मिळालें बाबा विनोबानें म्हणाले, "इथली हवा गरम दिसतेय. आजूबाजूला पहाड आहेत म्हणून इथले लोक जरा दणकट, बळकट व पुरुषार्थ करणारे दिसतात." साऱ्याना मोठी गमत वाटली. मग बाबा गभीरपणें म्हणाले —

'गेयं गीतानामसहस्रं ध्येयं श्रीपतिरूपमजस्रम् ।
नेयं सज्जनसंगे चित्तं देयं दीनजनाय च वित्तम् ॥'

यात मुख्य चार गोष्टी आहेत त्या शंख, चक्र, गदा, पद्म सारख्या आहेत. गीतेचें नाव घ्या, परमेश्वराच्या रूपाचें ध्यान करा, सत संगतीमध्यें रहा व दीनजनाना दान द्या. हीं चार हि शस्त्रें तुमच्या हातीं आलीं आहेत तुम्हाला असे चतुर्भुज करून मी पाठवत आहें '



: ५१ :

## आपले प्रश्न सोडवा म्हणजे जगाचे प्रश्न सुटतील

रोहीगाँऊ, कराचुली, कराडवाडी
२५–२७ एप्रिल '५५

'आग लागली रानाला पळसाला ग बहर आला'—वार्टेन भोवतालचे दृश्य पाहून ही कविता आठवली. साऱ्या रानाला आग लागल्यासारखी दिसत होती. जिकडे तिकडे पळसाची लाल लाल फुलें फुलली होतीं. उगवत्या सूर्याचीं कोवळीं किरणे त्या लाल लाल फुलाना हळू च स्पर्श करीत होतीं. अध्ययनाची वेळ झाली. पळसाच्या रानात बाबाच्या भोंवतीं सारी मडळी बसली.

आज भागवताचे अध्ययन सपणार होतें. कृष्ण निजधामाला जाण्याचा प्रसग होता. सुरवातीपासून च बाबाच्या डोळ्याला धार लागली होती. रुमालानें डोळे पुसत पुसत बाबा वाचत होते. पण शेवटीं कवीचें वाक्य आलें, 'आता मी अनाथ झालो.' बाबाना जोराचा हुदका आला. आतापर्यंत कसेबसे अडवलेले अश्रू एकदम धबधब्यासारखे बाहेर पडले, बाध फुटला. हातातले पुस्तक त्यानीं खालीं टाकले, पुढें त्याना वाचवेना. दुपारीं उपनिषद्-वर्गात ते म्हणाले, "भक्त आणि ज्ञानी याच्या भूमिका भिन्न भिन्न असतात. ज्या क्षणीं भक्ताला ही जाणीव होते कीं साऱ्या जगाला एकत्र गुफणारा धागा तुटला त्या क्षणीं तो स्वत.ला अनाथ समजतो. भागवताच्या अतिम अध्यायात श्रीकृष्ण जेव्हा निजधामाला जातात तेव्हा कवीला अशी च अनुभूति होते. परतु जो ज्ञानी असतो त्याला हें समजतें कीं, प्राणाची हालचाल बद झाली तरी हि जगाला गुफणारा, ओंवणारा, धागा कधीं हि तुटायचा नाहीं."

जुईच्या नाजूक फुलाचा गोड सुगध व करवदासारख्या एका लहान फळाचा सुस्वाद चाखत आजची रम्य वाट सपवली. ओरिसा व आध्रच्या सीमेवरच्या गजाम जिल्ह्यात आम्ही आता प्रवेश करीत होतों.

पुण्यामुबईकडील मराठी जशी शुद्ध समजली जाते तशी ह्या जिल्ह्यातील

ओडिया विशेष शुद्ध समजली जाते. हा जिल्हा ओरिसाचें सांस्कृतिक केंद्र आहे. आज इथल्या खाद्यपदार्थांत दक्षिणची छाप आढळली. नास्त्याला ' इडली ' व ' उपमा ' मिळाली, तर जेवणात ' सांबारम् ' आणि तीन चार प्रकारच्या चटण्या होत्या.

कराडगाडीला नित्याप्रमाणे आमचा शरीरपरिश्रमाचा कार्यक्रम सुरू होता. पोळ्या लाटण्याचें काम तीन चार भगिनी करीत होत्या. त्या शेकण्याचें काम बुटुभाई व निर्मला करीत होतीं. आम्ही भाजीच्या ढिगा-जवळ चिरण्या घेऊन बसलों होतों. विहिरीचें पाणी काढून कावडी भरून आणण्याच्या कामात काहीं साथी जुपले होते. काम करता करता ओडियाचें अध्ययन हास्यविनोदासह सुरू होतें. कावडी वाहणारे साथी ऐटींत उपनिषदाचे श्लोक म्हणत होते. रोजच्यापेक्षा आज जरा जास्त काम पडलें असें वाटेनें म्हणून मगलाभावशींनीं आम्हाला गोड ताडफळें आणून दिलीं.

काल बाबांनीं उपनिषदाच्या वर्गात शंकराचार्यांचा एक श्लोक सांगितला. त्याचा आशय असा होता कीं, " आपल्या भुकेला आजार समजून त्याची चिकित्सा करा आणि भिक्षेंत जें अन्न मिळेल, तें औषध समजून त्याचें सेवन करा." त्याचें विवेचन करताना बाबा म्हणाले, " आपल्या जीवनात शिस्त व नियमितता आली पाहिजे. हिंसेमध्यें शिस्त व योजनेची जरूर असते, परंतु अहिंसेंत त्याची त्या हि पेक्षा अधिक जरूर असते."

मग आज रात्रीं जेवणानंतर यात्रीदलाची बैठक झाली व सर्वांनीं मिळून आपलें जीवन नियमित बनविण्याची योजना केली. बाबा कधीं कधीं विनोद करतात, " घटी ऐकूं येता च त्या क्षणीं च उठलें पाहिजे टाइपरायटरवर ' कु ' अक्षर टाइप झालें, ' ष्ण ' टाइप व्हायचें राहिलें असेल, तरी तेवढें हि सोडून पळालें पाहिजे. जेवणाच्या घटीला तर यमराजाची च घंटी समजा. आपण यमराजाला असें कधीं म्हणतों का कीं ' भल्या माणसा, जरा दहा मिनिटांचा तर अवधि दे. ' त्याचें बोलावणें येता क्षणीं च जावें लागतें ना ! "

बाडुंग परिषद् यशस्वी झाल्याची बातमी आली. एशिया व आफ्रिकेच्या एकोणतीस राष्ट्रांनीं मिळून एकमतानें दहा कलमी ठराव मंजूर केला, त्यावर समाधान व्यक्त करतांना बाबा आज भाषणात म्हणाले, " आपण आपली

पूर्ण शक्ति लावू तर दोन वर्षात साऱ्या जगात शांति निर्माण करू शकू. मनुष्याने एकदा तीव्र इच्छा केली तर तो काय नाहीं करू शकणार? आज आम्हीं जी बातमी वाचली त्याने आम्हाला फार मोठे बळ मिळालें आहे. आमच्या कार्यानें हि साऱ्या जगाला बळ मिळेल. शेवटीं जगात शांति स्थापन कोण करणार? जगाला निर्माण करणारा आहे तो च करील. पण आम्ही त्या कामात मदत करू, ईश्वराच्या हातातील साधन बनू. वानरानीं नाहीं का रामाचें काम केलें? त्याकरता पहिलें पाऊल म्हणून या आपल्या गावाची समस्या सोडवू हे नेहमीं ध्यानात असू द्या कीं ज्यानें आपला प्रश्न सोडवला त्यानें जगाचा प्रश्न सोडविला."

बाबाचे नेहमींचे म्हणणे आहे कीं माझे काम हवा च करणार आहे. सभेच्या सुरुवातीला गावच्या एका सज्जन गृहस्थानें बाबाच्या स्वागताच्या निमित्तानें एक लहानसें भाषण दिले "मी माझ्या जमिनीचा सहावा हिस्सा विनोबाजींच्या चरणीं अर्पण करीत आहें. दरिद्रनारायणाच्या सेनेचे काम माझ्या च बरोबर माझे इतर भाईबंद हि करतील आम्ही सारे मिळून साऱ्या गावच्या जमिनीचा सहावा हिस्सा देण्याची जबाबदारी उचलीत आहोंत. भूदानाच्या मार्गानें गेल्यास जागतिक शांति निश्चित स्थापन होईल." त्या गृहस्थाची पाठ थोपटीत बाबा म्हणाले, "खेड्यातील लोकाना देखील क्रातीचा विचार कळला आहे, हें एक शुभ लक्षण आहे."



## : ५२ :

## चांडुंगची दशसूत्री

बुगुडा, बालीपदर
२८ ३० एप्रिल '५५

जगलाची वाट चालत असताना बाबानीं विचारलें, "एके काळीं नागपूरचे लोक उत्कलमध्यें आले होते हें माहीत आहे का?" मीं हळूच म्हटलं, "हो, नी आज हि इतिहासाची पुनरावृत्ति होत आहे." तें ऐकता च बाबा म्हणाले, "पण त्या काळच्या लोकाना घोड्यावर स्वार होऊन, हातीं तल्वार घेऊन यावें लागे. तें त्याचें आक्रमण होतें आणि हे आपलें चक्रमण आहे बुद्धानें ह्याला चंक्रमण म्हटलें आहे." आमच्या चुनीअप्पा कित्येकदा थट्टेंत म्हणतात, "त्या काळीं मराठे इथें 'चौथ' (चौथा हिस्सा) वसूल करायला येत पण हा मराठा सहावा हिस्सा घ्यायला आला आहे."

मराठ्यानीं एके काळीं उत्कलवर राज्य केले होतें. हातीं तलवार घेऊन येणाऱ्याविषयीं प्रेम नव्हे तर दहशत निर्माण होते इकडे आया मुलाना भीति दाखवीत म्हणतात, 'झोप लवकर! तो मराठा आला बघ!' ओडिया डिक्शनरींत काहीं मराठी लोकानीं रूढ केलेल्या म्हणी आहेत. त्यातील एक म्हण अशी आहे कीं, 'प्रजा आणि आलें ठेचून काढलें म्हणजे त्यातून रस मिळतो'. हें वाचून बाबाना फारच वाईट वाटलें.

परतु आज जणू त्या अन्यायाचें परिमार्जन होत आहे. आक्रमण आणि चक्रमण मधील फरक सूर्यप्रकाशाइतका स्पष्ट दिसत आहे. घोडदळाऐवजीं पद यात्रा दल, तलवारीच्या जागीं वीणा आली आहे द्वेषाची जागा प्रेमानें घेतली आहे. आक्रमक वृत्ति जाऊन सेवावृत्ति आली आहे. शातिवीणेच्या तारा छेडत, सर्वोदयाचा मधुर राग आलापीत ही यात्रा सुरू आहे. बाबा अनेकदा म्हणतात, "भूदानयज्ञाच्या वाहनावर आरूढ होऊन मी धर्म-चक्रप्रवर्तनाकरता निघालों आहे."

उपनिषद्-वर्ग खास मुलींकरता सुरू झाला होता. पण हळू हळू यात्री-

दलातील सारे च भाई वर्गाला येऊ लागले. बाप्पाचा सेवक–कुशभद्र–आपलीं सारीं कामें चटचट आटोपून वर्गात सर्वांत प्रथम हजर होई. दुपारच्या जेवणानंतर घोरत पडलेला गौतम घड्याळात दोन वाजता च ताडकन् उठून येई. बुलुभाईंना वाटे भगिनींच्या वर्गात कसें जावें, पण अखेर त्याना राहवलें नाहीं. वर्गात एका कोपऱ्यात ते चूपचाप येऊन बसू लागले. आज महादेवीताईंनीं विनोदानें बाबाना म्हटलें, "आता तर वर्गात मुलींपेक्षा मुलांची च संख्या अधिक दिसते!" बाबानीं हसून उत्तर दिलें, "स्त्री पुरुष हा भेद च मुळीं राहायला नको. तो भेद जिथें सरतो तिथून च उपनिषद् सुरू होतें."

आमच्या यात्रेंत रोज व्यासजी 'पथदर्शका'चें काम करितात. बाबापासून पन्नास यार्डांच्या अंतरावर कंदील घेऊन चालत असतात. बाबा थट्टेनें म्हणतात, 'ह्या नेताजीवर माझा फार विश्वास आहे.' दररोज पहाट प्रार्थना आटोपता च व्यासजी जाहीर करतात, "आजका पडाव .. मील दूर है, रास्ता कच्चा है।"

बुगुडाला दोन दिवस मुक्काम होता. दुसरे दिवशीं प्रार्थना आटोपता च बाबा म्हणाले, "आजका पडाव शून्य मील दूर है।" आणि मग ते त्या शून्य मैलाच्या पडावाकडे जायला निघाले. दोन मैल चालून दूरच्या एका एकान्त स्थानीं आजचें अध्ययन व ध्यान झालें.

याङ्ग परिषदेंत जो दशकलमी ठराव पास झाला होता त्यावर बाबानीं एक सूत्र रचलें आहे. आज त्याचा अर्थ सांगताना ते म्हणाले, "अशा तऱ्हेचें सूत्र असलें म्हणजे लक्षात ठेवणें सोपं जातें." तें सूत्र होतें—

'स्वाधीनता जातिसाम्यम् फलमानन्यमान्यता।
प्रक्षेपोऽनभिभावश्च अनभिक्रमणं तथा॥
शांतिनीतिः सहोद्योगः न्यायकर्तव्यपालनम्।
आत्मरक्षाधिकारश्च मद्त् चंचु निर्जितः॥'

दुपारीं येथील शिक्षक बाबाना भेटले. आज समाजात जी भिन्नता आहे, वर्गभेद आहे, त्यानें त्याना फार दुःख वाटतें असें ते बाबाना सांगत होते. बाबानीं त्याना साम्ययोगाचा पाठ दिला. "सर्व लोक अशी च

तक्रार करतात. पण विषमतेवर प्रहार करणार कोण ? तेव्हा तुम्ही शिक्षक मंडळी च आता पुढें या. तुमच्यापैकीं कुणाला कमी पगार असेल, कुणाला जास्त असेल. सर्वांचे पगार एकत्र करा आणि पुनः समानतेनें वाटून घ्या व एका कुटुंबासारखे रहा. तुमच्या उपदेशापेक्षा या तुमच्या साम्ययोगी जीवनाचा परिणाम विद्यार्थ्यांवर अधिक होईल."

सध्याकाळच्या भाषणात ह्याचा उल्लेख करताना बाबा म्हणाले, "वृक्षाला तोडून टाकायचें असेल तर मूळावर च प्रहार करावा लागेल. वरच्या फांद्या कापून काहीं व्हायचें नाहीं. आजच्या परिस्थितीमध्यें जनमत हें मूळ होय या जनमताप्रमाणें च सरकार बनतें या बदलतें पण जनमत केव्हा बदलेल ? जेव्हा मी बदलेन तेव्हा ! त्याकरता विचार समजणें पुरेसें नाहीं. तो विचार अमलात आणला पाहिजे. विचारप्रचाराचा सर्वोत्तम मार्ग आचार च होय. उपनिषद् म्हणतें,

'क्रियावान् एष ब्रह्मविदां वरिष्ठ ।'

ब्रह्मवेत्त्यामध्यें जो क्रियावान् आहे तो च सर्वांत श्रेष्ठ आहे. ऋषि पुढें म्हणतो, 'स तरति स लोकान् तारयति।' जो स्वत तरतो तो दुसऱ्याना हि तारतो."

साहित्यविक्रीकरता आम्ही रोज नास्ता करून दीड दोन तास गावात फिरतों. 'साहित्य म्हणजे अग्निकणिका' असे बाबा म्हणतात. बुगुडा एक मोठें गाव आहे. त्यामुळें तिथें शिक्षिताची संख्या बरीच आहे. प्रत्येक घरात जाऊन विचार समजाविण्याचें काम यात्रीदलातील मंडळींना फार प्रिय वाटतें. आम्हाला फार क्वचित् नकार मिळतो बहुतेक ठिकाणीं साहित्य विकलें जातें. या जिल्ह्यात आंध्र प्रदेशाच्या संस्कृतीचा परिणाम विशेष दिसतो. उत्कलच्या स्त्रियाची राहणी साधी वाटते. पण ह्या जिल्ह्यात स्त्रिया दागिन्यानीं लादलेल्या आढळतात. इथें नाकात सहा सात छिद्रें करून त्यात गोल रिंग किंवा नथ घालतात. तें दृश्य तर फार च भयानक वाटतें एवढें सारें घालून ह्या श्वास कसा घेत असतील देव जाणे ! आंध्र-प्रमाणें इथें हि डोळ्यात काजळ नी अंबाड्यात फुलें घातलेल्या स्त्रिया दिसतात. प्रत्येक घराच्या अंगणात दक्षिणेकडील पद्धतीप्रमाणें रांगोळी

घातलेली दिसते. हरिणीसारखे टपोरे पाणीदार डोळे नी रेखीव भुवया, हें येथील वैशिष्ट्य दिसलें. या स्त्रिया आम्हाला प्रश्न हि चांगले विचारीत.

अनादीभाई, निशाकरभाई पुस्तकाची पिशवी लटकवून गाणीं म्हणत जात. मग लोक त्यांच्याभोंवतीं गोळा होत. इकडून तिकडे जाणारी एखादी बस थांबली कीं हे दोघे त्यात शिरून कांहीं तरी पराक्रम करीत. बालीपदर गावात अशी च पायपीट केली. एप्रिलचा महिना. सूर्यनारायण अत्युच्चीं पदीं चढलेले. त्यामुळें नंतर थंड पाण्याच्या तळ्यात डुबताना अमृतपानाचा आनंद मिळाला. सुखाची गोडी वाढावी म्हणून च जणु दुःख निर्माण होत असावें.

सभेची वेळ होत आली. घड्याळात चार वाजले होते. बालीपदर गावच्या प्रत्येक घरातून माणसें बाहेर पडत होतीं व सभास्थानाकडे येत होतीं. म्हातारे काठीचा किंवा नातवाचा आधार घेऊन येत होते, पोरें उड्या मारत येत होतीं, गृहिणी घरचीं कामें भराभर उरकून लगबगीनें येत होत्या. पाहता पाहता हजारोंचा जमाव जमला. आतापर्यंत तेजानें व थाटानें तळपणारा सूर्य एकाएकीं ढगाआड लपला. आकाश अभ्राच्छादित झालें. वारा साथ देऊं लागता च आकाशाच्या अंगणात काळ्या मेघश्यामानें नृत्य सुरू झालें. त्याची गर्जना होऊं लागली व विद्युल्लता कडाडूं लागली. सभास्थानावर निराशेची काळी छाया पसरली. आज दर्शन आणि श्रवणावाचून च परतावे लागणार का अशी शंका लोकांना भेडसावूं लागली.

तेवढ्यात त्यांची दृष्टि बाबांच्या झोपडीकडे गेली. तीराच्या वेगानें ते सभेकडे येत होते. अत्यानंदानें जनतेनें जयघोष केला 'महात्मा गांधी की जय. संत विनोबा की जय'. विजा नी वारा ह्यांची पर्वा न करता त्यांनीं बाबांबरोबर प्रार्थना केली. वारा मोडूं लागले. वादळ सुटलें. झिमझिम पाऊस येऊं लागला. सभेंत कांहींनीं छत्र्या उघडल्या. बाबा म्हणाले, "त्यांच्याजवळ छत्र्या नाहींत तेव्हां छत्र्या बंद करा. सारे समान बनूं व ईश्वराची कृपा प्राप्त करूं." छत्र्या बंद झाल्या. भाषण सुरू झालें. शांतपणें लोक ऐकूं लागले. कांहीं वेळानंतर पुन्हां वादळ व पावसाला वेग चढला. सभेंत

पुनः हालचाल सुरु झाली. काहीं लोक पळून जाऊन जवळच्या घरांच्या छपराचा किंवा झाडाचा आश्रय घेऊ लागले. "अरे, असे भ्याडासारखे रणांगणातून पळून का जाता ?" बाबाचे हे शब्द ऐकून ते परत लागले. बाबा 'शाबास' 'शाबास' म्हणू लागले व इतर लोक टाळ्या पिटून परत येणाऱ्याचें स्वागत करु लागले.

भाषण संपल्यावर बाबांनीं उभ्या उभ्या च रामधून म्हणायला सुरुवात केली. सारी सभा त्याना साथ देऊं लागली. आकाशातून पडणाऱ्या जल-धाराच्या रुपानें ईश्वराचा च प्रेमळ स्पर्श होत होता. 'राजाराम सीताराम' ह्या बाबाच्या भजनाच्या रुपाने जणू देवाचा ध्वनि कानीं ऐकू येत होता. भक्तिरस पिऊन मस्त झालेल्या जनतेंत नेत्राना साक्षात् नारायणाचे दर्शन होत होत. बाबाची कृश मूर्ति रामधून गात गात डोलत होती. अनेक व्याख्यानानीं जें साधलें नसतें तें ह्या भजनानें झालें. तें गोड दृश्य पाहून शेजारच्या देवळातील देव दगडी मूर्तीमध्यें बंदिस्त राहू शकला नसावा. भजन संपलें. एकेक गावकरी व्यासपीठाकडे येत होता आणि 'काळजाच्या तुकड्याच' एकेक फूल दरिद्रनारायणाच्या मूर्तीला वाहत होता, 'गीता प्रवचना'चा प्रसाद घेऊन परत जात होता.

पाऊस पळाला. सृष्टि ताज्या फुलासारखी हसू लागली. काळे, पांढरे ढग पहाडाशीं लपंडाव खेळत होते. गार गार वारा वाहात होता. पहाडाचीं शिखरें बोलावू लागलीं. त्याना साद घालणार तों च 'यमराजाची घंटी' ऐकू आली. त्यामुळ पाय भोजनगृहाकडे वळले नी मन मात्र पहाडाची चढण चढू लागले

## : ५३ :

# एका वाकिलाचीं दोन रूपें

भटनई, आस्का, पीतळ
१-३ मे '५५

आज 'मे दिन' ( May Day )! जगातल्या मजुराचा, श्रमिकाचा दिवस. तीन वर्षांपूर्वी उत्तर प्रदेशच्या यात्रेत फैजाबादला ह्याच दिवशीं बाबांनीं घोषणा केली होती, "भूदान मजदूर आंदोलन है। देहातके बे जमीन और बे-जबान मजदूरोंकी आवाज मेरे मुखसे प्रकट हो रही है।"

आकाश फाटल्यागत पाऊस धो धो पडत होता. मुसळधार वृष्टींत हि बाबा सभास्थानाकडे जात होते. ते पाहून घरातील ओसऱ्याचा व पडव्याचा आसरा घेतलेले काहीं लोक या दिशेनें पळत येऊ लागले. सभेंत बुडबुडाईचें दणदणीत व्याख्यान सुरू होत. सारी सभा उभी होती. बाबाना पाहता च जनतेनें जयघोष केला, 'भूमि काहार। जे चासिबे ताहार।' (जमीन कुणाची? जो जोतेल त्याची). व्यासपीठावर पावसाचा त्रास जरा कमी होत होता. म्हणून बाबा तें सोडून जनतेमध्ये जाऊन उभे राहिले. प्रार्थना संपून बाबा म्हणाले,

"आकाशाच्या अभिषेकाखालीं झालेली आपली ही सभा तुमच्या जीवनात क्रांति करणारी ठरो. आज आपण इथें कुठले हि भेदभाव न ठेवता प्रार्थना केली, तद्वत् च आपल्या जीवनात हि कुठला च भेदभाव ठेवू नका. परमेश्वर पावसाच्या रूपानें आपल्याला धडा देत आहे. झाड, पहाड, जमीन, समुद्र ह्या सर्वांवर पाऊस समान भावानें पडतो. गरिबाच्या शेतात पडतो, श्रीमंताच्या शेतात हि पडतो. तो भेद करीत नाहीं. आपण हि सारे प्रेमानें, सलोख्यानें भाऊ भाऊ म्हणून राहू. गावाचें एक कुटुंब करायचं आहे. गावची जमीन व संपत्ति गावच्या मालकीची करायची आहे."

गरीब श्रीमंत, भूमिवान भूमिहीन, लहान थोर सारे त्या वृष्टींत शांतपणें उभे राहून प्रवचन चिंतनें ऐकत होते. म दिनाच्या सान्निध्यांत च सभा झाली ती.

'ईशावास्य'चा आठवा श्लोक सुरू होता. त्यात आत्मज्ञानी पुरुषाचें

वर्णन आहे. "सः प्रत्यगात्, शुक्रम्, अकायम्, अव्रणम्, अस्नाविरम्, शुद्धम्। अपापविद्धम्, कविः, मनीषी, परिभूः, स्वयभूः, याथातथ्यतः, अर्थान्, व्यदधात्, शाश्वतीभ्यः, समाभ्यः।

'त्यानें शाश्वत काळपर्यंत टिकणारे सर्व अर्थ यथावत् साधले.' कारण त्यानें आपल्या जीवनात आत्म्याचा अनुभव घेतला. शुक्र अकाय अव्रण अशा परमात्म्याला त्यानें घेरून टाकले. म्हणजे त्याच्या अवतींभवतीं चोहोकडे ईश्वर च ईश्वर आहे असें म्हणण्याऐवजीं ईश्वराच्या भोंवतीं तो आहे, असें म्हटलें ही भाषा जरा पुढें गेलेली आहे. तुकारामानें म्हटले आहे—

जेथें जेथें जाशी तेथें मजसी च पाहसी।
ऐसा पसरीन भाव रिता नाहीं कोणी ठाव।

मी आपला भाव असा व्यापक पसरवीन कीं हे परमेश्वरा, तू जिथें जिथें जाशील तिथें तिथें मला च पाहशील. एक हि स्थान मी रितें ठेवणार नाहीं. म्हणजे परमेश्वराला सगळीकडे तुकारामाचें च दर्शन होणार.

चित्त जडलें पाई पाळती हें ठाईं ठाईं।
तुका म्हणे पोटीं देवा घालून सांगे गोष्टी॥

परमेश्वराला आपल्या पोटात घालून, त्याला पचवून, आपल्यात सामावून तुकाराम गोष्टी बोलत आहे. म्हणजे तुकाराम इतका व्यापक बनला कीं त्याने परमेश्वराला पोटात सामावून घेतलें.

मातृभाषा म्हणून कीं काय मूळ संस्कृतापेक्षा तुकारामाच्या काव्यात अधिक भावव्यक्तता वाटली. तुकारामाचे अभंग बाबाच्या तोंडून ऐकताना त्याच्या आधींच्या च गोड आवाजात आज अधिक च गोडी होती. त्यावर त्याचें भाष्य झालें. हे च अभंग इतरत्र वाचले असते तर ही अनुभूति आली नसती. पुस्तकातलीं अक्षरें कित्येकदा भाव व्यक्त करण्याला असमर्थ ठरतात. पण बाबाच्या मुखानें ऐकलें म्हणजे नवा आशय जाणवतो, नवी दृष्टि मिळते नी नवें दर्शन होतें. 'इति शुश्रुम धीराणाम्'चा महिमा आहे हा! 'बिन गुरु होय क्या ज्ञान' म्हटलें च आहे.

आरका शहरात कम्युनिस्टाचा प्रभाव बरा च आहे व कंजूष जमीनदार हि आहेत असें ऐकलें होतें. बहुधा ह्या दोन्ही गोष्टी बरोबर च आढळतात.

आम्ही मात्र आज चढाओढ लावून पुस्तकें विकलीं. काहीं घरात नरा च वाद घालावा लागला. तरी हि दीड आण्याच्या 'ग्रामसेवका'पासून तों एक रुपयाच्या 'गीता-प्रवचना'पर्यंत सर्व तऱ्हेचे साहित्य खूप विकलें.

दुपारीं गावच्या प्रतिष्ठित लोकांची सभा झाली. त्यात इथल्या परिस्थितीचें चागलें च दर्शन झालें. एक वकील तर रागाच्या भरात बाबाना सरळ म्हणाले, "तुम्ही जमिनीची चोरी करायला आला आहात." येथील शिक्षितानीं भूदानसाहित्य अजिबात वाचलें नाहीं असें दिसलें. त्यामुळें त्याना साधी माहिती देखील नव्हती. बाबा म्हणाले, "चळवळ सुरू होऊन चार वर्षें झालीं तरी हि तुम्हीं भूदानसाहित्य वाचलें नाहीं तेव्हा मी तर तुम्हाला अशिक्षित च म्हणेन."

आजच्या प्रवचनात बाबानीं सर्वोदयाच्या मूळ सिद्धान्तावर आधारित ग्रामराज्याचें चित्र उभें केलें.

"समाजाच्या भिन्न भिन्न वर्गांच्या हितात कुठला च विरोध राहू शकत नाहीं. सर्वांचें हित बरोबर च साधू शकतें, सर्वांचा उदय बरोबर च होईल. अहिंसेच्या मार्गाची ही च खुबी आहे कीं त्यात गरीब आणि श्रीमत दोघाचें हि कल्याण होतें."

भाषण सपवून बाबा निवासाकडे परत येत होते. गर्दींतून कसाबसा रस्ता काढत कुणी तरी येऊन चटकन् बाबाचे पाय धरले. बाबानीं त्या गृहस्थाचे हात धरून उभें केलें. दुपारच्या सभेंत आवेशात बोलणारे जे वकीलसाहेब होते ते खालीं मान घालून बोलू लागले, "मला क्षमा करा. मीं त्या वेळीं तुम्हाला ओळखलें नाहीं माझ्या हातून फार मोठी चूक झाली क्षमा करा मला!" त्याच्या पाठीवर थाप मारून हसत हसत त्याना नमस्कार ठोकून बाबा पुढे सरकले. दुपारीं क्रोधाच्या भरात तावातावानें बोलणारे नी आता भावनेच्या भरात पाय धरणारे दोन्ही एक च आहेत का? होय. दोन्ही एक च. पण त्या वेळीं त्याच्या हृदयात रावण राज्य करीत होता, आता रामाचें आगमन झालें होतें.

'पीतळ' गावात वार्दी विणकर आहेत. त्याची स्थिति मोठी वाईट आहे असं कळलें. बाबानीं मार्ग दाखविला. "गावोगावीं, घरोघरीं लोक

सूत कातू लागतील, गावात च कपडा तयार करतील आणि गावकरी त्याचा च उपयोग करतील तर च विणकर वाचतील. गावच्या बाहेरचा मिलचा कपडा वापरणाऱ्याना तर मी नग्न च समजतों. मीं सरकारला असा सल्ला दिला होता कीं जिथें जिथें सरकारतर्फे सामूहिक विकास योजनेचें काम चाललें तिथें हें तत्त्व पाळावें कीं, गावकरी आपला कपडा व इतर आवश्यक वस्तु गावात च तयार करतील. ग्रामोद्योगाचा हा सिद्धान्त च आहे कीं *गावात कच्चा माल आहे आणि गावाला पक्क्या मालाची गरज असेल*, तर त्या कच्च्या मालाचा पक्का माल गावात च तयार झाला पाहिजे. हा सिद्धान्त स्वीकारल्याशिवाय सर्वांना काम देता येणें शक्य नाहीं. देशातील साऱ्या लोकांना काम मिळालें पाहिजे. हें राष्ट्रीय योजनेचें गृहीत तत्त्व आहे व सरकारचें तें कर्तव्य च आहे."

इथें भूमिहीनांची संख्या अधिक आहे व जमीन मूठभर लोकांच्या हातीं आहे. भूमिहीनांना जागृत होण्याचा आदेश देत बाबा म्हणाले, "गावा *गावातील भूमिहीनांनी भूमिवानांजवळ पोहोंचावें व प्रेमानें त्यांना सांगावें* कीं, बाबा आमच्यातर्फे सहाव्या हिस्स्याची मागणी करीत आहे. अशा तऱ्हेची मागणी करणें भूमिहीनांचें कर्तव्य च आहे. मूल जेव्हा रडूं लागतें, तेव्हा च आई त्याला दूध पाजते. म्हणून आपल्याला आपलें रडणें सुरू केलें पाहिजे, आपली मागणी समोर मांडली पाहिजे. भूमिदानयज्ञाचा आरंभ च भूमिहीनांच्या मागणीनें झाला आहे. त्या दिवशीं पोचमपल्लीला तेथील हरिजन आपली मागणी माझ्यासमोर न मांडते तर मला भूदानाची कल्पना सुचली नसती, या कामाचा आरंभ च झाला नसता. म्हणून तेलंगणाच्या भूमिहीनांनी जसें आपलें मागणें मांडलें तसें तुम्ही देखील ओरिसाच्या पन्नास हजार खेड्यांत पन्नास हजार सभा करा व आपली मागणी मांडा. तुमच्या हातीं एक किल्ली देण्याची माझी इच्छा आहे. ती अशी कीं तुम्ही सारे गरीब दान द्याल, तुमच्याजवळ जें जें आहे — जमीन, श्रमशक्ति — त्याचा एक हिस्सा द्याल, तर एक पुण्यशक्ति प्रकट होईल. मग त्याचा परिणाम श्रीमंतांवर होईल, आणि ते दान देऊं लागतील. बिहारमध्यें असें च झालें."

बाबा बोलत च होते. तेवढ्यात पाऊस कोसळायला लागला. सेनापतीच्या थाटात आपल्या शिपायाना पळून न जाण्याचा आदेश देत ते म्हणाले, "हवा, सूर्य, पाऊस हे तर आपले दोस्त आहेत. त्याना भिण्याचें काहीं कारण नाहीं." नंतर ते लोकाना बिहारचा अनुभव सांगू लागले. त्या वेळीं उत्तर बिहारमध्ये हाहाकार उडाला होता. परमेश्वर च जणू कोपला होता. खेडींच्या खेडीं जलमय झालीं होतीं. चोहोंकडे पाण्याशिवाय दुसरें काहीं दिसत नव्हतें. त्या पीडिताजवळ कुणी पोहोंचले नव्हतें. जिथें जिथे रक्त, दुःख आणि अश्रु सांडले असतील तिथे तिथें जायचें नी आपल्या जराजर्जर शरिराची होळी करायची हेंच ज्याला माहीत, त्याचीं पावलें सहज च तो करुण आक्रोश ऐकून तिकडे वळलीं, आपल्या हृदयींच्या प्रेमानें तो त्या दीनाच्या जखमेवर फुंकर घालू लागला. कंबरेभर पाण्यातून दहा दहा मैल चालत जाऊन, मुसळधार पावसाच्या धाराना मस्तकावर झेलत, नी 'हा तर शॉवर बाथ' म्हणून हसणारा हा बापूचा लाडका शिष्य त्या जलमय प्रदेशात विहार करू लागला. जनतेनें वैनान्याचा आवाज ओळखला. रानातून हंबरत हंबरत येणाऱ्या गोमातेकडे ज्या ओढीनें वासरू धावत धावत पोहोंचतें, तशा ओढीनें सारे येऊ लागले. त्याना गुडघाभर पाण्यानें अडवलें नाहीं, मुसळधार अभिषेकानें घाबरवलें नाहीं. पाण्याखालीं बुडून गेलेल्या आपल्या घराकडे केविलवाण्या नजरेनें पाहत दुसरीकडे एक आशा उराशीं बाळगून पोराबाळासह ते नावेंत बसून पाच पाच सात सात मैल दुरून बाबाची वाणी ऐकायला जमत. एकदा तर कमाल च झाली. वरून मुसळधार पाऊस नी खालीं जलमय प्रदेशात दोनशें नावात दोन तीन हजार लोक उभे. त्यात म्हातारे होते, तरुण होते, मुलें होतीं नी तान्ह्या पोराना पोटाशीं धरून उभ्या असलेल्या मायका हि होत्या.

बाबा पीतळवासीयाना सांगत होते, "लोगों की तादाद में लोग बारीशका मार खाते हुओ आते थे, शांतिसे सुनते थे और बारीशका मार खाते हुओ लौटते थे और भर भर के दान देते थे।"

ती अद्भुत, रोमांचकारी कथा लोक ऐकू लागले, त्याच्या उत्या नद होऊं लागल्या आणि ते शांत, निश्चल झाले. थोरवीं बाबानीं त्याना एक ओव शिकवली.

कलिः शयानो भवति, संजिहानस्तु द्वापरः
उत्तिष्ठन् त्रेता भवति, कृतं संपद्यते चरन् ॥

( झोपणारा कलियुगात राहतो. बसणारा द्वापारयुगात, उठून उभा राहणारा त्रेतायुगात आणि चालणारा कृतयुगात राहतो. )

सारे उत्साहानें श्लोक म्हणत होते. त्याना आजवर वेदपठनाचा अधिकार नव्हता. पण आता एक ज्ञान देणारा ऋषि त्याच्याजवळ येऊन त्याना सांगत होता, "तुम्हाला भूमीच्या सेवेचा हक्क आहे. तुम्हाला भूमि मिळाली च पाहिजे. तुम्हाला वेद, उपनिषद्, गीता शिकण्याचा हक्क आहे आणि तें तुमचें कर्तव्य देखील आहे."



## : ५४ :

## भूमिक्रांति सफल होवो !

हिंजलीगड़
४, ५ मे '५५

पडाव जवळ येऊं लागला. एका उंच टेकडीवर उंच झाडाच्या छायेंत शान्त, एकान्त, रम्य जागीं असलेल्या देवळानें लक्ष वेधलें. मुक्कामीं पोहोचता च वेळात वेळ काढून त्या देवळात जायचें व गीतेचे श्लोक पाठ करायचे राहून गेले होते ते टेकडी चढता चढता पूर्ण करायचे असा मी मनाशी विचार करीत होतो. तेवढ्यात बुबुभाईंचा आवाज ऐकूं आला—"आज नाश्त्यानंतर आपल्याला सर्वांना श्रमदानाकरता बाहेर जायचें आहे. गावच्या लोकांनी तळें खोदण्याचें काम सुरू केलें आहे, त्यांना मदत करायची आहे."

थोड्या च वेळात खांद्यावर कुदळ नी टोपल्या व हातात फावडी, कुदळी घेऊन आमची सेना तळ्याकडे निघाली. टेकडीवरच्या मंदिराकडे दृष्टिक्षेप टाकत मी मनात म्हटलें, 'देवा, तुझ्या च दर्शनाला निघालों आम्ही.' काम सुरू झालें माती खणायची, टोपल्यात भरायची व वाहून

नेऊन दुसरीकडे टाकायची. इथें आम्ही अशिक्षित होतों. आमच्याबरोबरचे इतर मजूर गुरु बनून आम्हाला या कामाचे धडे देत होते. कुणी तरी म्हटलें, "फार श्रम कराल तर दुपारीं उपनिषदाच्या वर्गांत पेंगाल तुम्ही." चटकन् एक भगिनी म्हणाली, "छे! उलट आज उपनिषद् अधिक चांगलें ग्रहण करता येईल."

मातीच्या शरीरावर मातीचे लेप चढूं लागले. सूर्यनारायण अधिक प्रखरतेनें तापूं लागला. घामाच्या धारा गळूं लागल्या. मातीनें बरबटलेल्या हातानें मी घाम पुसत असताना एक मजूर भाई म्हणाला, 'टोपली नीट धरा, सांडेल माती.' पाठीमागून टोक्यावर जड टोपली घेऊन एक ओडिया भगिनी येत होती. ती हळू च म्हणाली, "अम्मा 'याथातथ्यतः अर्थान्' याच्या पुढचा शब्द कोणता हो? कांहीं केल्या आठवत च नाहीं बाई." मग आम्ही दोघी जोरजोरानें श्लोक म्हणत पुढें सरकलों. 'याथातथ्यतः अर्थान् व्यदधात् शाश्वतीभ्यः समाभ्यः।'

दोन दिवसांपूर्वी च त्या श्लोकाचें विवेचन बापूंनी केलें होतें तें आठवूं लागलें. जो आत्म्यात सर्व भूतांना आणि सर्व भूतांत आत्म्याला पाहतो, आत्मा आणि सर्व भूतें; जसे कापड्या, पादच्या तंतूंना पट असतो तसे; ओतप्रोत आहेत. कपडा विणताना 'ताणा आणि बाणा' एकमेकांत मिसळतात तसे च. 'ततो न विजुगुप्सते' त्याच्या मनात कुणाबद्दल हि घृणा किंवा अनादर निर्माण होत नाहीं. याच्या पुढचा चरण एक पाऊल पुढें च घेऊन जातो. त्यात म्हटलें आहे, ज्याच्याकरतां आत्मा च सारी भूतें होऊन गेला, म्हणजे पूर्ण अद्वैत, त्या ज्ञानी पुरुषाला शोक आणि मोह कुठला! 'तत्र को मोहः कः शोकः?' त्याच्या जीवनात तर बस, आनंद च आनंद आहे. याच्या पुढचा श्लोक तर आणखी च अद्भुत आहे— 'स पर्यगात् शुक्रम् अकायम्' फार च अद्भुत!

मातीनें जड [illegible] मी [illegible] होतें. कुणी तरी म्हणत होतें, '[illegible] तर [illegible]. [illegible] होईल आवडणार?' [illegible] [illegible] होतें.

कलिः शयानो भवति, संजिहानस्तु द्वापरः
उत्तिष्ठन् त्रेता भवति, कृतं संपद्यते चरन् ॥

( झोपणारा कलियुगात राहतो. बसणारा द्वापारयुगात, उठून उभा राहणारा त्रेतायुगांत आणि चालणारा कृतयुगांत राहतो. )

सारे उत्साहानें श्लोक म्हणत होते. त्यांना आजवर वेदपठनाचा अधिकार नव्हता. पण आता एक ज्ञान देणारा ऋषि त्यांच्याजवळ येऊन त्यांना सांगत होता, "तुम्हांला भूमीच्या सेवेचा हक्क आहे. तुम्हाला भूमि मिळाली न पाहिजे. तुम्हाला वेद, उपनिषद्, गीता शिकण्याचा हक्क आहे आणि तें तुमचें कर्तव्य देखील आहे."



## : ५४ :

## भूमिक्रांति सफल होवो !

हिजलीराद
४, ५ मे '५५

पडाव जवळ येऊं लागला. एका उंच टेकडीवर उंच झाडांच्या छायेंत शान्त, एकान्त, रम्य जागीं असलेल्या देवळानें लक्ष वेधलें. सुभाषी पोटोंनना न वेळात वेळ काढून त्या देवळात जायचें व काल्याने श्लोक पाठ करायचे राहून गेले होते ते टेकडी चढता चढता करून टाकायचे असा मी मनाशी विचार करीत होतों. तेवढ्यात बुढुभाईंना आवाज ऐकूं आला—
"आज नागरिकांनी आपल्याला गावांना श्रमदानाकरता बाहेर जायचें आहे. गावच्या लोकांनी सडक खोदण्याचें काम सुरू केलें आहे. त्यांना मदत करायची आहे."

नेऊन दुसरीकडे टाकायची. इथे आम्ही अशिक्षित होतों. आमच्याबरोबरचे इतर मजूर गुरु बनून आम्हाला या कामाचे धडे देत होते. कुणीं तरी म्हटलें, "फार श्रम कराल तर दुपारीं उपनिषदाच्या वर्गात पेंगाल तुम्ही." चटकन् एक भगिनी म्हणाली, "छे! उलट आज उपनिषद् अधिक चांगलें ग्रहण करता येईल."

मातीच्या शरीरावर मातीचे लेप चढू लागले. सूर्यनारायण अधिक प्रखरतेने तापू लागला. घामाच्या धारा गळू लागल्या. मातीने बरबटलेल्या हाताने मी घाम पुसत असताना एक मजूर भाई म्हणाला, 'टोपली नीट धरा, सांडेल माती.' पाठीमागून डोक्यावर जड टोपली घेऊन एक ओडिया भगिनी येत होती. ती हळू च म्हणाली, "अप्पा 'याथातथ्यतः अर्थान्' याच्या पुढचा शब्द कोणता हो? कांहीं केल्या आठवत च नाहीं बाई." मग आम्ही दोघी जोरजोरानें श्लोक म्हणत पुढें सटकलो. 'याथातथ्यत. अर्थान् व्यदधात् शाश्वतीभ्य. समाभ्यः।'

दोन दिवसापूर्वी च त्या श्लोकाचे विवेचन बाबानीं केलें होतें तें आठवू लागलें. जो आत्म्यात सर्व भूताना आणि सर्व भूतात आत्म्याला पाहतो, आत्मा आणि सर्व भूतें; जसे काळ्या, पांढऱ्या तंतूचा पट असतो तसे, ओतप्रोत आहेत. कपडा विणताना 'ताणा आणि बाणा' एकमेकात मिसळतात तसे च. 'ततो न विजुगुप्सते' त्याच्या मनात कुणाबद्दल हि घृणा किंवा अनादर निर्माण होत नाहीं. याच्या पुढचा चरण एक पाऊल पुढें च घेऊन जातो. त्यात म्हटलें आहे, ज्याच्याकरता आत्मा च सारीं भूतें होऊन गेला, म्हणजे पूर्ण अद्वैत, त्या ज्ञानी पुरुषाला शोक आणि मोह कुठला? 'तत्र को मोहः क. शोकः?' त्याच्या जीवनात तर बस, आनद च आनंद आहे. याच्या पुढचा श्लोक तर आणखी च अद्भुत आहे– 'स पर्यगात् शुक्रम् अकायम्' फार च अद्भुत!

मातीची जड टोपली मी खालीं ठेवीत होतें. कुणी तरी म्हणत होतें, 'थकली असशील तर कमी भरावी माती. एकदम कसें मजुरासारखें होता येईल आपल्याला?' बाबाची ध्यानस्थ मुद्रा डोळ्यासमोर दिसत होती.

दोन्ही कान त्याचे शब्द ऐकत होते. "त्या ज्ञानी माणसानें शाश्वत काळ-पर्यंत टिकणारे सर्व अर्थ यथावत् साधले. ' याथातथ्यत अर्थान् व्यदधात् शाश्वतीभ्य समाभ्य ।' आजकाल पंचवर्षीय योजना होते पण त्याची तर शाश्वतवर्षीय योजना बनली. त्याला कमवायचें, मिळविण्याचें कांहीं उरलें नाहीं. तो सदाकरता निश्चित झाला कारण तो सगळ्यामधें स्वत:ला च पाहतो. सारीं घरें त्याचीं झालीं. तो दिवसभर काम करील आणि भाकरी मिळवील. आजची भाकर आज, उद्याची उद्या. कांहीं चिंता नाहीं."

'आम्हीं आतापर्यंत एक आणा मिळवला' साथींचा विनोद सुरु होता. एक मजूर माझ्या डोक्यावर मातीनें गच्च भरलेली टोपली चढवत होता. त्याच्या चेहऱ्याकडे माझी दृष्टि गेली. चिंता मुक्त, आनंदी चेहरा होता तो. 'किती कमावता तुम्ही ?' मीं विचारलें.

"पोटापुरतं कमावतों. हवय कशाला आणखी जास्ती ?" मीं विचारलें, "आणखी कांहीं सुद्धा नको तुम्हाला ?" त्यानें उत्तर दिलें, "पाहिजे तर ! भागवत वाचण्याची फार इच्छा होते. अजून अडाणी च राहिलों आहे मी. ज्ञानाशिवाय कुठली गति माणसाला ! शिकवता तुम्ही ?"

"हो ! हो. का नाहीं शिकविणार ? म्हणा पाहू. याथातथ्यतः अर्थान् व्यदधात् शाश्वतीभ्य. समाभ्य ।"

"हें तर संस्कृत झाल. मला कस म्हणता येईल ?"

"तुम्हाला जरुर म्हणता येईल. मी एक एक शब्द म्हणत जाईन. तुम्हीं माझ्या मागून म्हणत जा. मला येतें तेवढ शिकवीन मी तुम्हाला."

आम्ही श्लोक म्हणत होतों. कुणी म्हणालें, "अस एकटे एकटे का म्हणता ? सारे च म्हणू या कीं !"

सारे एकदम उपनिषद् म्हणू लागले.

कुदळीनें माती खणून टोपली भरली व मस्तीत उचलली.

"आता हें काम छान जमाय तुम्हाला." मजूर आनंदानें म्हणाला.

"आणि तुम्हाला सुद्धा श्लोक जमू लागलाय." त्याला श्लोक म्हणताना पाहून मी आनंदानें ओरडलें.

मध्यान्हाची वेळ. मे महिना. सूर्यनारायणाला मनसोक्त तापण्याचा आधिकार च होता.

'अग्ने नय सुपथा राये अस्मान् ।'

हे मार्ग-दर्शक देदीप्यमान प्रभो ! आम्हाला सरळ मार्गाने, त्या परम आनदाकडे घेऊन जा.

ईशावास्य संपत आले. दुपारच्या जेवणाची वेळ होत आली.

आपआपल्या टोपल्या नी कुदळी, फावडीं उचलीत सर्वांनीं जयघोष केला :

'भूमि-क्राति सफल हो !'

समाप्त

# आगामी प्रकाशनें

| | |
|---|---|
| सर्वोदय विचार आणि स्वराज्य-शास्त्र | विनोबा |
| क्रांत दर्शन ( परिवर्धित आवृत्ति ) | ,, |
| गुरुबोध (शंकराचार्यांच्या प्रकरणग्रंथाचें नवनीत) | ,, |
| क्रांतीच्या वाटेवर ( कोरापुट मधील ग्रामदानाची दैनंदिनी ) | निर्मला देशपांडे |